# मधुयामिनी स्वप्नदर्शन

अर्थात्

धी मिड्समर नाइट्स ड्रीम.



## प्रकाशकाची सूचना.

शेक्स्पियर कवीवर इंग्रज लोकांचें किती प्रेम आहे, याची वास्तविक कल्पना पुढील उद्गारांवरून वाचकांस होईल.

" Carlyle once posed a curious question-namely, whether the British people would sooner loose their Shakespeare or their Indian Empire ; and he decided in favour of the latter. Because, he said,-' your Indian Empire, in any case, must go sooner or later, but Shakespeare cannot go. He lasts for ever with us. We cannot give up our Shakespeare.' Well,......there is no reason why we should lose either. Let us keep both. Let India remain our India, just as much as Shakespeare is our Shakespeare,...that is to say, as a *part of the inalienable, heritage of Englishmen. And the lasting glory of the British race* ?"—LORD CURZON, at the London Union Club. *1st August, 1904.*

ह्या अवाढव्य भरतखंडाचें सार्वभौमत्व एकीकडे व शेक्स्पियर कवि एकीकडे-एवढा मान इंग्रज पंडित व इंग्रज मुत्सद्दी त्याला देतात अशा ह्या त्यांच्या आवडत्या कवीचे सर्व ग्रंथ आह्मी भाषांतररूपानें मराठींत आणून, आमच्या देशबंधूंस त्यांचा लाभ करून देत आहों. हा आमचा उद्योग सर्वांस पसंत पडेल अशी आह्मांस आशा आहे.

श्रीमती पा.कर.

पुणे विद्यापीठ जयकर ग्रंथालयास भेट

# शेक्स्पियर-कविकृत नाट्यमाला, खंड ६ वा.

# मधुयामिनीस्वप्नदर्शन

अर्थात्

## धी मिड्समर नाइट्स ड्रीम.

प्रस्तावना, गुणदोषविवेचनात्मक उपोद्घात व कथानक यांसहित.

भाषांतरकार

## खंडेराव भिकाजी बेल्सरे.

कीं हें अमृताचे मेघ वोळले । कीं नवरसांचे वोघ लोटले ।<br>
नाना सुखांचें उचंबळलें । सरोवर हें ॥

रामदास.

---

प्रकाशक

के. सी. कुळकर्णी आणि मंडळी, मुंबई.

---

सन १९१३

---

किंमत रु. २.



Addl. Gaikwad.
O:2J64:6
155E3
304601

प्रिंटरः—व्ही. जी. जोशी यांनीं गणपत कृष्णाजी प्रेस, मुंबई, पालवरोड, गिरगांव येथें संविधानक पृष्टें १ ते ३२ व नाटक पृष्टें १ ते १५० छापिलीं आणि 'आर्यभूषण' प्रेस, पुणें येथें मुखपृष्ठापासून संविधानकापर्यंतचीं पानें नटेश अप्पाजी द्रवीड यांनीं छापिलीं.

प्रकाशकः—के० सी० कुळकर्णी आणि मंडळीचे मॅनेजर रा० खंडेराव भिकाजी बेलसरे यांनीं पुणें येथें प्रकाशित केलें.

# समर्पण



श्रीमंत रा. रा. दाजीसाहेब

उर्फ

बाळाजी विनायकराव बुटी ( नागपूरकर, )

सन १९१३.

The Bombay Art Printing Works, Fort.

समर्पण

श्रीमंत रा. रा. दाजीसाहेब

ऊर्फ

बाळाजी विनायकराव बुटी

नागपूर येथील सुप्रसिद्ध लक्षाधीश सावकार

ऊर्फ मर्चंट यांस त्यांच्या अंगचे औदार्यादि

गुण पाहून

हा ग्रंथ

विनयानें, बहुमानपूर्वक, ग्रंथकारानें

अर्पण केला असे.

पॅरा डाईस लॉज.
महाबळेश्वर, ता. २७ मे सन १९१३.

शेक्स्पियर नाट्यमालेचे खंड कोणकोणास अर्पण करण्यांत आले त्यांचें टांचण.

खंड १ ला. तुफान अर्थात् धी टेम्पेस्ट– श्रीमन्ममहाराज शाहू छत्रपति सरकार करवीर, कोल्हापूर, यांस.

खंड २ रा. प्रेमाचा कळस अर्थात् रोमियो आणि ज्यूलियट–श्रीमन्ममहाराज सयाजीराव गायकवाड सरकार बडोदें, यांस.

खंड ३ रा. व्हेनिस नगरचा व्यापारी अर्थात् मर्चंट ऑफ् व्हेनिस–नेक नामदार लॉर्ड सीडेनहॅम क्लार्क मुंबईचे गव्हर्नरसाहेब यांस.

खंड ४ था. पंचम हेनरी चरित्र अर्थात् हेनरी धी फिफ्थ–राजाधिराज पंचमजॉर्ज आणि महाराणी मेरी यांस.

खंड ५ वा. ज्यूलियस सीझर–नामदार सर नारायणराव चंदावरकर यांस.

खंड ६ वा. मधुयामिनीस्वप्नदर्शन अर्थात् मिड् समरनाइट्सड्रीम–श्रीमंत दाजीसाहेब ऊर्फ बाळाजी विनायकराव बुटी यांस.

आणखी कित्येक नामांकित पुरुषांनीं समर्पण स्वीकारण्याचें आश्वासन दिलें आहे.

शेक्स्पियरकृत नाट्यमालांतर्गत संविधानकावलीचे अंक कोणकोणास अर्पण करण्यांत आले त्यांचें टिपण.

कथा १ ली–श्री. सौ. माणिकबाई नानुजी कोठारे, मुंबई, यांस.

कथा २ री–श्री. सौ. लेडी चंदावरकर, मुंबई, यांस.

कथा ३ री–श्री. सौ. लक्ष्मीबाईसाहेब पंतसचीव, सं. भोर, पुणें, यांस.

कथा ४ थी–श्री. रमाबाईसाहेब रानडे, पुणें, यांस.

कथा ५ वी.

आणखी कित्येक नामांकित कुलस्त्रियांनीं समर्पण स्वीकारण्याचें आश्वासन दिलें आहे.

# अनुक्रमणिका.

# मधुयामिनीस्वप्नदर्शन

अर्थात्

## मिड्समर ड्रीम.

उपोद्घात पृष्ठ ६० वर " उत्कंठित नायिका ह्मणते " असें आहे तेथें " खंडित नायिका ह्मणते " असें असावें.

# नाटकांतील पात्रें.

## पुरुषवर्ग.

| | |
|---|---|
| थीसीयस ... | अथेन्स नगरचा राजा. |
| इजियस ... | हर्मियेचा बाप. |
| लायझॅन्डर ...<br>डिमेट्रियस ... | हर्मियेवर प्रीति करणारे व तिच्याशीं लग्न लावण्याच्या हक्कासाठीं झगडणारे गृहस्थ. |
| क्रीडाध्यक्ष ... | राजाच्या करमणुकीची व्यवस्था लावणारे अधिकारी. |
| क्विन्स-सुतार ...<br>स्नग-चांभार ...<br>बॉटम-कोष्टी ...<br>फ्लूट-भाता नीट करणारा ...<br>स्नाऊट-जस्ती काम करणारा ...<br>स्टार्व्हलिंग-शिंपी ... | नाटक करून दाखविणारे कामकरी लोक. |

## स्त्रीवर्ग.

| | | |
|---|---|---|
| हिपोलायटा | ... | थीसीयस राजाची राणी. |
| हर्मिया | ... | म्हातारा इजियस याची मुलगी व लायझॅन्डरवर प्रेम करणारी स्त्री. |
| हेलना | ... | डिमेट्रियस याजवर प्रेम करणारी स्त्री. |

## पिशाच्चवर्ग.

| | | |
|---|---|---|
| ऑबेरान | ... | पिशाच्चांचा राजा. |
| टिटॅनिया | ... | पिशाच्चांची राणी. |
| पक (रॉबिनगुड फेलो) | ... | एक चेष्टेखोर पिशाच्च. |
| डाळिंबी, गुलाबी, वाळवी, मोहरी | ... | मुख्य पऱ्या. |

यांशिवाय ऑबेरान व टिटॅनिया यांचे अनुचर, थीसीयस राजाचे परिजन वगैरे.

**स्थळः—अथेन्स** नगर व त्याच्या नजीकचें दाट अरण्य.

# प्रस्तावना.



प्रस्तुत खंडासकट साहा खंड आज वाचकांच्या हातीं पडले. पुस्तक लिहून, छापून तयार झालें, परंतु छापखान्याचें बील देण्यासंबंधाची आमची नेहमींची अडचण आमच्या समोर दत्त म्हणून उभी राहिली; तीमुळें हा ग्रंथ प्रसिद्ध होण्यास विलंब लागला. ती अडचण दूर करण्याची बुद्धि ज्या कांहीं गृहस्थांच्या मनांत परमेश्वरानें प्रेरणा केल्यामुळें उत्पन्न झाली, त्यांचे येथें सविनय आभार मानिल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. सध्यां एवढेंच सांगणें पुरें.

आज साहा ग्रंथ आमच्या हातून लोकांपुढें आले; यांत आमचा सर्व आधार लोकाश्रयावर आहे. पण तो किती अस्थिर आहे, हें कोणासही सांगणें नलगे. प्रत्येक खेपेस वर्गणीदारांची संख्या आह्मीं चढवीत न्यावी आणि तितक्याच वेळां ती ओहोटीच्या वेगानें मागें मागें सरत जावी, असा

अनुभव आला आहे. यामुळें वर्गणीदारांच्या संख्येला स्थिर करूं पाहणें ह्मणजे तळहातावर पारा स्थिर करण्यासारखेंच आहे. अशा स्थितींत कोणा धनिकाच्या आश्रयावांचून या कार्यास स्थिरता येणार नाहीं, असा आमचा ग्रह झाला आहे. हा आश्रय देणारा पुरुष कोण भेटतो हें पाहणें आहे! तोंवर आमचें हें काम असेंच मोडक्या पंखांनीं फडकावित नेण्यास आह्मीं कमर बांधिली आहे. याहून अधिक काय लिहावें?

याप्रमाणें द्रव्यबळाची अनुकूलता आम्हांस कशी काय आहे याचें दिग्दर्शन केल्यावर, आतां आम्ही आमचें लक्ष ग्रंथरचनेच्या क्रमाकडे लावितों. आतांपर्यंत निघालेल्या ग्रंथांवरून, वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल, कीं प्रत्येक ग्रंथांत बहुधा चार प्रकरणें आम्ही घालीत आलों आहों. तीं हीं:—(१) प्रस्तावना, (२) उपोद्घात, नंतर (३) संविधानक आणि (४) मूळ नाटकाचें भाषांतर; आणि प्रस्तुत खंडांत एक पांचवें प्रकरणही "प्रस्तावनापरिशेष" या नांवानें दाखल केलें असून, पुढेंही अवश्यकतेप्रमाणें तें घालण्याचें आमचें मानस आहे. आतां, 'हीं एवढीं प्रकरणें कशाला?' असा प्रश्न कोणाचे मनांत उद्भवल्यास, त्याचें उत्तर देणें जरूर आहे असें आम्हांस वाटतें. शेक्स्पियरच्या मूळ नाटकांचीं भाषांतरें

देण्याचा आमचा संकल्प, त्यास अनुसरून आम्हीं चालावें हें बरें; व असा पोक्त व गोड सल्लाही कित्येकांनीं आम्हास दिलेला आहे. पण प्रस्तुत उद्योग काढण्यांत आमचा उद्देश फार वेगळा आहे. त्यास अनुसरून म्हटलें म्हणजे हीं एवढीं प्रकरणें अवश्यच आहेत असें दिसून येईल. मूळ नाटकाचें भाषांतरच देत गेल्यास थोडे किंमतीला व थोड-क्यांत कार्यभाग आटोपेल असें वाटतें हें खरें; पण शेक्स्पियरचीं नाटकें नुसतीं वाचणें किंवा वाचावयास लावणें यांत कांहीं जीव नाहीं असें आम्हांस वाटतें. शेक्स्पियर कवीच्या नाटकांनीं मनोरंजन करूं पाहणें ही केवळ लोक-रूढि आहे. वस्तुतः जीं नाटकें वाचणें तीं वाचून समजणें यांतच सर्व श्रेय आहे. एक तर कादंबरीपेक्षां नाटक वाचणें व तें समजणें बरेंच कठीण आहे. नाटकांतली रचना व भाषासरणी कादंबरीसारखी मोकळी व वर्णना-त्मक नसते. नाटकाचा प्रकार कांहींसा अत्तरासारखा आहे. कादंबरींत जो देखावा लांबलचक वर्णनानें दाखविला असतो, तोच नाटकांत एका लहानशा प्रवेशांत थोड्या शब्दांनीं आणिला असतो. यास्तव ही खुबी जर लक्षांत आली नाहीं तर तें वाचावयास गोड लागत नाहीं; किंबहुना त्यांतील खुबी न समजल्यामुळें अप्रीती-देखील उत्पन्न करितें. ही गोष्ट सामान्य नाटकाविषयीं

झाली. मग शेक्स्पियर कवीचे नाटकांस तर ती विशेषच लागू नाहीं काय ? याच दृष्टीनें आम्हीं प्रत्येक नाटकास उपोद्घात देण्याची योजना केली आहे. संविधानकाची किती अवश्यकता आहे, हें थोडा विचार केला असतां कोणासही कळून येईल. समग्र नाटक फार मोठें व अनेक प्रसंगांनीं तें गजबजलें असल्यामुळें, त्याचें आकलन एका-एकीं होत नाहीं. तेव्हां सदर नाटकाची लहानशी गोष्ट सरळ वाणीनें सांगितली असतां किती उपयोग होईल ! त्यांतून, शेक्स्पियर कवीच्या कित्येक नाटकांचीं संविधानकें लॅम्बसारख्या एका नामांकित चतुर लेखकानें मूळ इंग्रजींतच करून ठेविलीं आहेत, तीं तशीच घेऊन आम्ही मराठींत उतरून देत आहों. अर्थात् लॅम्बच्या गोष्टींचीं भाषांतरें मराठींत आणल्यासारखें होऊन, त्याचा एकत्र संग्रह केल्यावर, हें मराठी लॅम्बस् टेल्स तयार होईल हें लक्षांत ठेविलें पाहिजे. याचा उपयोग प्रत्येक कुटुंबांत आहे. लहान मुलें व मुली, तशाच अशिक्षित पुरुष व स्त्रिया अशांस यांचा फार उपयोग होईल. ह्या गोष्टी आम्ही वेगळ्याही छापून प्रगट करीत असतों. ज्या नाटकांचीं संविधानकें लॅम्ब यानें रचलेलीं प्रसिद्ध नाहींत, त्यांचीं आम्हीं तयार करून छापविलीं आहेत हें येथें सांगणें जरूर आहे. शेवटीं राहिली प्रस्तावना, तिच्या संबंधानें आम्हांस एवढेंच

सांगावयाचें आहे कीं, येथें नाटकीय गोष्टींच्या विवेचनाशीं संबद्ध अशा सर्व विषयांची चर्चा होत जावी; इतकेंच केवळ नव्हे, पण नाटकविषयाला आधारभूत जी भाषा, तिच्या अभिवृद्धीचाही ऊहापोह होत जावा, अशी आमची इच्छा आहे. मग यांतच आमच्या पुस्तकावर कोणीं टीका केल्यास, त्यास उत्तर देण्याची सोय होईल हें वेगळें सांगणं नको. याशिवाय कित्येक वादग्रस्त मुद्यांवरही चर्चा येत जाईल, हेंही उघड आहे. सारांश प्रस्तौति अथवा प्रस्तावयाति या शब्दांच्या अर्थास अनुसरूनच, मूळ ग्रंथांतील विषयाशीं संबद्ध अशा गोष्टींची चर्चा होऊन, जें विशेष कथन करावयाचें असतें तें यांत येत असतें, हें, आमच्या कोणत्याही खंडाची प्रस्तावना चाळून पाहिली असतां वाचकांच्या लक्षांत येईल. अशा रीतीनें पाहतां, आमचीं हीं पुस्तकें कुटुंबांत असल्यानें, त्यांचा उपयोग लहानापासून थोरापर्यंत, अप्रौढापासून प्रौढापर्यंत, सर्वांस त्यांच्या दशामानानें होत जावा, अशी ही आमची योजना आहे. ती ज्यांस पसंत नसेल त्यांस एवढेंच सांगणें आहे कीं, एका प्रसिद्ध सुभाषितांत ह्मटल्याप्रमाणें, आमच्या ग्रंथांतला जो भाग त्यांस प्रिय असेल तो त्यांचेसाठीं आह्मी घातला आहे व जो अप्रिय असेल व जो केवळ भारूड म्हणन त्यांस वाटेल तो त्यांचेसाठीं नसून इतरांसाठीं आहे, असें

त्यांनीं समजून आपलें समाधान करून घ्यावें. बहुधा ही सूचना सर्वांस मान्य होण्यासारखी आहे, व ते तिचा आदर करितीलच असा भरंवसा आहे. पण आमची ही सूचना कोणास पसंत असो अगर नसो-सर्वांस आमची अशी शिफारस आहे कीं त्यांनीं ह्या आमच्या पुस्तकांत जी चर्चा येईल तिचें मननपूर्वक एकवार तरी अवलोकन करावें. मग ह्या शिफारशीस त्यांनीं मान देऊन जर आपले विचार आह्मांस कळविले किंवा वर्तमानपत्रांदिकांत प्रगट केले तर आह्मी त्यांचें फार आभारी होऊं हें वेगळें सांगावयास पाहिजे असें नाहीं.

वर म्हटल्याप्रमाणें आमच्या ग्रंथावर कोणी टीका केल्यास किंवा त्यांतील मुद्याविषयीं चर्चा केल्यास, ती आम्हांस किती प्रिय होईल हें कोणासही सांगणें नलगे. अशी टीका विविधज्ञानविस्तार या नामांकित मासिक पुस्तकांत नुकतीच येऊन गेली आहे, ती पाहून आम्हांस फार आनंद झाला. तशांत विविधज्ञानविस्ताराशीं आमचा फार जुना संबंध आहे. तेव्हां आमच्या एका जुन्या मित्रानें आमच्या आग्रहांवरून कां होईना—पण आमचा समाचार घतला, व सध्यांच आमचा एक ग्रंथ आपल्या पुस्तकांत टीकेस पात्र केला ह त्याचे आम्हांवर मोठे उपकार झाले हें आम्हांस येथें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. विविधज्ञान-

विस्ताराशीं आमचा संबंध कांहीं नवीन नाहीं. कांहीं नाहीं तरी आमचा प्रथम संबंध सन १८८२ सालांत जडला. त्या वेळीं आमची विद्यार्थिदशा असून, लेखनव्यवसायांत आम्ही केवळ अनभ्यस्त होतों. आमचे वडील बंधु कै. मल्हार भिकाजी बेलसरे हे ते वेळीं काठेवाडांत जुनागड येथें नोकरीनिमित्त असून, कांहीं एक लेख विस्ताराकडे लिहून पाठवीत असत, तेव्हां आपणही त्यासच आपला लेख लिहून पाठवावा अशी आम्हांस इच्छा झाली. हा लेख आमचे बंधूंस न कळत पाठविण्यांत आला, हें सांगणें नलगे. मग केसरी वगैरे पत्रांस किरकोळ लहान लहान लेख लिहून पाठविण्याची आमची खटपट या वेळीं चालू होतीच व अशा कांहीं लेखांची केसरीनें अग्रलेखांतही गणना केली होती, त्याचप्रमाणें विविधज्ञानविस्ताराकडेही एक लेख लिहून पाठविला असतां, इष्ट हेतु तडीस जाईल असें आम्हांस वाटलें. पण मासिक पुस्तकांतील लेख विशेष महत्वाचे व नीटनेटके लिहिलेले असावे लागतात; अशा लेखांत आपल्या लेखांची गणना होईल तर बरें अशी उत्कंठा होऊन, " गुणवती स्त्री " हा लेख प्रथमच विस्ताराकडे लिहून पाठविला व त्याच्या ते वेळच्या चतुर संपादकांनीं, ओळखपाळख

नसतांही सदर लेखास आपल्या मासिक पुस्तकांत स्थळ दिलें. हें पाहून आमच्या मनास बरेंच उत्तेजन आलें व पुढें " खरें प्रेम " व " भामिनीविलास काव्याचें नामकरण " वगैरे गद्य लेख, व " लग्नघाई, " " वधस्तंभावर चढविलेल्या देशभक्ताचे उद्गार " वगैरे कांहीं पद्यात्मक लेखही विविधज्ञानविस्ताराकडे पाठविले असतां त्यांसही स्थळ मिळालें. यानंतर कै. रा. रा. गणेश भिकाजी गुंजीकर यांनीं सुरू केलेल्या पण त्यांच्या अकालिक निधनामुळें अपूर्ण राहिलेल्या " करण वाघेला " ह्या गुजराथी कादंबरीचें भाषांतर विस्ताराच्या संपादकांनीं करून मागितल्यावरून आह्मीं त्यांस दिलें, व त्याचें परितोषिकही त्यांच्या इच्छेस आलें तें त्यांनीं आह्मांस दिलें. यापुढें मात्र विविधज्ञानविस्ताराच्या संपादकांचें मन्वंतर झाल्यापासून, हा संबंध दुरावला; व इंदुप्रकाशादि पत्रांशीं लेखकाच्या नात्यानें आमचा संबंध जडल्यामुळें, विस्ताराशीं असलेला आमचा हा संबंध सहजच शिथिल झाला. तथापि या शैथिल्यामुळें विस्तारावरील ' प्रथम प्रेम ' उणें झालें असें मात्र नाहीं. कदाचित् या आमच्या जुन्या मित्राची गांठ पडतांच तें अधिक बळानें आमच्या हृद-यांत प्रगट होतें असेंही ह्मणावयास चिंता नाहीं. तेव्हां ह्या त्याच्या भेटीबद्दल आह्मी त्याचे आभार मानून

व अशीच भेट वरचेवर देण्याविषयीं त्यांस विनंति करून, पुरें करतों.

विविधज्ञानविस्तारांतील वर दर्शविलेला टीकालेख व त्यास आमचें उत्तर यांचा समावेश प्रस्तुत खंडाच्या शेवटीं "प्रस्तावनापरिशेष" म्हणून जो भाग जोडला आहे त्यांत केला आहे; त्याजकडे वाचकांचें अवश्य लक्ष जावें असें आह्मी इच्छितों.

प्रस्तुत ग्रंथांतील भाषांतर व उपोद्घात वगैरे तयार करण्याचे कामीं ज्या एका गृहस्थाची मदत आम्हांस वेळोवेळीं झाली त्याची आठवण येथें झाल्यावांचून राहत नाहीं. सदर गृहस्थ **रा. रा. दामोदर रामचंद्र चिपळूणकर,** बी. ए. हे होत. नुकतेच ते आपला उत्तर हिंदुस्थानांतील प्रवास पुरा करून वांई येथें येऊन राहिले आहेत असें समजतें. त्यांच्या समागमाचा लाभ जर आम्हांस निरंतरचा होण्याची तजवीज झाली असती तर फार बरें झालें असतें. आहेत त्या ठिकाणाहूनही त्यांची जेवढी मदत होऊं शकेल तेवढी ते आह्मांस देतील अशी आम्हांस आशा आहे. यानंतर दुसरे गृहस्थ **रा. रा. वासुदेव नारायण वैद्य** जुन्नरकर यांचेही अनुकूलतेबद्दल त्यांचे आभार मानणें अवश्य आहे.

---

# उपोद्घात.



प्रस्तुतच्या साहाव्या खंडांत " मधुयामिनी–स्वप्नदर्शन " हें नाटक दिलें आहे. हें शेक्स्पियर कवीच्या " धी मिडसमर नाईट्स ड्रीम " ह्या नाटकाचें भाषांतर होय. ह्या नाटकांत मुख्य रस शृंगार; त्याचा परिपोष अद्भुत रसानें करून, कवीनें येथ जी मजा करून दिली आहे तिला सीमाच नाहीं. यांतच आणखी हास्यरसालही त्यानें यथावकाश आमंत्रण दिलें आहे. तथापि शृंगारमिश्र अद्भुत रसाच्या प्राबल्यानें वाचकांच्या व प्रेक्षकांच्या मनांत अनकल व हितावह असा जो संभ्रम उत्पन्न होतो त्यांत तो इतका तल्लीन होऊन जातो कीं, आपण स्वप्नसृष्टींतच आहों कीं काय असें त्याला वाटतें. तेव्हां अशा मौजेचें हें नाटक आज वाचकांच्या हातीं येत आहे, त्याच ते आदरपूर्वक अवलोकन करतील अशी आशा आहे.

प्रथम सुरुवातीला जी अवांतर माहिती सांगण्यासारखी आहे ती सांगून झाल्यावर, मूळ नाटकासंबंधानें जें लिहावयाचें तें लिहूं. ही अवांतर माहिती सांगण्याचा नेहमींचा क्रम असा आहे:—

(१) प्रस्तुत नाटकाच्या रचनाकाराचा निर्णय, (२) ज्या आधारावरून हें नाटक रचिलें ते आधार, व (३) प्रस्तुत नाटकाची लोकप्रियता वगैरे; ही माहिती ह्याच क्रमानें सांगतों.

शेक्स्पियर कवीनें हें नाटक अमुक वर्षीं लिहिलें असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. यासंबंधानें जें लिहावयाचें तें केवळ अनुमानें काढूनच लिहावयाचें आहे. कोणत्याही ग्रंथाच्या रचनाकालाचा निर्णय करणें झाला, तर तो बहुधा दोन प्रकारच्या प्रमाणांनीं होतो. ( १ ) बाह्यप्रमाणांनीं व ( २ ) अंतःप्रमाणांनीं. यांपैकीं बाह्यप्रमाणें म्हणजे प्रस्तुत नाटकासंबंधानें अन्य ग्रंथांत जो निर्देश केलेला आढळतो त्यावरून मिळतात तीं होत. अशा प्रकारचा निर्देश फक्त एकाच ग्रंथांत आढळून आला आहे. तो ग्रंथ ह्मटला म्हणजे "फ्रान्सिस मियर्स" ( Francis Meres ) कृत " पॅलॉडिस स्टॅमिया " ( *Palladis Stamia* ) हा होय. हा ग्रंथ १५९८ सालीं

प्रसिद्ध झाला. त्याअर्थी हें नाटक १५९८ सालापूर्वी कवीनें रचलें होतें हें स्पष्ट आहे. तथापि अमुक सालीं लिहिलें असें सांगतां येत नाहीं. मात्र सन १६०० मध्यें आक्टोबर ८ रोजीं सदर नाटकाची पहिली चतुष्पत्री प्रत जेम्स रॉबर्ट यानें टॉमस फिशर ह्याजकरितां छापिली असें त्या प्रतीवरच लिहिलें आहे त्यावरून कळतें. आतां अंतः-प्रमाणें कोणतीं आहेत ह्मणून पाहिलीं, तर जीं सांपडतात तींहि बरींच संदिग्ध व वादग्रस्त आहेत असें दिसून येतें. पहिलें अंतःप्रमाण अंक २ प्रवेश १ यांत अतिवृष्टीचा व तज्जन्य रोगराईचा उल्लेख केला आहे त्यावरून मिळतें. ह्या ठिकाणीं टिटॅनियाराणी ह्मणतेः—

> "आमच्या भांडणामुळें वाऱ्यालाही राग येऊन आमचा सूड घेण्याकरीतांच कीं काय त्यानें सरदी उत्पन्न करणारें असें रोगट धुकें समुद्रांतून शोषून घेतलें व त्याचा पाऊस जमिनीवर पाडून दरोबस्त नद्यांना पूर आणले." इ. इ.

यांत केलेला हा अतिवृष्टीचा व रोगराईचा उल्लेख फार महत्वाचा आहे. कारण असाच उल्लेख पुढील ग्रंथांतही केलेला आढळतो. ( १ ) डॉक्टर सायमन् फोर्मन ( Dr. Simon Foreman ) नामक वैद्याची रोजनिशी. ( २ ) स्टोर्वे ( Storwe ) कृत १५९४ सालची बखर. ( ३ ) डॉक्टर किंग नामक धर्माध्यक्षानें

यॉर्क येथें दिलेलीं व्याख्यानें. (४) १५९५ सालीं चर्चयार्ड नामक एका अप्रसिद्ध कवीनें छापविलेलें चॅरिटी नामक काव्य. या चारही ठिकाणीं वरील प्रकारचे अतिपात १५९४ सालीं घडल्याचें लिहिलें आहे. ह्यावरून हें नाटक त्या सालाच्या अखेरीस किंवा १५९५ सालाचे आरंभीं रचिलें असावें असें अनुमान केल्यास चिंता नाहीं. दुसरें अंतःप्रमाण प्रस्तुत नाटकांत अंक ५ प्रवेश १ येथें पुढें लिहिल्याप्रमाणें शब्द आहेत त्यांवरून मिळतें. "ज्ञान-प्राप्तीकरितां दारिद्र्यावस्थेंत मरण पावलेल्या विद्येकरितां नऊ कलांनीं केलेला शोक."

ह्यासंबंधानें कांहींजणांचें मत असें आहे कीं, विद्वान् स्पेन्सर कवि दारिद्र्यावस्थेंत मृत्यु पावला त्याचा येथें उल्लेख केला आहे. परंतु स्पेन्सर कवि सन १५९९ सालीं वारला व हें नाटक तर सन १५९८ चे पूर्वीं लिहिलें होतें ह्याविषयीं शंकाच नाहीं हें वर सांगितलेंच आहे. अर्थात् हें मत चुकीचें आहे हें कोणास सांगणें नलगे. आतां वरील वाक्यांत स्पेन्सरकृत 'कलांचे अश्रु' (*Tears of the muses*) या काव्याचा उल्लेख केला आहे असें कांहींचें मत आहे. पण वरील वाक्य वाचल्यावर थीसियचे उद्गार मूळ नाटकांत दिले आहेत, ते असेः–'हा एक निंदाव्यंजक पोवाडा—तो चांगला मर्मभेदक व दोषदर्शक असा

आहे.' हें थीसियचें वर्णन वरील काव्यास मुळींच लागू पडत नाहीं. कारण तें काव्य शोकरसप्रधान आहे. बरें थीसियसच्या तोंडांत असे शब्द घालून शेक्स्पियरनें स्पेन्सरची थट्टा उडविली असेल असें म्हणावें तर तें मुळींच संभवत नाहीं. कारण स्पेन्सर व शेक्स्पियर हे मित्र होते, व त्यांतून या काव्यांत तर एके ठिकाणीं खुद्द शेक्स्पियरनें त्याची स्तुतिच केली आहे. कांहींकांच्या मतें हे शब्द गद्यपद्यरचना करणारा तत्कालीन एक लेखक रॉबर्ट ग्रीन यास अनुलक्षून आहेत. तो विद्वान् व केंब्रिज येथील विश्वविद्यालयाचा एम. ए. होता. 'मॅजिस्टर आर्टियम' ( Magister Artium ) ही पदवी तो आपल्या प्रत्येक ग्रंथाच्या मुखपृष्ठावर आपल्या नांवापुढें लावीत असे. आतां त्याचे लेखही ' मर्मभेदक व दोषदर्शक ' आहेत त्याअर्थीं वरील वाक्य त्याला लागू पडतें खरें; पण तो सन १५९२ सालांतच वारला होता. ह्यास्तव ' नुकताच मरण पावलेला' हें वर्णन त्याला जुळत नाहीं. एंकंदरींत वरील वाक्य कालनिर्णय करण्यास कांहींच उपयुक्त नाहीं. बहुधा तत्कालीन इतर लेखकांप्रमाणेंच आमच्या कवीनेंही ज्ञानाच्या अवनतीविषयीं वरील शब्दांत आपला खेद दर्शविला इतकेंच; यापलीकडे त्या वाक्याची कांहीं मातब्बरी नाहीं असें म्हणणें भाग आहे. तिसरें अंतःप्रमाण

अंक २ व प्रवेश १ येथें आलेल्या एका उल्लेखावरून मिळतें. यांत अथेन्समधील एक कामकरी सोंगें तयार करण्यासाठीं येतो व ह्मणतो कीं ' सिंह जर नाटकांत दिसला तर बायकांची त्रेधा उडेल.' हें वाक्य लिहावयास पुढील गोष्टीवरून आपल्या कवीला सुचलें असावें असें म्हणतात. ती गोष्ट सन १५९४ सालीं स्काटलंड देशांत राजपुत्र हेन्री याला बाप्तिस्मा देण्याचा समारंभ झाला, त्या वेळीं उत्सवांतील रथ सिंहानें ओढावा अशी एक सूचना कोणीं एकानें केली होती. परंतु तसें केल्यास जवळून चाललेलीं मनुष्यें घाबरतील व तो सिंहही माणसाळलेला असला तरी मशाली व दिवे पाहून बुझेल असें वाटल्यावरून ती सूचना रद्द ठरली. मग मूरिश मनुष्याचें सोंग एका इसमास देऊन त्याजकडे तें सोंपविण्यांत आलें. कवीनें आपल्या नाटकांत वरील वाक्य लिहिलें तेव्हां ही गोष्ट नुकतीच घडलेली असली पाहिजे हें उघड आहे. या सर्व प्रमाणांवरून या नाटकाची रचना सन १५९४-९५च्या दरम्यान झाली असावी असें मानावयास चिंता नाहीं; व इतर प्रमाणेंही या अनुमानास प्रतिकूळ नाहींत. या नाटकाच्या रचनाकाळीं कवि नाट्यरचनेच्या कलेंत विशेष घटावलेला होता असें दिसत नाहीं. यासंबंधानें पुढें लोकप्रियतेविषयीं लिहितांना विवेचन

येईलच. ह्या नाटकाची रचना व भाषासरणी या दोहों-वरूनही हें नाटक 'लव्हज लेबर लॉस्ट' (*Love's Labour Lost*) 'कामेडी ऑफ एर्स' (*Comedy of Errors*) 'टू जन्टलमेन ऑफ व्हेरोना' (*Two Gentlemen of Verona*) यांच्या नंतर लिहिलें असावें असें दिसतें. पण तें 'मर्चेन्ट ऑफ व्हेनिस' (*Merchant of Venice*) रचतांना कवि जितका घटावलेला होता तितका ह्या नाटकाच्या रचनाकाळीं घटावलेला नव्हता. उलट पक्षीं 'दुसरा रिचर्ड' (*Richard II*) व 'रोमियो आणि ज्यूलियट (*Romeo and Juliet*) यांच्या भाषासरणीशीं या नाटकाची भाषासरणी बरीच जुळते; किंबहुना ह्या नाटकांत आणि रोमिओ आणि ज्यूलियट या नाटकांत प्रणयदेवतेचें जें स्वरूप दाखविलें आहे तें सारख्याच दर्जाचें म्हणजे स्वैर, उच्छृखंल व पुंडपणाचें असें आहे. यावरून हीं नाटकें एकाच वेळचीं असावीं असें दिसतें. अर्थात् सन १५९४—९५ हाच त्यांचा रचनाकाळ मुक्रर ठरतो. नाटकाच्या शेवटीं ऑबेरान याच्या तोंडून जो आशीर्वाद वदविला आहे त्यावरून पहातां, हें नाटक एखाद्या विवाहप्रसंगीं करून दाखविण्याकरितां प्रथम कवीनें केलें हें स्पष्ट आहे. या नाटकांत जे नाच, गायन व देखावे वगैरे मनोरंजनाचे प्रकार दाखल केले आहेत, त्यांवरून

वरील अनुमानास बळकटी येते. त्याचप्रमाणें मधून मधून एलिझाबेथ राणीविषयीं जे स्तुतिपर उल्लेख आले आहेत त्यावरून एलिझाबेथ राणीही त्या विवाहोत्सवाला हजर असावी असेंही अनुमान निघतें. ह्या सर्व गोष्टींवरून पहातां, २६ ज्यानेवारी सन १५९५ सालीं डर्बी येथील सरदार वुइलियम स्टॅन्ले याचें एलिझाबेथ व्हीयर (*Elizabeht Vare*) इच्याशीं जें लग्न झालें त्या वेळीं हें नाटक प्रथमच करून दाखविलें असावें, असें मि. फ्ली (*Fleay*) यांचें जें म्हणणें आहे त्यांत बरेंच सत्य आहे यांत शंका नाहीं. सरदार स्टॅन्ले हा नाटकाचा शौकी होता व त्याचा भाऊ फार्डिनांड याच्या पदरीं शेक्स्पियर होता. फर्डिनांड १६ एप्रिल सन १५९४ रोजीं वारला व त्याची सरदारी उइलियम स्टॅन्ले ह्याच्याकडे वारशानें आली. त्यावरून मि. फ्ली यांचें अनुमान बरेंच संभवनीय दिसतें. कांहीं झालें तरी वरील सर्व प्रमाणें सन १५९४–१५९५ हाच रचनाकाल निश्चित करितात.

येथवर रचनाकालाचा निर्णय झाल्यावर, या नाटकाला आधारभूत कोणते ग्रंथ आहेत, ते आतां सांगूं. प्रस्तुत नाटकांत थीसियस व हिपोलायटा ह्यांचें कथानक आहे तें ज्या ग्रंथावरून कवीनें घेतलें असें म्हणतां येईल तो ग्रंथ म्हटला म्हणजे प्लुटार्ककृत 'रोमन व ग्रीक विभूतींच्या चरि-

त्रांचा संग्रह ' हा होय. ह्याचें भाषांतर सर थॉमस नॉर्थ ह्यानें शेक्स्पिअरचे हयातींतच केलें होतें. दुसरा ग्रंथ चॉसर कवीच्या कॅन्टरबरी टेल्स पैकीं ' एका सरदारानें सांगितलेली गोष्ट' ही होय. आतां प्लूटार्क याच्या ग्रंथाच्या आधारानें शेक्स्पियर कवीनें जीं नाटकें रचिलीं तीं तीन आहेतः— ' ज्युलियस सीझर ' ' अॅटनी आणि क्लियोपाट्रा' आणि ' कोरिओलॅनस.' ह्या नाटकांप्रमाणें प्रस्तुत नाटक कवीनें रचिलें नाहीं हें कोणीही सांगेल; यांत केवळ सदर ग्रंथांतील कथानकाचा सामान्येंकरून उल्लेख आला आहे इतकेंच. थीसियस याचें चरित्र पहिल्यानें प्लूटार्क ह्याच्याच ग्रंथांत लिहिलेलें आढळतें. त्यांत थीसियस राजाच्या लग्नासंबंधानें दोन गोष्टी सांगितल्या आहेत. पहिली अशी कीं, स्त्रीराज्याची अमेझान राणी अन्टिओपा हिला थीसियस ह्यानें कैद करून आणलें व तिच्याशीं लग्न लाविलें. दुसरी गोष्ट जवळ जवळ अशीच आहे. ती अशी कीं, अमेझान स्त्रियांनीं अथेन्स शहरावर स्वारी केली असतां थीसियस राजानें त्यांचा पराभव करून त्यांची राणी हिपोलायटा हिच्याशीं लग्न लाविलें. अमेझान नांवाच्या स्त्रिया महापराक्रमी व शूर होत्या. धनुष्यबाणाचा उपयोग सुलभ रीतीनें करितां यावा म्हणून त्यांनीं आपले उजवे स्तन देखील कापून टाकले होते. अशा स्त्रियांस

थीसियस राजानें जेरीस आणलें होतें. ह्या दोन गोष्टींचा उल्लेख शेक्स्पिअर कवीनें प्रस्तुत नाटकांत केला आहे. व त्याचें कारणही इतकेंच दिसतें कीं, चॉसर कवीच्या काव्यांतही एकाच गोष्टीचा उल्लेख आहे, इतकेंच केवळ नव्हे पण चासर कवीच्या गोष्टींत फिलोस्ट्रेट हा थीसियस राजाचा कारभारी होता असें वर्णिलें आहे. त्या शेक्स्पिअरच्या नाटकात दाखविल्याप्रमाणें फिलोस्ट्रेट याजकडे क्रीडाध्यक्षाचें काम असण्याचा संभव आहे. सदर कथेंत जे प्रसंग वर्णिले आहेत, तसेच प्रसंग आथेन्स शहरानजीकच्या वनांत घडून आल्याचे शेक्स्पिअर कवीनें वर्णिले आहेत. थीसियस राजाला शिकारीचा नाद होता असें त्याचें वर्णन आहे. या वर्णनाशीं व सदर नाटकांतील शब्दांशींही मूळ कथानकांतील शब्द जुळतात. पिऱ्यामस व थिसबी हें एक गर्भनाटक ह्या नाटकांत घातलें आहे, त्याचा येथे निर्देश करणें अगत्याचें आहे. तें कथानक ओव्हिड-कृत मॅटोमॉरफोसिस ( *Metamorfocis* ) ह्या ग्रंथांतून गेतलें आहे. सदर ग्रंथाचें भाषांतर १५६५ सालीं आर्थर गोल्डिंग ह्यानें केलें होतें. शेक्स्पियर कवीला हा ग्रंथ फार आवडत होता असें दिसतें. पुराण कथांसंबंधीं जे उल्लेख त्यानें आपल्या नाटकांतून ठिकठिकाणीं केले आहेत ते बहुधा याच ग्रंथांच्या अत्यंत परि-

चयाचें फळ होय असें म्हणावयास चिंता नाहीं. पिऱ्यामस व थिसबी ह्या गर्भनाटकाचा कांहीं भाग तर मूळ ग्रंथाशीं फार जुळतो. आतां पिरॅमिस व थिसबी ह्यांची गोष्ट एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत फार प्रसिद्ध होती. केवळ ओव्हिडच्या भाषांतरांवरून शेक्स्पियर कवीनें ही कथा घेतली असें म्हणावयास कांहीं आधार नाहीं. सोळाव्या शतकांतील अनेक लेखकांनींही त्या गोष्टीस अनुलक्षून काव्यरचना व गद्यग्रंथ रचिले आहेत. म्हणून शेक्स्पियर कवीनें ओव्हीड कवीच्या ग्रंथाचाच आधार ह्या गर्भनाटकास घेतला आहे असेंच म्हणावयास नको. बरें, शेक्स्पियर कवीनें प्रीतिफुलाची जी कल्पना घेतली आहे ती कोठून आणली हें जर पाहिलें तर तिला जुना आधार एकेच ठिकाणीं आढळतो. चॉसर कवीच्या काव्यांतील व्यापाऱ्याच्या गोष्टीत हा उल्लेख आहे. तो असा कीं, एका ह्याताऱ्याची बायको व्यभिचारी होती. तिचा तो दुराचार तिच्या नवऱ्याचे दृष्टोत्पत्तीस यावा, म्हणून भुतांचा राजा प्लूटो आणि त्याची राणी यांनीं एका फुलाच्या रसाचा उपयोग केला, असें त्यांत वर्णन आहे. या गोष्टीवरून शेक्स्पियरला ही कल्पना सुचली असावी, असें मानावयास आणखी एक सबळ कारण असें आहे कीं सदर गोष्टींत वर्णिलेल्या

भुतांच्या राजाराणीच्या जोडीप्रमाणें त्यांनींही या नाटकांत ऑबेरान व टिटॅनिया ही जोडी आणली आहे. कित्येकांचे मतें मॅन्टोमेयर ( Mantomayar ) ह्या स्पॅनिश लेखकानें ' डायाना एमोरेडा ' ( Diana Amorade ) म्हणून जी कादंबरी लिहिली, तींतही अशाच प्रकारच्या फुलाचा उल्लेख आहे. या स्पॅनिश कादंबरीचें भाषांतर ' बार्थोलोमू यॅंग' ( Bartholomew Yong) यानें १५९८ सालीं प्रसिद्ध केलें. परंतु जरी तें १५९८ यांत प्रसिद्ध झालें, तरी प्रसिद्ध होण्यापूर्वी सोळा वर्षें तें लिहिलें होतें. तेव्हां त्याची हस्तलिखित प्रत शेक्‌स्पियर कवीच्या पहाण्यांत आली नसेल असें म्हणवत नाहीं, व केवळ तेवढ्याच कारणावरून कांहीं टीकाकार प्रस्तुत नाटक १५९८त रचिलें असें जें ह्मणतात तेंही चुकीचें आहे असें ठरतें.

आतां तिसरें कलम प्रस्तुत नाटकाची लोकप्रियता, त्यासंबंधानें लिहावयाचें. प्रस्तुत नाटक मुख्यत्वेंकरून कोणत्यातरी विवाहोत्सवप्रसंगाकरितां रचिलें असल्यामुळें, सदर प्रसंगीं त्याचे प्रयोग प्रथम झाले असतील हें उघड आहे. तथापि तें प्रेक्षक मंडळीस कितपत रुचलें हें सांगतां येणें कठीण आहे. तथापि एवढें ह्मणतां येईल कीं, सदर प्रसंगीं मंडळी नियमित असते व त्यांची बहुधा कथानकाशीं ओळख झालेली असते. अर्थात् या नाटकांतील मनोमय

सृष्टींतील बराच भाग त्यांस कल्पनेनें कल्पून समजण्यास कांहीं अडचण पडत नाहीं व त्यापासून होणाऱ्या आनंदांतही उणेपणा येत नाहीं. यावरून पहातां प्रेक्षकांचें मनोरंजन करण्यास हें नाटक समर्थ झालें असेल असें मानावयास चिंता नाहीं. आतां ह्या मानण्यापलीकडे त्याच्या लोकप्रियतेची विशेष हकीकत सांगण्यासारखी उपलब्ध नाहीं. तथापि प्रस्तुत नाटकाचा इतिहास मोठा मौजेचा आहे, तो मात्र येथें सांगितल्यावांचून रहावत नाहीं. ह्याप्रमाणें ह्या नाटकानें पंचवीस तीस वर्षें लोकांचें मनोरंजन केल्यावर त्याजवर दुष्टग्रहांची दृष्टि पडली, असें ह्मणावें लागतें. कारण पुढें सदरहु नाटक लोकांपुढें येऊं नये असाच योग आला. सन १६३१ च्या सप्टेंबर ता. २७ रविवार रोजीं लिंकन येथील धर्माध्यक्ष जॉन वुइल्यम्स याच्या घरीं या नाटकाचा प्रयोग झाला. त्या काळीं धर्मसुधारणेचें फार बंड माजून, प्यूरिटन लोकांचें सर्वत्र वर्चस्व झालें होतें. रविवारासारख्या पवित्र दिवशीं अशा नाटकाचा प्रयोग केल्यामुळें प्यूरिटन मंडळीस फार राग आला, आणि जॉन स्पेन्सर नांवाच्या एका धर्मोपदेशकानें तर वरील धर्माध्यक्षास धडधडीत एक पत्र पाठवून कळविलें कीं, बॉटमचें सोंग घणाऱ्या वुइल्सन या सोंगाड्याला चांगली शिक्षा झाली पाहिजे. ही शिक्षा लवकरच अमलांत आली; ती अशी

कीं, मंगळवारीं सकाळीं साहा वाजल्यापासून संध्याकाळीं साहा वाजेपर्यंत सदरहु इसमास खोड्यांत अडकवून धर्माध्यक्षाच्या देवडीवर बसविण्यांत आलें, त्याच्या तोंडावर गाढवाचा मुखवटा बसविला, त्याच्यापुढें एक गवताची पेंढी ठेविली व गळ्यांत पुढील लेख लिहून पाटी अडकाविली:—

Good people I have played the beast
and brought ill things to pass,
I was a man but thus have made
myself a silly Ass.

( भल्या माणसांनो, मीं पशूसारखें वर्तन केलें व वाईट कामें केलीं. मी मनुष्य होतों खरा, पण अशा रीतीनें स्वतःला मीं गाढव बनविलें आहे. )

पुढें क्रॉम्वेलच्या अमदानींत तर प्यूरिटन लोकांनी किती कहर करून सोडला, तो इतिहासज्ञांस माहीतच आहे. त्यांनीं नाटकगृहांवर करडी नजर ठेविली, इतकेंच केवळ नव्हे; तर नटांवरही आपला कर्डा अंमल गाजविला अशा स्थितींत वरील नाटकाची छाटाछाटी होऊन, त्याचीं अनेक रूपांतरें झालीं व रंगभूमीवर येऊं लागलीं. यांत मौजेची गोष्ट ही होय कीं, या नाटकांत पऱ्यांच्या हकीकतींच्या रूपानें जी स्वप्नसृष्टिमय जादू कवीनें आणिली आहे, तिच्या प्रभावांतून लोकांचीं मनें सहसा मुक्त होतना असें दिसून आलें. मग बॉटम कोष्ट्याचा विनोद ह्या

नांवाचा एक चुटका ऊर्फ प्रहसन प्रसिद्ध झालें व त्याचा प्रसारही बराच झाला. मि० मॅलोन ह्या टीकाकारानें वरील प्रकारच्या प्रस्तुत नाटकाच्या रूपांतराचीं कित्येक पुस्तकें मिळविण्याची खटपट केली, तों त्याचीं कमींत कमी पांच रूपांतरें हातीं आलीं. पुढें लवकरच क्रॉम्वेलचा अवतार लयास गेला व दुसरा चार्लस राजा गादीवर आला. त्या वेळीं मात्र या नाटकाचें स्वरूप पूर्वीप्रमाणें होऊन, त्याचे प्रयोग धूमधडाका रंगभूमीवर होऊं लागले. असा हा प्रयोग पेपिज (Pepis) हा गृहस्थ पहाण्यास गेला होता. पेपिज ह्यानें आपल्या वेळीं घडलेल्या गोष्टींची जी रोजनिशी ठेविली होती, ती अद्याप चांगली शाबूत आहे व तिचा इतिहासकारांसही फार उपयोग होतो. त्या रोजनिशींत सप्टेंबर २९ सन १६६२या तारखेला पुढील नोंद केलेली आढळते. ' रॉयल थिएटरांत ' मधुयामिनीस्वप्नप्रदर्शन ' हें नाटक पहावयास गेलों. मीं तें पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें व यापुढेंही पहाणार नाहीं. या नाटकासारखें नीरस नाटक दुसरें कोणतेंही असेल किंवा होईल असें वाटत नाहीं. ' वर सांगितल्याप्रमाणें त्या वेळीं या नाटकाचीं अनेक रूपांतरें झालीं. पण त्यांतून आतांपर्यंत एकही टिकाव धरून राहिलें नाहीं. त्यावरूनच त्यांचा निरसपणा व मूळ नाटकाची उत्कृष्टता हीं मात्र व्यक्त होतात. शेवटीं गेल्या शत-

कांत मूळ नाटकाचे प्रयोग मूळच्या स्वरूपांत होऊं लागले व ते लोकप्रियतेसही पात्र झाले. ते इतके कीं, नवीन नाटकाप्रमाणें त्याची आवड अद्यापि ताजी आहे. आतां, पेपिज हा हें नाटक नीरस कां ह्मणतो ह्याचें कारण अंमळ येथें पाहिलें पाहिजे. तें समजणें फारसें कठीण नाहीं. वस्तुतः हें नाटक काव्य आहे व काव्य ह्या दृष्टीनें वाचिलें असतां तें वाचकाचें मन तल्लीन करून सोडतें. नाटक दृश्य आहे,--तेव्हां प्रस्तुत नाटक पाहतांना त्यांत दोष दिसूं लागतात. हे दोष रहाण्याचें कारण असें कीं, हें लिहितांना कवीची नाट्यकुशलता फारशी परिपक्व झालेली नव्हती असें टीकाकारांचें ह्मणणें आहे; व तें खरें आहे. शेक्स्पियर कवीची प्रतिभा लोकोत्तर होती व तो एक बुद्धिमान् कवि होता, याचप्रमाणें तो नाटकें लिहिणारा कुशल नाट्याचार्यही होता, याविषयीं कोणाचाही वाद नाहीं. परंतु प्रतिभा व बुद्धिमत्ता हे गुण जन्मसिद्ध ईश्वरी देणग्या आहेत. त्याप्रमाणें उत्तम नाटकें लिहिण्याचा गुण जन्मसिद्ध नाहीं. हा केवळ कोणाच्याही कर्तबगारीवर अवलंबून राहाणारा गुण आहे. नाट्यरचनेंत कुशलता मिळविण्यास परिश्रम पाहिजेत, इतकेंच नव्हे तर अनुभवही बराच पाहिजे. पण ह्या नाटकाच्या रचनाकाळीं शेक्स्पियरला मिळावा तितका अनुभव मिळालेला नव्हता

ह्मणूनच हे दोष राहिले आहेत. रंगभूमीवर खेळ चालतो तेव्हां नाटकाचा खरा रंग नजरेस येतो. कारण रंगभूमीवर प्रेक्षकांच्या नजरेसमोर सर्व गोष्टी चाललेल्या असतात. परंतु ग्रंथ वाचतांना वाचक आपल्या कल्पनेसमोर सर्व देखावे ह्वे तसे उभे करूं शकतो. तेव्हां त्याच्या कल्पनेच्या मनोमय रंगभूमीवर कशाचीच उणीव रहात नाहीं, व यदाकदाचित् कांहीं व्यंग राहिल्यास तें त्यास सहज भरून काढतां येतें. परंतु बाह्यरंगभूमीवर ज्या गोष्टी त्यास दिसतात, त्या असाव्या तशा नसतात; मग त्यांत जो मूळचा उणेपणा असतो तो कायम राहून प्रेक्षकांचा विरस होतो. या व अशा कांहीं कारणांमुळें पेपिज ह्याचा ग्रह प्रस्तुत नाटकासंबंधानें उलटा झाला असावा. ह्याशिवाय धर्मशोधनाचें जें बंड त्या वेळीं लोकांमध्यें माजलें होतें, त्याचाही प्रभाव वरील ग्रह होण्यांत गाजला नसेल असें ह्मणवत नाहीं.

याप्रमाणें लोकप्रियतेचें कलम संपल्यावर प्रस्तुत नाटकाचें नामकरण कितपत यथार्थ आहे तें पाहूं. ह्या नाटकांत मुख्य रस शृंगार हें आरंभीं सांगितलेंच आहे. परंतु त्याचा परिपोष करण्याकरितां ज्या अद्भुत रसाची योजना केली आहे तो रसही प्रमुखत्वानेंच कवीनें योजिला आहे. कारण शृंगाराच्या निरनिराळ्या छटा म्हणजे प्रणयिजनांच्या अंतःकरणांत उत्पन्न होणारे विविध

विकार चांगल्या रीतींनें दाखविण्यासाठींच, ज्या अद्भुतरसाचा आश्रय कवीनें केला आहे तो अद्भुत रस उत्पन्न करणाऱ्या ज्या पऱ्या, त्यांना शृंगारसागरावर उत्पन्न केलेल्या वादळांत आणून सोडिलें आहे. 'टेंपेस्ट'नाटकांत शृंगार व अद्भुत ह्या दोन्ही रसांची जोड साधली आहे खरी; परंतु तेथें अद्भुत रस सर्वस्वीं शृंगाररसाचा साह्यकर्ता असा केला आहे. पहा कीं, टेंपेस्ट नाटकांत प्रॉस्पेरो स्वतः अलिप्त राहून सर्व पात्रांना चलन देतो; परंतु प्रस्तुत नाटकांत पहावें तों लायझँडर व हर्मिया, डिमेट्रियस व हेलेना ह्या जोडप्यांबरोबरच पऱ्या व खुद्द थीसियस राजा देखील प्रीतिसरितेच्या भोंवऱ्यांत सांपडून-

प्रणय तरंगासवें
विवश वहाती जवें ।
गतिमुळें न पहावें
जलरवें न ऐकवे ॥

अशा स्थितीला प्राप्त होतो. फार काय सांगाव, पण आथेन्स नगरांतील कामकरी लोकसुद्धां 'पिरॅमस आणि थिसबी' ह्या नाटकाचा जो खेळ करून दाखवितात, त्यांतसुद्धां शृंगारमिश्र अद्भुत रसाचेंच प्राबल्य दिसून येतें. अशा रीतीनें सौम्य व हृदयंगम अशा दोन रसांनीं ओतप्रोत भरलेलें हें नाटक नांवाप्रमाणेंच स्वप्नसृष्टिमय झालें आहे. तें वाचीत

304601

असत.ना आपण स्वप्नांतच आहों कीं काय असा भास होतो. ‘ शुष्कप्रेमदर्शन ’ हें त्या फुलाचें नांव ! काय त्याचा प्रभाव ! त्याच्या रसानें जे चमत्कार घडून आले आहेत आणि पक या परीच्या तडाख्यांत तें फूल सांपडतांच त्यानें जिकडे तिकडे जो मजेशीर कल्होळ करून सोडला आहे; तसे चमत्कार व तसा कल्होळ स्वप्नसृष्टीवांचून कोठें तरी दिसून येईल काय ? फुलांत निजणारी, घुबडाला भिणारी, आपल्या सेनेला पाकोळ्यांच्या पंखांचा पोषाख देणारी, ती टिटॅनिया परी कोणीकडे, आणि गाढवाचें तोंड लावलेल्या आडदांड बॉटम कोष्टयाला भाळून जाते ती— एखाद्या पामर मानव स्त्रीप्रमाणें दिसणारी परी कोणीकडे ? असा देखावा जर कोठें दिसला तर तो स्वप्नसृष्टींतच दिसेल हें उघड आहे. वसंतकाळीं मन बेफाम होऊन, लावण्यस्वरूप धारण केलेल्या निसर्गदेवतेच्या सौंदर्यानें मोहित होतें, अशा त्या मनोमोहन मधुमासांत मात्र वर लिहिलेल्या प्रकारचीं स्वप्नें पडलीं तर पडतील. मग अशा स्वप्नांत स्थळ, काळ वगैरे बंधनांचा मेळ कसा असेल ! व अशा बंधनांची अशा स्वप्न- सृष्टींत गरजही नाहीं. जगांत जेवढें म्हणून सुंदर असेल तें सर्व एकवटून स्वप्नसृष्टींत रसिकांपुढें हात जोडून उभें राहतें. अशीच हकीकत ह्या नाटकांत वर्णिली असल्यामुळें

तें वाचीत असतांना सहृदय वाचक देहभान विसरून जातो— जणूं काय फुललेल्या चंपकाच्या वृक्षावरून येणारा सुगंध त्याच्या घ्राणेंद्रियास सुखवीत आहे व लांबून ऐकूं येणाऱ्या गीताचे ध्वनि त्याच्या कानास आनंदवीत आहेत असा त्याला भास होतो ! मग ह्या गीतध्वनीबरोबरच कल्पनेच्या भरांत आथेन्स नगराजवळील अरण्यामध्यें तो जाऊन पडतो, व स्फटिक निर्झराच्या कांठीं शीतल जलाच्या तुषारांत सृष्टिलावण्याच्या सुखाचा अनुभव तो घेतो ! अशी कांहीं विलक्षण जादु ह्या नाटकांत भरली आहे. तर मग हें नाटक ह्मणजे एक स्वप्नच आहे असें कां ह्मणूं नये ? पक ही परी शेवटीं सांगते कीं, ह्या गोष्टी जर कोणाला खोट्या वाटतील तर त्यांनीं हें स्वप्न पडलें असेंच समजावें. ऑबेरान याची इच्छा पाहिली तर अशीच दिसते कीं, सर्वांनीं हें स्वप्नच पडलें असें धरून चालावें. टिटॅनिया राणी देखील देहभानावर येतांच ह्मणते—'स्वप्नांत मीं कितीतरी चमत्कार पाहिले हो ! ' घोंटाळ्यांत पडलेलीं प्रणयबद्ध जोडपींसुद्धां झोंपेंतून उठल्याप्रमाणें करून, आपणांस स्वप्नच पडलें कीं काय असें आश्चर्य दाखवितात. थीसियस राजाही असेंच समजतो. नाटकांतील मुख्य मुख्य पात्रांच्या मनाची स्थिति जर अशी आहे, तर मग सहृदय वाचकांनीं व प्रेक्षकांनीं तरी आपण हें स्वप्नच पाहिलें असें कां

समजूं नये ? एकंदरींत नाटकाचें नांव अगदीं यथार्थ आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

प्रस्तुत नाटकाचा काळ मधुमास ह्मणजे वसंतऋतु हा आहे ह्या काळांत प्रबळ होणाऱ्या मनोवृत्तींच्या साम्राज्यांत अद्भुत गोष्टींचा गुलाल कवीनें यथास्थित उधळून दिला असल्यामुळें, कल्पनासृष्ट सत्वांचा ह्मणजे पऱ्यांचा बराच सुळसुळाट या नाटकात माजला आहे. यास्तव ह्या पऱ्या कोण व त्यांचे व्यापार काय असतात वगैरे माहिती येथें वाचकांस सादर केली असतां विशेष उपयोगाची होइल असें वाटतें. पऱ्यांची कल्पना शेक्स्पियर कवीच्या वेळीं कांहीं नवीन होती असें नाहीं. त्यांच्यासंबंधाच्या गोष्टी बहुतेक राष्ट्रांत फार प्राचीन काळापासून दंतकथांच्या रूपानें किंवा अन्य रीतीनें नेहमीं वास करीत असतात. पण पऱ्यांच्यासंबंधाच्या अगदीं साध्या गोष्टी घेऊन, शेक्स्पियर कवीनें त्यांच्या आधारावर फारच मजेदार नाट्यरचना केली आहे, किंबहुना प्रत्येक जुन्या गोष्टीला नवें स्वरूप देऊन ती नवी दिसेलशी केली आहे असेंही म्हणावयास चिंता नाहीं. पऱ्यांसंबंधाची कल्पना फार जुनी म्हटली म्हणजे इंग्लंडांत तरी चॉसर याच्या वेळेपासूनची आहे. सदर कवीच्या कॅन्टरबरी टेल्स नामक काव्यांत जी व्यापाऱ्याची गोष्ट आली आहे व बाथ येथील सुगरणीची गोष्ट आली आहे—त्या दोहोंतही

पऱ्यांच्या दरबाराचें वर्णन दिलें आहे. त्यातून 'च्यापाऱ्याच्या गोष्टीशीं' तर प्रस्तुत नाटकांतलि हकीकतीचा फारच मेळ आहे. सदर गोष्टींत पऱ्यांचा राजा व राणी यांचें खडाजंगी भांडण होतें तसें या नाटकातही तें होतें, इतकेंच केवळ नाहीं, पण ऑबेरान जसा दोन्ही प्रणयी जोडप्यांचा समेट करून देतो तसा त्या गोष्टींतील पऱ्याचा राजाही पतिपत्नीमधील भांडण मिटवितो. परंतु या पऱ्यांच्या राजाला ऑबेरान म्हणून जें नांव दिलें आहे, तें शेक्स्पियर कवीनेंच दिलं आहे. तें नांव तरी मूळ इंग्रजींतलें नसून फ्रेंच भाषेंतलें आहे. बरें, फ्रेंच भाषेंत तें कोठून आलें हें पाहूं गेलें असतां, तें मूळचें जर्मन भाषेंतलें आहे असें आढळून येतें. फ्रेंच भाषेंत त्याला आल्बेरान किंवा बल्बेरान म्हणतात ( Alberon or Bulberon ) व तें जर्मन भाषेंतील आल्बेरिक किंवा एल्फरिक (Alberick or Elferick ) या नांवावरून आलें आहे. एल्फारिक याचा अर्थ 'पऱ्याचा राजा' असा आहे. चासरनें आपल्या काव्यांतील पऱ्यांच्या राजाचें नांव प्लूटो असें दिलें असतां, शेक्स्पियरनें हें जें जर्मन नांव घेतलें तें फ्रेंच भाषेंतील ड्यूक ह्यू डी बोरड्यू (Duke Hugh de Bordause) या पद्यात्मक कादंबरीचें लॉर्ड बर्नर यानें जें भाषांतर इंग्रजींत केलें होतें त्यावरून घेतलें असें दिसतें. तथापि हें

नांव शेक्स्पियर कवीनें पहिल्यानेंच घेतलें असें नाहीं. ग्रीनकृत चवथा जेम्स या ऐतिहासिक नाटकांत 'पऱ्यांचा राजा ऑबेरान' हें पात्र घातलें आहे. हें ग्रीनचें नाटक १५९८ सालापर्यंत छापून निघाल नव्हतें खरें; परंतु त्या सालापूर्वींच तें लिहून तयार झालें होतें. जरी ग्रीनचा ऑबेरान व शेक्स्पियरचा ऑबेरान यांच्यांत जमीनअस्मानाचें अतर आहे, तरी शेक्स्पियर कवीला त्या नाटकाची बहुधा माहिती असावी.

आतां टिट्यानिया राणीची हकीकत काय आहे हें जर पाहिलें तर असें आढळून येतें कीं,ग्रीक भाषेंत तिला डायना Diana असें ह्मणत असत.डायना ही ग्रीक भाषेंतील सौंदर्यदेवता असून टिट्यानियस ह्मणजे सूर्य, त्याची ही बहीण. इतर कांहीं ग्रंथांत पऱ्यांच्या राणीचें नांव 'मॅब राणी' असें दिलें आहे. व चॉसरनें तर त्या राणीला प्रास्पेरिना असें नांव दिलें आहे.

सर्व पऱ्यांमध्यें खोडसाळपणाचा व विनोदाचा पुतळा जो पक्, त्याचें खरें मूळचें इंग्रजी नांव 'राबिन फक्कडराव' (अथवा Hob-goblin); पक हें कांहीं मूळचें विशेषनाम नाहीं. तें सामान्यनाम असून त्याचा अर्थ 'परी' किंवा 'पिशाच'असा आहे. निरनिराळ्या भाषेंत त्याचे पर्याय शब्द कोणचे आहेत हें पाहूं गेलें तर त्या

सर्व शब्दांचा अर्थ ‘परी’ असाच आहे. परंतु शेक्स्पियर कवीनें ज्या परीला या नाटकांत पक् असें नांव दिलें आहे तिला सामान्यतः रॉबिन् फक्कडराव किंवा बागुलबोवा (Robion good fellow) असें म्हणण्याची वहिवाट असे. तो सामान्यतः बायकांना व नोकरांना त्यांच्या गृहकृत्यांत मदत करतो किंवा कधीं त्रासही देतो, असें समजत असत. प्रवाशांना भलत्याच ठिकाणीं चूड दाखवून आडमार्गास लावणारा आग्यावेताळ तो हाच अशीही त्याच्यासंबंधानें लोकांची समजूत होती. त्याच्यासंबंधाच्या भोळसर व खेडवळ लोकांच्या समजुती एकत्र करूनच शेक्स्पियरनें हें पात्र बनविलें आहे. फार काय सांगावें?-ह्यातार्‍याकोतार्‍यांच्या व बायाबापड्यांच्या दंतकथांचा मेळ घालून असा हा अद्वितीय विनोदी विदूषक बनविल्याबद्दल शेक्स्पियरची जेवढी तारीफ करावी तितकी थोडीच ! चंद्राप्रमाणेंच पर्‍याही पृथ्वीभोंवतीं भटकत असतात. त्यांना सूर्यप्रकाशाची भीति वाटत नाहीं हें खरें, पण चंद्रप्रकाशावरच त्यांची विशेष भक्ति असते. शेक्स्पियर कवीनें त्यांचे स्वभाव असे रंगविले आहेत कीं, त्यांना उच्चत्तम मनोविकारांचा किंवा नीतिविषयक कल्पनांचा गंधही नाहीं. प्रणयी जोडप्यांचें दुःख पाहून त्यांना दुःख तर होत नाहींच, पण उलटा हा सगळा मूर्खपणाचा बाजार पाहून मौज वाटते व त्यांची करमणूक

होते. विचारपूर्वक नाटक वाचलें तर असें दिसून येईल कीं, मनन करण्यासारखें विचारपूर्ण असें एकही वाक्य पऱ्यांच्या तोंडीं कवीनें घातलेलें नाहीं. मानवाच्या मनावर त्यांचा मुळींच दाब नाहीं. मानवीपात्रांना ज्या प्रेरणा पऱ्यांकडून होतात त्या 'प्रीतिरसा'सारख्या बाह्य व भौतिकसाधनांच्याद्वारां होतात, त्यांची सर्व कालक्रमणाही विषयोपभोगांत होत असते. फुलांत निजणें व चांदण्यांत गाणें व नाचणें हें त्यांचें सुख सर्वस्व! त्यांना दुःख काय तें एकच! तें म्हटलें ह्मणजे एकमेकांचा मत्सर; एकमेकांच्या आणि मानवीप्राण्यांच्या खोड्या करणें हीच त्यांच्या आयुष्याची इतिकर्तव्यता. हे सर्व गुण पक ह्या परीच्या अंगीं अगदीं ओतप्रोत भरलेले दिसतात. 'तुफान'नाटकांतलि पऱ्या व या नाटकांतील पऱ्या यांत बराच सारखेपणा आहे यांत संशय नाहीं. तथापि कांहीं बाबतींत जे फरक आहेत ते बरेच महत्वाचे आहेत. पहिलें असें कीं, या नाटकांत पऱ्यांचें मानवांवर वर्चस्व आहे. 'तुफान' नाटकांत त्या मानवांच्या आधीन आहेत. सदर नाटकांत प्रास्पेरो पऱ्यांना ताब्यांत ठेवितो आणि ह्या नाटकांत पहावें, तों ऑबेरान मानवीप्राण्यांना वाटेल तसा नाचवितो. दुसरा फरक हा कीं, या नाटकांतील पऱ्यांविषयींचें वर्णन लोकांत प्रचलित असलेल्या दंतकथांवरून घेतलें आहे. त्यांत कवीनें जरी

थोडेबहुत फेरफार केले असले तरी ते लोकांच्या समजुतींना धरूनच केले आहेत. परंतु ' तुफान'नाटकांतील पऱ्या सर्वस्वी शेक्स्पियर निर्मित सृष्टींतल्या आहेत, समाजांतील कल्पनांचें त्यांना वारेंही नाहीं. पक म्हणजे दंतकथांतल्या 'रॉबिनगुडफेलो'चें एक संभावित रूपांतर होय. परंतु 'एरियल ' हा कवीचा साक्षात् मानसपुत्रच आहे असें ह्मटल्यास चूक होणार नाहीं.

वर प्रस्तुत नाटकांतील विशेष गुण कोणता तो सांगितला; आतां त्याचें सामान्य स्वरूप काय आहे तें अंमळ पाहूं—या नाटकांत मुख्य कथानक थिसियस राजा व अमेझान स्त्रियांची राणी हिपोलायटा ह्यांच्या लग्नाची हकीकत, हें आहे. यांतच पुढें लायझेंडर व हर्मिया आणि डिमेट्रीयस व हेलेना यांच्या विवाहाची हकीकत कवीनें गोंवून दिली आहे, या हकीकतीवरून पाहतां हर्मियेच्या हट्टी वर्तनानें अनायासेंच हिपोलायटा राणीच्या शूर परंतु स्वच्छंदी अतएव हट्टी वर्तनावर मात्रा दिल्यासारखें झालें आहे. व हीं गोष्ट भर दरबारांत दर्शित केली असल्यामुळें तिला विशेषच महत्व आलें आहे. नाहींतर घरोघर अशा हट्टी स्वभावाच्या स्त्रियांचे नमुने किती तरी असतील ! हिपोलायटा राणीचा हट्टीपणा हा गुण सामान्य स्त्रियाच्या हट्टीपणासारखा नसून, त्यांत शूरत्वाचा अंतर्भाव केला आहे.

लायझँडर व हर्मिया इत्यादि प्रणयबद्ध जोडप्यांच्या वर्तनांतला स्वैरगुण तिच्या वर्तनांत नाहीं. ती केवळ स्वतःच्या अंगच्या बलवत्तेमुळें हट्टी दिसते इतकेंच. ह्या जोडप्यांच्या वर्तनाशीं मुकाबला करतां यावा म्हणून कीं काय ऑबेरान व टिटॅनिया हें जोडपें आणिलें आहे. त्यांच्या स्वैरवर्तनास मुळींच धरबद नाहीं. तथापि टिटॅनिया राणीच्या हट्टीपणांत स्वैरवर्तनाचा गुण विशेषतः दिसून येतो. याप्रमाणें या तीनही जोडप्यांच्या वर्तनांतला स्वैरपणा लक्षांत ठेवण्यासारखा आहे व प्रत्येकाच्या परस्पर तुलनेनें त्याचें जें विशेष स्वरूप लक्षांत येतें, त्याकडे लक्ष देण्यासारखें आहे.

याप्रमाणें एकांत एक तीन स्वतंत्र कथानकें येथें एकच गुंफलीं गेलीं असून, त्यांचें सामान्यस्वरूप त्यांतील नायकनायकांच्या प्रेमांतलें स्वैरवर्तन हें आहे. शेवटलें गर्भकथानक पिरॅमस व थिसबी यांजमधील प्रेम हें आहे. पण त्यांत वर्तनाचा कांहींच संबंध नाहीं. पण त्यांजमधील प्रेमसंबंध मात्र दर्शविला आहे व तोही पहिल्या तीन कथानकांतल्या प्रेमसंबंधाशीं तुलना करून पाहण्यासारखा आहे, यांत शंका नाहीं. यावरून पाहतां थिसियस राजाच्या कथानकानें पुढील दोन कथानकें व एक उपकथानक या सर्वांस बांधून घेतलें आहे व राणीच्या

वर्तनांतल्या स्वैरगुणानें पुढील तीनही कथानकांस संबद्ध केलें आहे. सारांश, सर्व वेगवेगळीं कथानकें संबद्ध होऊन, सर्व नाटक संपूर्ण व एकच आहे, असें वाटण्यास कारण झालें आहे. सर्व कथानकें वेगवेगळीं तर खरीं, पण कांहीं एक विवक्षित गुणानें संबद्ध करून सर्वांस पूर्णता व अखंडपणा आणण्याची खुबी जी शेक्स्पियर कवीच्या नाटकांत वाखाणण्यासारखी आहे तींत विस्खळीतपणा नाहीं. आरंभापासून समाप्तीपर्यंत अस्खलित सारखेपणा व पूर्णता हे गुण दिसून येतात; व तेणेंकरून सर्व नाटकास भरवोसपणा येऊन रंग चढतो.

आतां **पर्यालोचनास** आरंभ करूं. प्रथमतः **पहिला अंक** व **पहिला प्रवेश**—थिसियस राजाचा दरबार भरला असून, त्याची भावी राणी सिंहासनारूढ झाली आहे असा देखावा दिसतो. यांत राजाचीं व इतर पात्रांचींही जीं भाषणें झालीं आहेत त्यांतला कवित्वगुण लक्षांत ठेवण्यासारखा आहे. थिसियस राजा सुरुवातीलाच " वियोगविव्हल होऊन जें म्हणतो त्यांत चंद्राच्या मंदपणाविषयीं तो त्यास दोष देतो व मरणवश झालेल्या आईच्या व स्वच्छंदी मुलाच्या चिंतातुरपणाचा उल्लेख करतो तो फारच मौजेचा आहे पुढें. क्रीडाध्यक्षांशीं केलेल्या त्याच्या भाषणांतलें कवित्व पहाण्यासारखें आहे.

नंतर हर्मियेच्या भाषणांत कवित्वगुणच दिसून येतो. अशीं भाषणें सामान्य व्यवहारांत कधीं कोणाच्या ऐकण्यांत येत असतील असें वाटत नाहीं, तरी त्या भाषणांतलें समर्पकत्व लक्षांत ठेवण्यासारखें नाहीं, असें कोण म्हणेल ?

लायझँडर हा इजियस याला काय उत्तर देतो, त्याकडे अंमळ लक्ष देण्यासारखें आहे. त्यांतला अश्लीलपणा केवळ शेक्स्पियर कवीचाच आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. असा चावटपणा त्याच्या नाटकांत जागोजाग आढळतो, पण तो योग्य प्रसंगीं व हलक्या पात्रांतच आढळतो व त्यापासून हास्यरसाची लहर कोणाही प्रेक्षकाच्या किंवा वाचकांच्या हृदयांत उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं. हा चावटपणा किती नाजूक आहे! एका तरुण पुरुषाशीं एका म्हाताऱ्या पुरुषाचें लग्न ! ही कल्पनाच किती विचित्र आहे ! हे शब्द उच्चारतांच किळस व त्याबरोबर हंसें यांची मात्र लहर उत्पन्न होते !

हर्मियेच्या भाषणांत स्वतःविषयीं झाडावरील फुलांच्या तुलनेची कल्पना आली आहे. तिच्याशीं सदृश असा पुढील श्लोक वाचून पाहण्यासारखा आहे.

कुसुमस्तबकस्येव द्वे वृत्ती तु मनस्विनः—।
सर्वेषां मूर्ध्नि वा तिष्ठेत् विशीर्येत वनेऽथवा ॥

भर्तृहरि.

ह्या श्लोकांतील फुलाच्या कल्पनेच्या हृदयंगमपणाकडे लक्ष दिलें असतां शेक्स्पियर कवीनें कोणकोणत्या ग्रंथांतून कशा कशा रीतीनें रस काढून घेतला आहे हें लक्षांत घेतलें असतां त्याच्या कुशलतेची तारीफच करावी लागते. कदाचित् नभोमंडलांत तळपणाऱ्या सहस्रकर सूर्यानें जसा अखिल भूमंडळांतून जलसंचय शोषून घेऊन,

आदत्ते हि रसं रविः ॥
सहस्रकर उत्स्रष्टुं ॥ शाकुंतल.

यांत वर्णिल्याप्रमाणें पुनः आपणांस अर्पण करण्याचें काम अव्याहत चालूं ठेविलें असतें. तसाच क्रम कवीचाही आहे. ठिकठिकाणाहून प्रत्यक्ष किंवा पर्यायानें संबद्ध कल्पना किंवा तिचा अंश एकत्र करून वाचकांपुढें ठेवण्यांतच कवीची कुशलता असते.

पृष्ठ १२ येथें लायझँडर याचे भाषणांत सवास गट्ट करून बसणाऱ्या काळाचें माहात्म्य वर्णिलें आहे व त्यास काळ्याकुट्ट मेघमालेंत गट्ट होणाऱ्या विद्युत्तेजाची उपमा दिली आहे, ती किती समर्पक व उदात्त आहे !

पृष्ठ १७ व १८. ह्याच प्रवेशांत ह्या नाटकांतलें मुख्य कृत्य काय आहे त्याचा कवीनें थोडक्यांत निर्देश केला आहे. येथें हर्मिया, लायझँडर व डिमेट्रियस यांच्या भाषणांतील कवित्वपूर्ण स्वारस्य लक्षांत ठेवण्यासारखें

आहे. त्यांतील कोटिक्रम शुद्ध कल्पनामय व कवित्वमय आहे. हर्मिया काय आणि हेलेना काय, या दोघी मुलींना प्रौढदशा प्राप्त झाली असतांही व शिक्षणाचा बराच संस्कार मनावर झाला असतांही, त्यांच्या वर्तनांतला स्वैरपणा विचारणीय नाहीं असें कोण म्हणेल ? लायझँडर याच्या भाषणांत चंद्रप्रकाशाचें वर्णन आलें आहे; व तशा शुभ्र व स्वच्छ प्रकाशांत आपलेकडील काव्यांत नेहमीं वर्णिलेल्या एखाद्या अभिसारिकेप्रमाणें हर्मिया गुप्तपणें प्रयाणाचा बेत करिते, ही कल्पना शुद्ध आपलेइकडीलच नव्हे काय? शेक्स्पियर कवीला अष्टनायकांची माहिती संस्कृत पद्धतीप्रमाणें असेल किंवा नसेल तें सांगतां येणें जरी कठिण आहे तरी ठिकठिकाणच्या कल्पना वेंचून घेण्याची त्याची रीत होती याविषयीं कांहीं शंका नाहीं.

**प्रवेश २ रा**—यांत हास्यकारक म्हणून जें उपकथानक कवीनें आणिलें आहे त्याचा उपक्रम येथें केला आहे. शेक्स्पियर कवीची कुशलता बहुधा त्याच्या हलक्या पात्रांमध्येंच दिसून येतें, कदाचित् त्याच्या बुद्धिमत्तेचें स्वकीयत्व यांतच दिसून येण्यासारखें असतें. ह्या गोष्टीचें प्रत्यंतर ह्या प्रवेशांत आपणांस मिळतें. प्रवेश तो काय ?—चार कामकरी मंडळी रात्रीचे प्रहरीं गांवाबाहेरच्या मोकळ्य एकांत जागेंत जमतात व नाटक करण्याचा जो त्यांचा

बेत झाला होता त्याची तालीम घेतात. त्यांच्या भाषणांतच त्यांच्या भूमिकांच्या अंगच्या दुर्गुणांचा उपहास करून कवीनें कशी मौज केली आहे ती पाहण्यासारखी आहे. त्यांतलें बॉटम हें पात्र मासलेवाईक आहे. त्याचे ठिकाणचा तेजस्वीपणा, व वर्तनांतला कर्तेपणा, हे गुण त्याचे भाषणांतल्या प्रत्येक शब्दांत व्यक्त होत आहेत! पुष्कळांची अशी समजूत आहे कीं, शेक्स्पियर कवीनें आपल्या वेळच्या लहान लहान नाटकमंडळ्यांची व त्यांचें अनुकरण करणाऱ्या खेडेगांवच्या आपखुष नाटकें करणारांची येथें टर उडविली आहे.

**अंक २ रा**—ह्या अंकांत मागील अंकांतील प्रेमीजनांच्यासंबंधांत गोंधळ उत्पन्न करण्याची संधि कवीला प्राप्त झाली आहे. पऱ्यांचें कथानक प्रथमतःच येथें उपस्थित होऊन प्रेक्षकांपुढें येतें, पऱ्या जेतात, त्या कोणत्याही कारणावरून मनुष्यांच्या कार्यांत विघ्न उत्पन्न करण्याच्या हेतूनें येत नाहींत. जी परी येते. तिचा हेतु आपल्यापुरताच म्हणजे आपला जो प्रतिपक्षी त्याचें वैर साधण्यापुरताच असतो, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मनुष्यांच्या कार्यांत ढवळाढवळ करण्याची त्यांना वासना नसल्यामुळें मनुष्यांच्या कृत्यांशीं त्यांचा कांहींच संबंध नाहीं. पऱ्यांच्या प्रकृतिगुणांत काय विशेष आहे, तो मागें एकवार

सांगितलाच आहे. मनुष्याच्या दृष्टीनें कार्यकारणभाव मनांत वागवून कार्य करण्याची त्यांना अक्कल किंवा इच्छा नाहीं, अर्थात् मनुष्यांच्या नानाविध कृत्यांत त्यांचा कर्तृत्वदृष्ट्या कांहींच संबंध येत नाहीं. या गोष्टींवर लक्ष दिलें असतां, अद्भुत कृत्यें कशीं वर्णन करावीं—निदान शेक्स्पियर कवीनें ती आपल्या नाटकांतून कशीं आणिलीं आहेत, याचा कित्ता आपण घेण्यासारखा आहे, असें आम्हांस वाटतें. यासंबंधानें विशेष विवेचन उपसंहारांत रण्याचा आमचा विचार असल्यामुळें तूर्त एवढेंच पुरें आहे.

या अंकांत पऱ्यांचें प्रकरण उपस्थित होऊन, पुढें त्यांचा संबंध मनुष्यांच्या प्रेमकृत्यांशीं जोडिला आहे. तो किती खुबीनें जोडिला आहे, तें पाहण्यासारखें आहे. येथें आरंभींच परीचा कृत्यक्रम वर्णिला आहे, त्यांत दिलेल वर्णन ह्मणजे सृष्टिक्रमानें घडणाऱ्या गोष्टींचें केवळ रूपक होय, हें कोणाच्याही तेव्हांच लक्षांत येईल. राजेसाहेबांच्या येथला लग्नसमारंभाचा थाट खरा व सत्य आहे, परंतु त्या समारंभाला पऱ्यांचें जाणें व त्या ठिकाणचीं कित्येक कृत्यें करण्याचें त्यांनीं अंगावर घेणें ह्मणजे तें केवळ भासमय कल्पनासृष्टीचें कृत्य आहे. अर्थात् जीं कृत्यें सृष्टिनियमानें व्हावयाचीं, तीं ह्या पऱ्यांनीं अदृश्य रूपानें केलीं असें

कवीचें येथें म्हणणें आहे. तेव्हां त्यांनीं तीं कृत्यें केलीं असें प्रेक्षकांनीं व वाचकांनीं कल्पनेनेंच मानून घ्यावयाचें हें उघड आहे. तात्पर्य, हा सगळा कल्पनामय जादूचा खेळ आहे हें लक्षांत ठेविलें म्हणजे सर्व गोष्टींचा उलगडा होतो; व पऱ्या म्हणजे काय, पिशाच्चें तीं काय, व त्यांनीं अमुक चमत्कार केले असें कवि वर्णितो यांत काय अर्थ आहे, अशा प्रश्नसमुदायास मुळींच अवकाश मिळणार नाहीं.

पृष्ठ २९ यांत सामान्य परीचा वर्तनव्यवसाय सांगितला आहे. पृष्ठ ३१ येथें ‘ पक ’ ह्या विशिष्ट परीचा वर्तन-व्यवसाय दिला आहे, त्यांत तो जीं जीं कृत्यें करितो म्हणून सांगितलें आहे तीं कृत्यें करावयास “ पक ” ही परीच कशाला पाहिजे ? आमच्या एका मित्रासही अशीच खोड आहे—ठेंच लागली ह्मणजे ती भूताच्या अवकृपेमुळें लागली; पायांतला जोडा चालून चालून झिजून फाटला व त्याच्या लक्षांत न येतां त्याचें एक लहानसें कातडें तुटून पडलें कीं, हें कामही त्याच्या दृष्टीनें त्याच्या त्या भूताचें होय ! बरें, उद्यां एके ठिकाणीं अचानक चार आणे हातांत पडले किंवा अतिशय खटपट करूनही अखेर कांहीं झालें नाहीं ह्मणजे तो दोष त्या भूताचा होय, असें त्याचें म्हणणें असते. त्याच्या ह्या अडाणी समजुतींत व ‘पक’ ह्या परीच्या व्यवसायक्रमांत

काय अंतर आहे ? याचा विचार वाचकांनींच करावा. आपल्या देशांत, भक्तमंडळींनीं नानाविध चमत्कार करून, ते परमेश्वराच्या नांवावर लोकांपुढें आणिले आहेत, त्यांच्या त्या अद्भुत कृत्यांची जर कोणी कवि अशीच वासलात लावील तर त्याचे आह्मांवर मोठे उपकार होतील यांत शंका नाहीं. परंतु भक्तिविजयांत असें असें वर्णन दिलें आहे, असें सांगून प्रत्यक्ष तो उतारा किंवा संतमंडळीच्या तोंडचे अभंग, ओंव्या, पदें वगैरे आपल्या ग्रंथांत उतरून घेणें किंवा नाटकांतून पात्रांच्या तोंडून वदविणें ह्मणजे त्या कवीची मोठीच कुशलता म्हटली पाहिजे !

पृष्ठ ३३ येथें पऱ्यांचा राजा ऑबेरान व पऱ्यांची राणी टिटॅनिया ह्यांचा पति-पत्नीसंबंध वर्णिला आहे व त्यांच्या प्रेमाचें स्वरूप कसें आहे हेंही सांगितलें आहे. ह्या दोन्ही गोष्टी लक्षपूर्वक वाचून पाहण्यासारख्या आहेत. त्यांची ती भाषा व त्यांची ती विचारसरणी फारच मासलेवाईक आहे. त्यांचें स्मरण होतांच अलीकडील हलक्या दर्जाच्या जनसमाजांत लोकप्रिय झालेल्या कित्येक नाटकांतून योजिलेल्या भाषासरणीची कोणासही आठवण येथें होईल. प्रेम ही काय वस्तु आहे ? तिचें स्वरूप सांगावयाचें असतां कोणी आधुनिक नाटकाचार्य तें असें वर्णितोः—

या जगीं मी तुझा पती असें ।
ह्मणुनि तुजासि मी संग करितसें ॥

अशा शुद्ध कवित्वमय व उच्चतम भाषेनें आणि तर्कशास्त्राच्या कोटीबाज विचारसरणीनें तें सांगितलें असतां किती तरी उत्तम रीतीनें व्यक्त होतें ! शृंगाराचें सर्व रहस्य जणों यांत ओतलें आहे ! अशा नाटककारांचा नमुना दाखविण्यांत शेक्स्पियर कवीनें माघार घेतली नाहीं ही मोठी आनंदाची गोष्ट आहे! पऱ्यांचा राजा आपले राणीस हांक मारून म्हणतो:–

"अगे अविचारी जारिणी, थांबेनास का जरा ? मी तुझा स्वामी नाहीं का ? "

त्याला राणी टिटॅनियाही तितक्याच कुऱ्यानें उत्तर देते:–

"तर मग मी तुमची स्वामिनी आहें का ?.........तुह्मी धनगराचें सोंग घेऊन व बरूची मुरली करून साऱ्या दिवसभर त्या विलासी फिलाडेला शृंगारिक गाणीं गावून दाखवीत बसलां होतां, हें मला ठाऊक नाहीं कीं काय ?......हिंदुस्थानचीं तीं दूर देशचीं सुंदर अरण्यें सोडून तुह्मी जे या वेळीं इकडे आलां ते काय म्हणून ? तुमच्या त्या दांडग्या संग्रामप्रिय आवडत्या शूर बाईचें लग्न थिसियस राजाशीं तुम्ही लावून देणार आहां, नाहीं का ? "

थिसियस राजाचें नांव तिनें मुखावाटें उच्चारतांच,

ऑबेरान याची कोटी तयारच आहे. तो तिला एकदम म्हणतो:—

"हो हो ! त्या थिसियस राजावरही तुझें मन गेलें आहे,
हें मला माहीत नाहीं असें तूं समजूं नकोस !"

बस ! येथें शृंगारनदीला केवळ पूर आला असून एक मोठा भोंवरा उत्पन्न झाला आहे असें ह्मणावयास चिंता नाहीं ! उदात्त शृंगार व अशुद्ध शृंगार यांच्यांत कोणता व कोठें भेद आहे हें येथें पाहण्यासारखें आहे. संस्कृतांतील बहुतेक काव्यांत शृंगाराचें फारच प्राबल्य आहे, पण कालिदासादि बहुतेक श्रेष्ठ प्रतीच्या कवींच्या ग्रंथांत हें प्राबल्य जेथें असावें तेथें व तेवढेंच असतें ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. तथापि सामान्येंकरून तें प्राबल्यही अनेक स्थळीं फाजील व दोषरूपच असतें असें म्हणणें भाग आहे. प्राकृत कवींकडे नजर फेंकली असतां, भक्त कविमंडळाकडे पाहण्याची कांहींच जरूरी नाहीं. तथापि शाहीर कवींच्या लावण्या वगैरे पद्यमय रचना नजरेस येते, तींत शृंगाराचेंच माहात्म्य आहे हें कोणासही सांगावयास नको. पण मुद्याची गोष्ट ही आहे कीं, तो शृंगार शुद्ध स्वरूपाचा नाहीं. त्यांत भाषेची कांहीं खुबी आहे व कांहीं कल्पनामय मनोविकारांचीं वर्णनें आहेत इतकेंच. शृंगाराचें स्वरूप इतकें हलक्या दर्जाचें आहे कीं, त्याचा

प्रवेश कोणत्याही उदात्त विचारांनीं भरलेल्या ग्रंथांत निष्कारण होऊं देणें रास्त नाहीं. केवळ त्याचें स्वरूप लक्षांत यावें यासाठींच एक लहानसा उतारा येथें दिला आहे तो अप्रासंगिक होईल असें वाटत नाहीं. पुढील उतारा **होनाजी बाळ** नांवाच्या एका शाहिराच्या लावणींतून घेतलेला आहे, त्यांत विप्रलंभशृंगाराचा एक नमुना असून उत्कंठित नाइकेचे उद्गार दिले आहेत. कोणी एक उत्कंठित नायिका ह्मणते:—

हरयुक्तीनें मनापासुन, प्रीत तुमचि जोडिली ।
ह्मणुनि का माया पातळ केली ? ॥
मोठ्या प्रयत्नें शोधुनि रत्नें कांत तुह्मां निवडिलें ।
मनापासुनि जे आवडले ॥

मशीं घडावा संग तूमचा हें मनांत वाटलें ।
मग मीहो संशयचक्रीं पडियेलें ॥
श्रेष्ठ श्रेष्ठ बोलावुनि ज्योतिषि प्रश्न त्यांस पुसविले ।
अनुष्ठार्नि ब्राह्मण बैसविले ॥

चाल—मम भाग्यचि उदया आलें ।
स्वामिंचें सहज दर्शन झालें ॥
मग हीं अष्टांग निवालें ।
शेवट व्हावा गोड विषयाचा उत्तम वेळ साधिलें । ।
ह्मणुनि का माया पातळ केली ॥

बहुतेक लावण्यांतील शृंगाराचें स्वरूप वरील प्रकारचेंच आहे. भाषा तीच, विचार तेच, तुशीं आणि मशीं प्रसंग—हा सारा गोंधळ त्यांत असल्यामुळें, त्याचा लवकरच वीट येतो; इतकेंच केवळ नव्हे, पण तिट्कारा येतो असेंही ह्मणावयास चिंता नाहीं. शेक्स्पियर कवीनें ऑबेरान व टिटॅनिया ह्यांच्यावरील संवादांत अशा प्रकारच्या अधम शृंगाराचें स्वरूप वर्णून, त्याचा फारच खुबीनें येथें उपहास केला आहे.

पृष्ठ ३५ येथें टिटॅनिया राणीचें भाषण आहे, त्यांत, तुफान उत्पन्न कां होतें, धुकें निर्माण होऊन हवा रोगट कां होते व तिच्या पायीं कशी संकटपरंपरा मनुष्यजातीवर येते ह्याचें कारण दर्शविलें आहे. राणीच्या मतें ह्या सर्वांच्या मुळाशीं पऱ्यांचा राजा व राणी यांचें भांडण, हेंच कारण होय; दुसरें कांहींएक नाहीं. तें मिटतांच सर्व कांहीं व्यवहार सुरळीत चालू होतात ! तेव्हां ह्या राजाराणीचें केवढें तरी स्तोम जगाच्या घडामोडींत माजलें आहे पहा ! पण जेथें मुळांतच शून्य आहे तेथें त्या शून्यांतून काय निष्पन्न व्हावें ? वेदांतशास्त्रांतली माया ही अशीच एक अद्वितीय चीज आहे. अशा चिजांचा संग्रह केवळ कवींनाच करावा लागतो असें नाहीं; तर वेदांतासारख्या गहन व अति

श्रेष्ठ अशा शास्त्रासही तिला आश्रय देणें भाग पडतें, हें पाहून मोठें कौतुक वाटतें !

पृष्ठ ३८।३९ येथें ऑबेरान व टिटॅनिया यांच्या संवादांत शेक्स्पियर कवीनें इंग्लंडांतील श्रेष्ठ कुळांतल्या नोबल्स मंडळीसंबंधानें फार नाजूक असा गुप्त उल्लेख केला आहे. तो उल्लेख टिटॅनिया राणीनें एक मुलगा चोरून आणिला असून त्याला ती वाढवीत आहे ह्या रूपानें दर्शित केला आहे. हा मुलगा कोण? तसेंच पुढें ऑबेरान याच्या भाषणांत असाच उल्लेख आहे:–' धनुष्यबाण घेऊन राजा झालेला मदन, चंद्रलोक व पृथ्वी यांच्या दरम्यान उडत असतांना मीं पाहिला. इ० इ० ' यानंतर टिटॅनिया राणीच्या भाषणांतही " समुद्रांतून जहाजें चाललीं असतां त्यांचीं शिडें स्वैरगतीनें वाहणाऱ्या वाऱ्यानें फुगून मोठीं होतात हें पाहून किती वेळां तरी आह्मी हंसून हंसून मौज करीत असूं, व ती बाई पोहण्यासारखी चालून दाखवीत असे व ती जहाजाप्रमाणेंही पोहून दाखवीत असे–जसें अगदीं हुबेहूब जहाजच ! " यांत उल्लेखित केलेली जहाजाप्रमाणें पोहून दाखविणारी बाई कोण ? असे कित्येक प्रश्न येथें उद्भवतात. यासंबंधानें शेक्स्पियर कवीच्या अनेक टीकाकारांचीं अनेक मतें पाहण्यांत येतात. त्यांचा उल्लेख येथें करण्याचें आह्मांस कांहीं प्रयोजन

दिसत नाहीं. ऐतिहासिकदृष्ट्या त्यांचा उलगडा करतां येईल व त्यांपासून तज्ज्ञजनांस आनंद होईल हें खरें, तथापि नाटकें वाचणारांच्या किंवा पाहणारांच्या आनंदांत त्यापासून फारशी भर पडेल, असें वाटत नाहीं.

**प्रवेश २ रा**—यांत प्रणयबद्ध जोडप्यांचा संबंध दर्शित केला आहे, त्यांतही डिमेट्रियस आणि हेलेना यांच्या संवादांत ती, डिमेट्रियस याजवर प्रेम दर्शविते व तो तिला झिडकारितो, असा देखावा आहे. जवळ जवळ त्यांचीं भाषणें झगड्यांतील लावणींशीं स्पर्धा करणारीं आहेत, हें कोणाच्याही सहज लक्षांत येईल. या प्रवेशांत " शुष्क प्रेमदर्शन " नांवाच्या फुलाच्या योगानें वेगवेगळ्या प्रणयीजनांच्या प्रेमांत कसा गोंधळ माजून राहिला आहे त्याचा विचार येथें अवश्य करण्यासारखा आहे, डिमेट्रियस हा, हेलेनेला झिडकारितो व आपलें प्रेम हर्मियेवर आहे असें सांगतो. पुढें लॉयझँडर याच्या डोळ्यांत त्या फुलाचा रस पडतांच सर्व मान फिरलेलें दृष्टीस पडतें. तो हर्मियेवरील आपलें प्रेम दूर करून, आतां हेलेनेच्या मागें लागतो. हा सर्व उलट सुलट गोंधळ पाहून बिचाऱ्या हेलेनेची मात्र त्रेधा उडते. तिला ह्या बदललेल्या प्रेमाचें कारण न कळल्यामुळें ती असें समजते कीं, लॉयझँडर, हर्मिया; आणि डिमेट्रियस या तिघांनीं ही मसलत करून

आपणाला तोंडघशीं पाडण्याचा घाट घातला आहे. तेव्हां तिची ती त्रेधा पाहून कोणालाही तिची कींवच येईल.

**अंक ३ रा. प्रवेश १ ला**—यांत आरंभालाच कामकरी लोकांनीं करावयाच्या नाटकाची तालीम होते, व ती चालली असतां, बॉटम याच्या शिरावर गाढवाचा मुखवटा बसवून देण्यांत येतो. मग त्याजकडे पाहून त्याचे सोबती भयानें घाबरे होऊन पळून जातात व पिऱ्यामस महाराजांची एकटी स्वारी तळावर तिकडून हिकडे व हिकडून तिकडे खेपा घालीत असलेली नजरेस येते. इतक्यांत टिटॅनिया राणीची दृष्टि अचानक त्याजवर पडते! आणि मग जो हास्यास्पद चमत्कार दृष्टीस पडतो तो पाहून ज्याला हंसें कोसळणार नाहीं असा कोणी मठ्ठडोक्याचा अभागी मनुष्य जगांत असेल असें वाटत नाहीं! राणी त्याला कुरवाळते, त्याचें डोकें आपल्या मांडीवर घेते व त्याला प्रेमाचे शब्द बोलते—तें पाहून शेक्स्पियर कवीनें, हा असा नीति-स्खलन—दर्शक देखावा आपल्या नाटकांत दाखविल्याबद्दल कित्येकांस आश्चर्य वाटेल; व ते ह्मणतील कीं, ह्या नाट्याचार्यानें असें हें अमंगळ गारूड काय दाखविलें? पण थोडा विचार केला असतां असें दिसून येईल कीं, हें नीतिस्खलन जें दाखविलें आहे तें पऱ्यामध्यें दाखविलें आहे! आणि पऱ्या ही काय वस्तु

आहे हें लक्षांत आणिलें ह्मणजे मनांत जें नीतिस्खलनाचें भय उत्पन्न होतें त्याचा निरास होऊन एकंदर उलगडा पडतो ! पऱ्या ह्या कोणी दृश्य किंवा स्पृश्य प्राणी नाहींत. त्या आकारशून्य मनोगम्य व चमत्कारजनक अशीं विचित्र सत्वें होत ! पऱ्यांची घटना हें सृष्टि-क्रमोत्पन्न चमत्कारांचें कवीनें येथ एक रूपक योजिलें आहे. त्यांत सत्य व तथ्य असें कांहींच नाहीं. शेक्स्पियर कवीच्या वेळीं इंग्लंड देशाची अविवाहित राणी एलिझाबेथ इच्या दरबारीं गुप्तपणें असे पऱ्यांचे दरबार व त्यांनीं केलेले चमत्कार वारंवार घडत होते. * ह्या ऐतिहासिक सत्य गोष्टीवर येथें लक्ष आहे, एवढें येथें सांगितलें ह्मणजे पुरे होईल असें वाटतें.

---

* येथें जें रूपक कवीनें योजिलें आहे त्यांत आलेल्या उल्लेखाचा पुढील उताऱ्यावरून इंग्रजी भाषाभिज्ञ वाचकांस उलगडा होईल:—

Halpin explained the mermaid and the stars as part of the pageant and the fire-works at the "Princely pleasures" with which the Earl of Leicester entertained Elizabeth at Kenilworth in 1575. Of these festivities several contemporary accounts exist and it is quite possible that Shakespeare may himself have been present at them as a boy of eleven, since Kenilworth

( ६६ पान पहा. )

पृष्ठ ६७ येथें बॉटम याच्या तोंडांत एक पद्य घातलें आहे. तें मुळांतल्या गायकी चालीवरच्या पदाच्या आधारानें रचलें आहे खरें, तरी तें भाषांतररूप नाहीं हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. मूळांतल्या गाण्याचा आशय काय आहे तो लक्षांत घेऊन तें आपल्याकडील स्थितीला अनुलक्षून लिहिलें आहे.

पृष्ठ ७६ येथें डिमेट्रियस हर्मिया यांचा संवाद सुरू होतो. त्यांतील कल्पनातीत व मनोगम्य विचारसरणीकडे

---

( पान ६५ वरून समाप्त. )

is at no great distance from Startford. During this visit Leicester attempted to win Elizabeth's hand, while he was at the same time carrying on an interview with Lettice, Countess of Essex, whom he afterwards married. Halpin believed that these events were referred to in the play, and that the Countess of Essex was the "little western flower". He found another secret history of Leicester's love affairs in Lyly's *Endymion* in which he considered that the Countess figures as *Flocscula*.

या उल्लेखाचा उलगडा दुसरा एक टीकाकार येणेंप्रमाणें करितो:-

Warburton suggested that by the mermaid was intended Wary Queen of Scots so called "to denote her reign over her Kingdom situate in the sea; and her beauty and intemperate lust".

लक्ष देण्यासारखें आहे. हर्मियेच्या तोंडचीं पुढील वाक्यें घ्या.

"तो जसा माझ्याशीं तत्परतेनें वागत असे तसा सूर्यदेखील पृथ्वीशीं वागत नसेल !"

"मला जर कोणीं सांगितलें कीं, चंद्रानें पृथ्वीला आरपार भोंक पाडिलें व त्यांतून थेट आपल्या पायाखालीं मध्यान्हींचा सूर्य या वेळीं जेथें आला आहे तेथपावेतों मजल मारून सूर्याला लाजविण्याचा थाट घातला— असें जर मला कोणीं सांगितलें तर.........त्यावर माझा विश्वास बसेल, पण या गोष्टीवर मात्र मी कधींच विश्वास ठेवणार नाहीं !"

पृष्ठ ७९ येथें ऑबेरान ह्याच्या तोंडून प्रणयबद्ध जोडप्यांच्या प्रणयकलहांत जो घोंटाळा "त्या फुलानें" उडवून दिला त्याचा थोडक्यांत उल्लेख आलेला आहे, तो असा:—

"तुझ्या चुकीचा परिणाम असा होईल कीं, खरा प्रेमी मनुष्यमात्र बिचारा खोटा ठरेल; पण खोट्याचा कांहीं खरा प्रेमी मनुष्य होणार नाहीं !"

यावर 'पक' ही परी जें उत्तर देते त्यावरून मनुष्यांच्या नानाविध क्रियांवर त्यांचें स्वामित्व मुळींच नसून तीं केवळ दैवाधीन कशीं आहेत याचा उमज पडतो. पक ह्मणतो:—'मग याचा सारा दोष दैवगतीला लाविला पाहिजे!'

पृष्ठ ८५ येथें अंधेऱ्या रात्रीं डोळ्यांची शक्ति लयास गेली असतां ती कर्णेंद्रियाची शक्ति वाढविते असें सांगून हर्मिया ह्मणते, "माझ्या डोळ्यांना तुला शोधून काढतां

आलें नाहीं तरी तुझा शब्द ऐकून तुझ्या मागोमाग मला माझ्या कानांनीं येथवर आणिलें ! " हें वाक्य वाचून मृच्छकटिकांतील शकाराच्या भाषणाची येथें कोणास आठवण होणार नाहीं ?

पृष्ठ ८६ येथें हेलेनाबाईचें भाषण लक्षपूर्वक वाचण्यासारखें आहे. त्यांतील तिच्या लहानपणच्या मैत्रीबद्दल केलेला उल्लेख अत्यंत हृदयंगम आहे. एकंदरीनें, हेलेनाबाईची हेलना झालेली पाहून कोणाही सहृदय वाचकास तिची कींव आल्यावांचून राहणार नाहीं. पृष्ठ ८५ पासून तें पृष्ठ ९७ पर्यंत डिमेट्रियस व लॉयझँडर आणि हेलेना व हर्मिया यांजमधील प्रेमकलह ऊर्फ छकडीचा फार्स जो सुरू होतो, तो फारच मासलेवाईक आहे. काय तो गोंधळ ! त्याचा उमज कोणालाच न पडल्यामुळें व हर्मियेच्या तापट स्वभावामुळें रंगभूमीवर जो धिंगाणा माजतो व बोलाचाली होत होत जो मारामारीपर्यंत प्रसंग येतो, त्याजकडे पाहतां पाहतां, " यांचें पुढें होणार तरी काय " अशी आवेगपूर्वक आकांक्षा वाचकांच्या मनांत उत्पन्न होते. पुढें हे सर्व प्रेमीजन हिंडतां हिंडतां थकून गेले ह्मणजे निद्रावश होतात व अंकाची अखेर करितात.

**अंक ४ था. प्रवेश १ ला**—मागील अंकांत ज्या गोष्टी अगदीं विकोपास गेलेल्या दिसत होत्या त्यांचें खरें

स्वरूप प्रस्तुत अंकांत दृष्टोत्पत्तीस येतें. टिटॅनिया राणी-च्या डोळ्यावरील प्रेमचमत्काराची धुंदी उतरून गेली व ती पुन्हां आपल्या स्वामीजवळ शांतपणें सुखानें गुजगोष्टी बोलूं लागली. आतांपर्यंत जें कांहीं झालें तें सारें स्वप्नांतल असें समजून ती आश्चर्य दर्शविते. ऑबेरान याचे मस्तकांतील मत्सरजन्य रोष लयास गेला व तेंही शांत झालें. प्रणयबद्ध जोडपीं रंगभूमीवर येतात तीं झोंपेंतून उठल्याप्रमाणें करून आश्चर्यमुद्रेनें एकमेकांकडे पाहतात, व थिसियस राजानें त्यांची साद्यंत हकीकत ऐकण्याची इच्छा दर्शविल्यावर, लग्नाची गांठ मारण्यासाठीं त्यांज-बरोबर देवळांत जातात.

शेवटीं बिचाऱ्या बॉटमची काय दशा झाली असेल ती ऐकण्यास आतां वाचकांचें मन उत्सुक झालें असेल असें वाटतें. तो बिचारा तालीम घेतांना, ओरडाओरडी करून, थकला भागला होत्साता, निद्रावश झाला होता. झोंपेंतून उठल्यावर पाहतो तों तालमीच्या ठिकाणावर त्याच्या सवं-गड्यांपैकीं कोणीही सोंगाड्या मित्र हजर नाहीं असें त्याच्या नजरेस आलें. मग ही स्वारी डोक्यावरील मुख-वट्यासहित जी पळाली ती शहरांत गेली. तेव्हां त्याला पाहून लोकांस काय वाटलें असेल त्याची कल्पनाच करणें पुरें आहे.

**अंक ५ वा**—येथें आरंभींच थिसियस राजाच्या मुखांत फारच मौल्यवान् आणि मनन करण्यासारखे विचार घातले आहेत. बहुधा त्यांजवरून कवीचे विचार भुतांखेतांविषयीं काय आहेत याचा उलगडा होतो. तो म्हणतोः—"प्रेमबद्ध माणसें व अजागळ माणसें यांची कल्पनाशक्ति फार तीव्र असते यामुळें कशाही काल्पनिक गोष्टी त्यांना सांगितल्या तरी त्या त्यांस खऱ्याच वाटतात. ज्यांची विचारशक्ति शांत व स्थिर आहे अशांना मात्र त्या कधीं खऱ्या वाटणार नाहींत असा सामान्य सिद्धांत सांगून अजागळ व प्रेमीजन याच्याच पंक्तीला हळूच पण अचूक रीतीनें त्यानें महाशय कवीसही नेऊन बसविले आहे ! आणि याचें कारण काय तर पहिल्या माणसांची जी विचारशक्ति प्रबल होऊन क्षीण झाल्यामुळें संभ्रमांत लय पावते, तीच विचारशक्ति कवीच्या ठिकाणीं प्रौढ होत्साती मनोगम्य पण आश्चर्यजनक लेखनचमत्कार प्रगट करिते. दोहों-मधला हा भेद शेक्स्पियर कवीनें सूक्ष्मपणें येथें दर्शविला आहे तो **पंतां**च्या वाणीनें येणेंप्रमाणें सांगतां येईलः—

सूक्ष्म दृशांवांचुनियां कथापरालाचि तो कसा गवसे ? ।

—मंत्ररामायण.

येथवर प्रस्तुत नाटकाचें पर्यालोचन केलें. आतां निर-निराळ्या पात्रांचें स्वभाववर्णन करावयाचें.

प्रस्तुत नाटकांत जीं पात्रें आणिलीं आहेत, त्यांचे दोन भाग करतां येतील. एकांत मानवसृष्टीच्या बाहेर राहून व्यवहार करणाऱ्या पऱ्यांचा समावेश होतो. आणि दुसऱ्यांत मानवपात्रांचा अंतर्भाव होतो. पैकीं पऱ्यांच्या ठिकाणीं स्वभाववैचित्र्य फारच थोडें आहे. आणि जो विशेष गुण त्यांच्या वर्तनांत दिसून येतो, त्याचें दिग्दर्शन वर एके ठिकाणीं आलेंच आहे. यास्तव त्यांच्यासंबंधानें अधिक लिहिण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

आतां मानवपात्रांविषयीं विचार केला असतां, तीं्ही साधीं व सरळ अशींच आहेत असें दिसून येतें. त्यांच्या वर्तनांत विचार करण्यासारखें कांहींच नाहीं असें ह्मणायास चिंता नाहीं. डिमेट्रियस व लॉयझँडर हे दोघेही साधे प्रणयी पुरुष तरुण आहेत. त्यांच्या स्वभावांत फरक फारच थोडा आहे. त्यांच्यापेक्षां त्यांच्या प्रियकरणींचीं चित्रें कांहीं बरीं वठलीं आहेत. हर्मिया ठेंगणी, काळी-सांवळी व थोडीशी कजाग आहे. हेलेना उंच, गौरवर्ण, गरीब व भित्र्या स्वभावाची आहे.

यापुढें विशेष विचार करण्यासारखीं पात्रें म्हटलीं ह्मणजे काय तीं दोनच आहेत:—एक थिसियस राजा व दुसरा बॉटम कोष्टी. थिसियस हा शूर योद्धा असून, धीरोदात्तही आहे. त्याला पाहतांच पाहणाराचे मनांत त्याजविषयीं

गौरव उत्पन्न होतें, व त्याजवर त्याची तात्काल छाप बसते. त्याचें सर्व भाषण स्वाभिमानपूर्ण व भारदस्त असें आहे. तो अधिकारारूढ असूनही, दयाळु स्वभावाचा आहे. प्रजेला आनंद देण्यास तर तो अत्यंत उत्सुक दिसतो. एकंदरींत थिसियस हा कर्तृत्ववान् व सर्वसमर्थ असल्यामुळें, प्रस्तुत नाटकाचा नायक होण्यास सर्वथा योग्य आहे. परंतु या नाटकांत त्याचें काम फारच थोडें आहे. तें जास्त असतें तर त्याच्या स्वभावांतले विशेष गुण दिसून येऊन त्याचें चित्र आपणांपुढें जास्त विशदपणें आलें असतें.

बॉटम या पात्राची तऱ्हा मात्र फार वेगळी आहे. त्याच्या सुदैवानें प्रस्तुत नाटकांत त्याला कामही भरपूर आहे व तें यथास्थित तडीस नेण्यास जो अहंकार अंगीं असावा लागतो तोही त्याच्या ठिकाणीं पुष्कळसा वसत आहे. आपल्या सोबत्यांवर तो लगेच छाप बसवितो व जेथें तेथें पुढें करून, ' बिचमें मेरा चांदभाई ' करण्याची त्याला फार खोड. गर्भ—नाटकांतील झाडून साऱ्या पात्रांचीं कामें करण्याची त्याला मोठी हौस. पण ती पूर्ण करून घेतां येत नाहीं असें दृष्टोत्पत्तीस आल्यावर तरी त्यानें स्वस्थ बसावें कीं नाहीं ? पण त्याची उडी फारच मोठी असल्यामुळें तो इतर पात्रांना शिकविण्याचा हक्क आपखुषीनें आपणांकडे घेतो. स्वतःच्या डोक्यावर गाढवाचें डोकें घेऊन बसलें असतांही, टिटॅनिया राणीच्या

प्रेमपाशांत तो सांपडतो, तेव्हां सुद्धां त्याची धिटाई कायमच राहते. दुसऱ्या एखाद्या इसमाची अशा वेळीं कोण त्रेधा उडाली असती! पण हा बहाद्दर पऱ्यांनाही जुमानीत नाहीं; इतकेंच केवळ नव्हे, तर त्यांजपासून चोपून कामें घेण्यास सुद्धां कमी करीत नाहीं. विनयाचा गुण त्याला कधीं शिवला असेलसें वाटत नाहीं. खुद्द थिसियस राजासमोरही त्याचा धीटपणा नेहमींप्रमाणें कायमच. स्तुतीची त्याला फार आवड. थोडीशी खुशामत केल्याबरोबर क्विन्स याच्या बोलण्याला तो तात्काळ कबूल होतो. यावरून त्याचा स्वाभिमान व स्वतःच्या कर्तृत्वाविषयींची खात्री हे दोन गुण मात्र चांगले व्यक्त होतात.

वर आपण एकंदर नाटकाचें प्रवेशशः पर्यालोचन करीत आलों; व तें करितांना, कांहीं मार्मिक विचार आह्मीं वाचकांस सादर केले. यापुढें शेक्स्पियर कवीची "प्रणय-कल्पना" काय होती व ती प्रस्तुत नाटकांत कशी प्रगट झाली आहे, हें आपण पाहूं. प्रणय म्हणजे प्रेम किंवा प्रीति असा मूळ अर्थ नाहीं हें स्पष्टच आहे. ह्या शब्दांत प्रेमबद्ध माणसांनीं परस्परांची चालविलेली "मनधरणी" एवढाच अर्थ आहे. तथापि, प्रणय म्हणजे प्रेम असा सामान्यतः सुशिक्षित लोक अर्थ करूं लागले आहेत. तेव्हां त्याच अर्थानें आह्मींही हा शब्द येथें योजिला आहे. प्रस्तुत

नाटकांत प्रणयाच्या ज्या अनेकविध छटा कवीनें वर्णिल्या आहेत, त्यांचा विचार केला असतां हा अर्थ अगदींच अयथार्थ वाटणार नाहीं. त्यांत वर्णिलेल्या स्वप्नसृष्टींतिल प्रणयाच्या निरनिराळ्या छटाही त्या सृष्टीस साजतील अशाच आहेत. प्रस्तुत नाटकांतील प्रीतिकल्पना, "हॅम्लेट किंवा ऑथेल्लो" ह्या नाटकांतल्याप्रमाणें उदात्त तर नाहींतच; परंतु फारशा उच्च देखील नाहींत. येथें दर्शविलेली प्रीति हा एक अत्यंत लहरी मनोविकार आहे. कवीच्या नैसर्गिक उच्च मनोवृत्तीला अनुसरून त्यानें मधून मधून प्रेमाचा उदात्तपणा दाखविणारीं वाक्यें कांहीं पात्रांच्या तोंडीं घातलीं आहेत, नाहीं असें नाहीं; परंतु सामान्यतः पाहतां, त्याचा सर्व भर प्रीतीच्या अस्थिरपणाविषयीं लोकांत कसकसे विचार प्रचलित आहेत ते दाखवावे यावरच आहे. आह्मी ह्मणतों याचें प्रत्यंतर येण्यासाठीं कांहीं भाषणांतले वेंचे येथें देतों. थिसियस राजासमोर उभी असतां, हर्मिया जे उद्गार काढते ते फार विचार करण्यासारखे आहेत. ती ह्मणतेः-

> "जो पुरुष मला आवडत नाहीं, त्याचें स्वामित्व पत्करून, आपल्या कुमारीपणाच्या हक्कावर पाणी सोडण्यास मी तयार नाहीं. अरण्यांत कोमेजून नाश पावणाऱ्या गुलाबाबरोबर, गुलाबाप्रमाणें, तशाच स्थितींत वाढेन, कांहीं दिवस जिवंत राहीन व शेवटीं कोमेजून मरून जाईन."

त्याचप्रमाणें पुढें आणखी:—

"हायरे देवा! प्रेमासाठीं श्रेष्ठ माणसांना हलकेपणा पत्करण्याची पाळी यावीना!"

"ज्यांच्या मनांत खरें प्रेम असतें त्या माणसांवर संकटें हीं यावयाचींच! हा आपला ईश्वराच्या घरचा नियमच आहे असें म्हणावें! कष्ट सोसण्याची संवयच आपण केली पाहिजे. कारण, विचार करीत बसणें, कल्पनातरंगांत निमग्न होणें, दुःखानें निःश्वास टाकणें, ह्या गोष्टी जशा प्रेमाच्या आनुषंगिक होत, तशीच कष्टांचीही प्रेमाशीं नेहमीं जोड आढळते."

हीं हर्मियेच्या तोंडचीं वाक्यें किती अनुभवपूर्ण आहेत, हें कोणासही सांगणें नलगे. परंतु एकंदर नाटकाचा विचार केला असतां, प्रणयाच्या चंचल स्वभावाचाच परिपोष झालेला दिसतो. आतां निरनिराळीं प्रणयबद्ध जोडपीं घेऊन त्यांच्या स्थितीचा विचार, जों जों करावा, तों तों वर सांगितलेलीच गोष्ट प्रत्ययास येते. नाटकाचा नायक "थिसियस" ह्याचेंच उदाहरण प्रथम घेऊं. तो एक प्रतापशाली व कारस्थानी राजा होता, त्याची "हिपोलायटा" राणीवरील प्रीति ह्मणजे राजकीय कारस्थानाचाच एक प्रकार आहे असें ह्मटलें असतां वावगें होणार नाहीं. त्याच्याच भाषणावरून ही गोष्ट स्पष्ट होते. तो म्हणतो:—

" हे प्रिये, तुला आठवतेंना ? मीं तुझ्याशीं प्रेमाचें बोलणें सुरू केलें, तें आधीं तलवारीच्या जोरावरच सुरू केलें; पुढें तुझें प्रेम संपादन केलें, त्यांतही मीं तुला अनेक प्रकारें त्रास दिला. आतां एकंदर स्थिरस्थावर होऊन, तुझें राज्य माझ्या घशांत उतरल्यावर, तुझ्याशीं मी जें आतां लग्न करणार आहें, तें मात्र अगदीं निराळ्या तऱ्हेनें होईल, म्हणजे तें थाटामाटाचें होईल; मोठा उत्सव होईल, आणि तेव्हां खाद्यपेयांची रेलचेल होऊन, जेवणावळींचा थाट उडेल. "

एकंदरींत हा सगळा दरबारी भपका ! बाह्योपचारांची रेलचेल ! त्यांत सत्यप्रीतीचा लेशही आढळत नाहीं; किंबहुना प्रीति हा काय पदार्थ आहे ह्याचें यत्किंचितूही ज्ञान कोणास नाहीं. भवभूतीनें सत्यप्रीतीचें जें उदात्त स्वरूप एका ठिकाणीं वर्णिलें आहे तें प्रसिद्धच आहे. तो म्हणतो:—

"व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतुः
न खलु बहिरुपाधीन् प्रीतयः संश्रयन्ते ।"

मालतीमाधव अंक १–२३.

हें जें प्रीतीचें शुद्ध स्वरूप, त्याचा कोठें मागमूसही नाहीं. पुढें लग्न झाल्यावर तरी राजेसाहेब प्रीतिवश होऊन आपल्या पत्नीचे अंकित होतील असें कोणाला वाटेल, तर तेंही चुकीचें होईल. हें पुढील उताऱ्यावरून कळेल:—

थिसियस— "हो, हो, खेळ पहाण्याची आमची मर्जी आहे.....जा, त्यांना आंत घेऊन ये. स्त्रियांनो, आपल्या जाग्यांवर जाऊन बसा."

हिपोलायटा—"हलक्या गरीब लोकांनीं राजानिष्ठा दाखविण्यासाठीं, न झेपण्यासारखें असें एखादें मोठें काम हातीं घ्यावें व विनाकारण आपली फजिती करून घ्यावी व आपल्यासारख्यांनीं ती पहावी, हें मला बाई आवडत नाहीं."

थिसियस—छेः! तसें नव्हे ग! त्यांची फजिती होईल व ती आपल्याला पहावी लागेल, असें कांहीं मला वाटत नाहीं.

हिपोलायटा—"त्यांना नाटक करतां येत नाहीं, असें आतांच क्रीडाध्यक्ष म्हणाला नाहीं का?"

थिसियस—असेंच जर असेल, व त्यांनीं वाईट नाटक करूनही, आपण जर त्यांना चांगलें म्हटलें तर त्या बिचाऱ्या गरीब लोकांना किती बरें आनंद वाटेल?"

लग्नाच्या पहिल्याच दिवशीं बायकोनें थोडासा हट्ट घेतला असतां, कोणीही साधारण मनुष्य तो पुरवील. परंतु कारस्थानी राजा थिसियस ह्याला पक्कें ठाऊक होतें कीं, हिपोलायटा ही शूर स्त्रियांची राणी आहे. तिला आपण तलवारीच्या जोरावर जेरीस आणिलें आहे. त्या-

पेक्षां तिच्याशीं वागतांना नेहमीं आपण आपलें वर्चस्व कायम ठेविलें पाहिजे. ह्यावरून असें लक्षांत येईल कीं, ह्या जोडप्यांतील प्रीति हा मनोविकार उभयतांचें तादात्म्य करून देऊन दोघांनाही स्वत्व विसरण्यास लावणारा प्रणय कांहीं नव्हे. स्वत्व विसरण्यास लावणाऱ्या प्रणयाचें स्वरूप भवभूतीनें आपल्या नायकाच्या मुखांतून वदविलें आहे, त्याची येथें वाचकांस आठवण होईल. भवभूतीचा प्रणय-बद्ध नायक वेडा होऊन म्हणतो:—

> प्रेमार्द्राः प्रणयस्पृशः परिचयादुद्गाढरागोदयाः
> तास्ता मुग्धदृशो निसर्गमधुराश्चेष्टा भवेयुर्मयि ।
> यास्वन्तः करणस्य बाह्यकरणव्यापाररोधी क्षणात्
> आशंसापरिकल्पितास्वपि भवत्यानन्दसान्द्रो लयः ।।

मालतीमाधव, अंक ५–७.

आतां दुसरें जोडपें पऱ्यांचें; त्याकडे वळूं. इकडे पाहिलें असतां, पऱ्यांचा राजा आबेरान व राणी टिटॅनिया ह्यांच्यांत एकमेकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्यासंबंधानें चढाओढ लागलेली दिसते. एकमेकांस फसवावयाचें तर खरेंच. पण तें आपल्या प्रतिपक्षाच्या लक्षांत मुळींच येऊं नये ह्यावरच त्यांचा उभयतांचा कटाक्ष आहे. एकमेकांच्या नीतिस्खलनाविषयीं अगदीं उघड उघड उखाळ्या काढ-

ण्यासही हें जोडपें कमी करीत नाहीं. आबेरानच्या तोंडचीं पुढील वाक्यें पहाः—

"अग, अविचारी जारिणी, थांबेनास का जरा ? मी तुझा स्वामी नाहीं का ? हो हो, थिसियसवरही तुझें मन गेलें आहे, हें मला माहीत नाहीं काय ? अग, रात्रीच्या प्रहरीं मसणीच्या पुढून तूंच नाहीं का त्याला फुसलावून आणलास ? आणखी, ती सुंदर मैना आणि ती चिमणी ह्यांच्याशीं वाहिलेल्या शपथा तूंच नाहीं का त्याला मोडायला लाविलेंस ?"

परंतु टिटॅनिया राणीजवळ अस्थिर मनाच्या आबेरान स्वामीबद्दल त्याच्या चंचल प्रेमविषयक गोष्टींनीं भरलेली पोतडी तयार आहेच ! ती बेशक उत्तर करितेः—

" तुम्ही वनांतून एकाएकीं नाहींसे झालां; व धनगराचें सोंग घेऊन बरूची मुरली करून साऱ्या दिवसभर त्या विलासी फिलाडेला, शृंगारिक गाणीं वाजवून दाखवीत होतां, हें मला ठाऊक नाहीं कीं काय ?.........समजलें, तुमच्या ह्या दांडग्या, संग्रामप्रिय, आवडत्या शूर बाईचें लग्न थिसियस राजाशीं तुम्ही लावून देणार आहां नाहीं का ?"

प्रीतीच्या फुलाचा रस डोळ्यांत पडतांच, टिटॅनियाबाईची जी दशा होते, ती पुसूंच नये ! गाढवाचें डोकें

चढविलेल्या बॉटम कोष्ट्याला, ती अंजारते काय, गोंजारते काय, आणि त्याला कुरवाळते काय ! मग ती आपल्या सर्व दासी त्याच्या तैनातीस सादर करिते ! आणि शेवटीं शुद्धीवर येतांच आबेरानपुढें तिची जी फट्फजिती उडते ती पुसूंच नये. तिची अशी त्रेधा उडालेली पाहतांच आबेरानचें मात्र चांगलेंच फावतें. तो आपलें काम साधण्यासाठीं तिच्या फजितीपासून हवा तसा उपयोग करून घेण्यास मागेंपुढें मुळींच पहात नाहीं. ह्यावरून ह्या दोघांची प्रेमाची कल्पना काय होती हें स्पष्ट दिसतें.

आतां दोन जोडपीं उरलीं. हर्मियाबाई व लायझँडर आणि हेलेनाबाई व डिमेट्रियस. पैकीं डिमेट्रियस पहावा तर त्याच्यासारखा चंचल तोच. प्रथमतः हेलेनाबाईशीं आणाभाका वाहून झाल्यावरही, तो स्वस्थपणें हर्मियेच्या बापाशीं संधान बांधण्यास मागेंपुढें पाहात नाहीं. हर्मिया आपणांस कबूल करीत नसेल तर तिला देहांतशिक्षा देण्यास, किंवा जोगीण बनविण्यास देखील तो तयार आहे. पुन्हां प्रीतीच्या फुलाचा रस डोळ्यांत पडतांच तो तितक्याच जोरानें हर्मियेचा निषेध करून हेलनेच्या भजनीं लागतो. पण, पूर्वी केलेल्या हेलनाबाईच्या अवहेलनेबद्दल माफी मागण्याचें मात्र त्याला सुचत नाहीं; पश्चात्तापाचें नांवही नाहीं. उलट, हेलनेचें प्रेम आपणास मिळणें ही

हक्काचीच गोष्ट आहे असें तो समजतो. आणि हेलनाबाई-ला ही आपली थट्टाच चालली आहे, असें जें वाटतें, त्याला डिमेट्रियस ह्याचें अस्थिरपणाचें वर्तन हेंच कारणी-भूत आहे.

उलटपक्षीं, प्रीतिफुलाच्या रसाच्या तडाख्यांत सांपड-ल्यावर लायझँडर हा हर्मियेला फसविण्यास तयार होतो खरा, तरी तशा स्थितींतही तिला इजा करण्यास त्याचा हात वहात नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. त्या रसाची धुंदी उतरतांच, त्याला मागील एकंदर हकीकतीचा देखील विसर पडतो. परंतु लायझँडर काय, आणि डिमेट्रियस काय—दोघांचीही प्रीति पाहूं गेलें तर ती फारच हलक्या दर्जाची आहे असें ह्मणावें लागतें. कारण तींत प्रीतीच्या उच्च स्वरूपाचें दिग्दर्शन लेशमात्रही नाहीं. उलटपक्षीं त्यांच्या मनःप्रेरणेवर बाह्योपाधींमुळें बराच परिणाम झालेला दिसतो. किंबहुना, प्रीतीचा रस हें त्यांच्या चंचल व लहरी प्रीतीचे नानाविध रंग पालटण्याची एक सबब होय किंवा वाचकांना पटेल असें कवीचें स्पष्टीकरण होय असेंही म्हणतां येईल.

वर म्हटल्याप्रमाणें ‘ शुष्क प्रेमदर्शन ’ ह्या फुलाची सबब जर वाचकांस पटली तर नाटकात वाटतील ते व वाटतील तसे देखावे आणण्यास व अनेक प्रकारचीं मजेदार

कल्पनाप्रचुर वर्णनें घालण्यास कवीला पूर्ण मुभा मिळते, हें उघड आहे. मग त्यानें कल्पनेच्या बळावर जीं जीं अद्भुत कृत्यें व चमत्कार घडल्याचें येथें वर्णिलें आहे, त्यांची किंमत अर्थातच वाढली, यांत शंका नाहीं. वाचक किंवा प्रेक्षक कवीप्रमाणेंच सहृदय असला पाहिजे; व कल्पनेचाही मसाला त्यानें बरोबर घेतला पाहिजे; म्हणजे हें नाटक वाचतांना किंवा पाहतांना जो रंग चढतो तो लिहितां पुरवत नाहीं. नाटक प्रत्यक्ष पाहण्याचा योग आमच्या वाचकांस येण्याचा संभव कमी,—मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल; पण नाटक वाचणें व तें वाचतां वाचतां त्यांत दंग होणें याचा अनुभव पाहणें हें कोणाच्याही हातचें आहे. प्रस्तुत नाटक रचिलें तेव्हां कवीची प्रतिभा परिपक्वदशेला आली नव्हती, असें त्याच्या कित्येक इंग्रज टीकाकारांचें म्हणणें आहे. परंतु यांत कवीची बुद्धिमत्ता काव्यस्फूर्तीनें बरीच प्रफुल्लित झालेली होती, यांत शंका नाहीं असें आम्हांस वाटतें. कवित्वगुण हा या नाटकाचा एक विशेष गुण आहे असेंही म्हणतां येईल. * ज्या टीका-

* काव्यदृष्ट्या प्रस्तुत नाटक कसें अप्रतिम आहे व यावर मार्मिक टीकाकारांचे अभिप्राय कसे काय आहेत, याचा कांहीं बोध पुढें कित्येक उतारे दिले आहेत, त्यांजवरून वाचकांस होईल. प्रथमतः सर्वमान्य बहुश्रुत ग्रंथ-

( ८३ पान पहा. )

कारांनीं वरील मत दिलें आहे, त्यांच्यांत हॅज़्लिट (Hazlit) याची गणना प्रमुखत्वानें केली पाहिजे. कारण, हॅज़्लिट यानें शेक्स्पियर कवीच्या नाटकावर जो टीकात्मक ग्रंथ लिहिला आहे, त्यांत त्यानें सदर नाटकाविषयीं सांगोपांग व व्यापक दृष्टीनेंच गुणदोषविवेचन केलें आहे. त्यांत तो एके ठिकाणीं ह्मणतोः—

'मधुयामिनीस्वप्नदर्शन' हें नाटक वाचतांना एखाद्या मनोरंजक गोष्टीसारखें वाटतें. परंतु त्याचा रंगभूमीवर

( पान ८२ वरून पुढें चालू. )

कार, हेनरी हालॅम, यांच्याच लेखांतला उतारा येथें देतों. ते नाट्यकलेचा वाङ्मयदृष्ट्या विचार करीत असतां लिहितातः—

"Poetical as we account it, more than dramatic, yet rather so, because the indescribable profusion of imaginative poetry in this play overpowers our senses till we can hardly observe anything else, than from any deficiency of dramatic excellence. For, in reality the structure of the fable, consisting as it does of three if not four actions, very distinct in their subjects and personages yet wrought into each other without efforts or confusion, displays the skill or rather instinctive felicity of Shakespeare, as much as in any play he has written. Nod preceding dramatist had attempted to fabricate a complex plot, for low comic scenes interspersed with a serious action upon which they have influence, do not merit notice. The Wensechmi of

( ८४ पान पहा. )

प्रयोग चालला असतां तो पाहिला तर इतका उठा-
वाचा वाटत नाहीं. ज्यांत बोलणें कांहींच नाहीं व हातवारे
करून व तोंडें वेडींवांकडीं करून अभिनयानें संगीताच्या

---

( पान ८३ वरून समाप्त. )

Plautus had been imitated by other as well as by Shakespeare; but we speak here of original invention."

Hallam's *Literature of Europe. p. p. 365.*

ह्या नाटकाविषयीं शेक्स्पियर कवीच्या एका नामांकित टीकाकाराचें मत येणेंप्रमाणें आहे:—

"The effect of the comedy, as a whole, is very captivating— a sense of luxuriant gratification steals over the mind of the reader; he is lost for a time amidst forests, and subjected to fairy spells; and when he closes the book arouses himself and shakes off its influence, it seems as though he had personally just waked from a sleep, in which an active fancy, had pictured to his senses the wild and varied incidents of a Midsummer-Night's Dream."—*Halliwell.*

ह्याहीपेक्षां पुढील टीकाकाराचें मत फारच स्पष्ट आणि मुद्देसूद आहे:—

"If any single composition were required to exhibit the power of the English language for purposes of poetry, that composition would be the Midsummer-Night's Dream. This wonderful model which at the time it appeared must have been the commencement of a great poetical revolution,—and which has never ceased to influence our higher poetry, from Fletcher to Shelley,—was, according to Malone, the work of the genius of Shakespeare, even in its minority."

*Charles Knight.*

ठेक्यावर जीं नाटकें इंग्लंड देशांत होत असतात, त्यांस पॅन्टो माइम ( Panto mime ) ह्मणतात, तशा प्रकारचा हा खेळ चालला आहे असें वाटूं लागतें. अर्थात् हा खेळ म्हणजे शुष्क पण शोभिवंत अशा भव्य चित्रासारखा आहे, मूळ नाटकांतला जीव रंगभूमीवर नष्ट होतो, देखावाच पाहिला तर मोठा शोभिवंत, परंतु त्यांत रसाचा लेशही आढळत नाहीं. सारांश, काव्य व रंगभूमि यांची जोड साधण्याचा जो यत्न येथें कवीनें केला आहे तो निष्फळ झाला आहे असें ह्मणावें लागतें. जेव्हां रसोत्पत्तीचें सर्वच काम कल्पनेवर सोंपविण्यांत येतें, तेव्हां कल्पना अंतः-करणापुढें वाटेल तो देखावा हजर करिते. परंतु चर्मचक्षूंना ही कल्पनामय रंगांनीं रंगविलेलीं चित्रें दिसावीं कशीं ? तीं तेल्या रंगांनीं रंगविण्याचा प्रयत्न केल्यास हिडिस दिसतात. उदाहरणार्थ, कल्पनामय रंगभूमीवर बॉटम यानें चढविलेला गाढवाचा मुखवटा म्हणजे जादूच्या योगानें निर्माण झालेला एक छानदार छायारूप मुखवटा; परंतु रंगभूमीवर जो साक्षात् देखावा दिसतो, त्याची तऱ्हा ह्याहून अगदीं वेगळी आहे. रंगभूमीवरील सोंगाड्यानें चढविलेलें गाढवाचें डोकें ह्मणजे तें गाढवाचें हिडिस डोकेंच ! यापलीकडे कांहीं नाहीं. रात्रौ स्मशानांत दृश्य होणारीं पिशाच्चें जर दिवसां दोन प्रहरीं चवाठ्यावर

येऊन नाचूं लागलीं–असा काळ पुढें मागें आलाच, तर कदाचित् मधुयामिनीस्वप्नदर्शन हें नाटक रंगभूमीवर यथातथ्य वठवितां आलें तर येईल,* असें आम्हांस वाटतें.

पेपीज ह्या रोजनिशीकाराचा अभिप्राय मागें एके ठिकाणीं दिलाच आहे, त्याची येथें वाचकांस आठवण होईलच. तो थोडक्यांत पण प्रतिकूल आहे. मि० हॅजलिट यांनीं दिलेल्या अभिप्रायांत प्रतिकूल अभिप्रायाचें सकारण उद्घाटन केलें आहे त्यांत बरेंच तथ्य आहे यांत शंका नाहीं. या नाटकांतील पऱ्यांचीच गोष्ट घेऊं. हें नाटक लोकांपुढें

* वरील उताऱ्याचा मूळ इंग्रजी लेख अभिज्ञ वाचकांसाठीं खालीं देतों:–

"The Midsummer night's Dream when acted is converted from a delightful fiction into a pantomime. all that finest in the play is lost in the representation. The spectacle was grand but the spirit was evaporated. The genius was fled. Poetry and stage do not agree well together. The attempt to reconcile them in this instance fails not only of effect but of decorum. The ideal can have no place upon the stage......Imagination can not sufficiently qualify the actual impression of the senses. Any offence given to the eye is not to be got rid of by explanation. Thus Bottom's head in the play is a fantastic illusion produced by majic spells : on the stage it is an ass-head and nothing more ; ...... When ghosts walk at midday—when apparitions stalk along Cheap side then may Midsummer night's Dream be represented."

येण्यापूर्वी पऱ्या व पिशाच्चें यासंबंधींच्या कल्पना फारच भेसुर व भयाण होत्या. पिशाच्चें त्रासदायक व आग्या वेताळांसारखीं भीतिप्रद असतात, तीं रात्रीच्या वेळींच बाहेर पडतात, माणसांना भेवडावतात, अगदीं सळो कीं पळो करून सोडतात, अशी लोकांची कल्पना एके काळीं इंग्लंड देशांत देखील होती. पण या नाटकानें त्यांत केवढा बदल केला ! मूळच्या कल्पना तर बदलल्या नाहींत, पण त्याच पऱ्यांना सध्यां तिकडे इतकें हृदयंगम स्वरूप मिळालें आहे कीं, इंग्रजी भाषेंत पऱ्यांच्या गोष्टीसंबंधानें किती तरी मोठा ग्रंथसमुदाय तयार झाला आहे. आबालवृद्ध स्त्रीपुरुष ते ग्रंथ हौसेनें वाचतात, मुलें इतकीं धीट झालीं आहेत कीं, पऱ्यांना मुळींच भीत नाहींत; ह तर आपणाला भेटेल काय. अशी उत्कंठा त्यांस होतें. पिशाच्चविषयक कल्पनांत या नाटकांतील वर्णनांनीं जरी एवढा फरक घडवून आणिला आहे तरी त्याच पऱ्या नाटकांतील वर्णनाबरहुकूम रंगभूमीवर प्रेक्षकांसमोर आणतां येतील काय ? फुलांत झोंपणाऱ्या, गीतांच्या आणि नाचांच्या तालावर अंगाई करणाऱ्या, फुलपाखरांच्या पिसांचा पंखा डोळ्यांवर धरून चंद्रकिरणें वारणाऱ्या अशा शेक्स्पियर कवीच्या मनोगम्य सृष्टींत निर्माण झालेल्या पऱ्या कोणीकडे आणि रंगभूमीवरील साडेतीन हात उंचीच्या

नाटकपात्रें कोणीकडे ? कल्पनामय सृष्टींतील तें नाजूक प्राणी या जड चर्मचक्षूंना दिसतील काय ? एखाद्या पोऱ्याला दाढी लावून आबेरान म्हणून रंगभूमीवर जेव्हां उभा करितात, किंवा मूर्तिमान् हास्यदेवता अशा 'पक' परीचें सोंग एखाद्या छचोर व चावट पोराला देतात, अगर चित्रविचित्र रंगाची सुरेखशी साडी नेसलेली टिटॅनिया परी जेव्हां डुलत डुलत पडदा सारून रंगभूमीवर येते तेव्हां कल्पनेच्या रम्य प्रदेशांत त्या कविनिर्मित प्राण्यांच्या सहवासाचा लाभ ज्याला प्राप्त झाला आहे अशा प्रेक्षकाला हीं सोंगें किती ओंगळ व हिडिस वाटतील बरें ! कल्पनानिर्मित टिटॅनिया व बॉटम यांच्यामधील संवाद कल्पनेनें उत्पन्न केलेल्या वनांत चालला आहे, असें जेव्हां मनांत येतें तेव्हां किती बहार वाटते ! पण ही बहार रंगभूमीवर कांहीं साध्य होत नाहीं. अगदीं अलीकडील सुधारलेल्या नाट्यसामुग्रीनें सजविलेल्या नाटकगृहांत विसाव्या शतकांतील सर्व शोधांचा उपयोग करून जो अरण्याचा हुबेहूब देखावा दाखविण्यांत येतो, तशा देखाव्यानेंसुद्धां प्रेक्षकाचें मन भाळत नाहीं, हें तर काय, पण लावण्यलतिका जी टिटॅनिया तिच्या बाहुपाशांत अडकलेलें तें गाढवाचें डोकें पाहून देखील ज्याला त्यांतला खरा प्रकार कळत नाहीं, असा अजागळ प्रेक्षक ह्या काळांत कोणी असेल काय ?

नाट्यकलेच्या साधनसामुग्रींत आजमितीस इतकी सुधारणा झाली असतांही जर ही दशा, तर शेक्स्पियर कवीच्या वेळीं व पेपीज याच्या वेळीं अशा साधनसामुग्रीचा अभाव असतांना, काय स्थिति असेल, याची कल्पना करणें फारसें अवघड नाहीं. केवळ पऱ्यांच्या प्रकरणांतच असा प्रकार आहे असें नाहीं. नाटकांत प्रत्यक्ष दाखविण्यांत येणाऱ्या प्रत्येक प्रवेशाची व देखाव्याची अशीच रड आहे असेंही म्हणावयास चिंता नाहीं. नाटक तर केवळ कल्पनाजन्य सुख देणारें एक काव्य होय. अर्थात् मधुर गीतध्वनीचें चित्र काढणें जितपत मानवकलेला सुसाध्य आहे तितपतच या कल्पनासृष्टीचा दृश्य चित्रपट रंगविणें सुसाध्य आहे. तुताऱ्यांच्या नादांत थाटामाटानें प्रवेश करणारा थिसियस राजा, त्याचप्रमाणें चिलखत व शिरस्त्राण चढविलेली रंगभूमीवर अवतीर्ण झालेली हिपोलायटा राणी यांचीं सोंगें सांप्रत आमच्या कल्पनेला कधींही पटणार नाहींत. आतां कांहीं टीकाकार म्हणतात कीं, या नाटकाचा उठाव व्हावा तसा होत नाहीं, तें दृष्टीला अगदींच मंदट वाटतें. एके दृष्टीनें हें म्हणणें बरोबर आहे, तेव्हां याचें कारण जर पाहिलें, तर आमच्या मतें इतकेंच दिसतें कीं यांत पात्रांच्या स्वभावाचा विकास नीटसा झालेला नाहीं. मॅलोन तर असा प्रश्न करितो कीं,

' हर्मिया, डिमेट्रियस आणि हेलेना, लायझेंडर हीं पात्रें ह्मणजे परस्परांचीं केवळ प्रतिबिंबें होत. त्यांच्या घटनेंत काय वैचित्र्य आहे हें आम्हांस कळत नाहीं. अशा पात्रांकडून प्रेक्षकांच्या हृदयांत कांहीं तरी ठसा उमटेल काय ? मग त्यांची हृदयवृत्ति खवळून जाण्याची गोष्ट दूरच ! आम्हांस तर अशा टीकेंत कांहींच अर्थ वाटत नाहीं. नाटकाचें मूळ कथानकच असें बहारीचें आहे कीं, त्यांत पात्रांच्या स्वभावाचा विकास होण्याची कांहींच गरज नाहीं. आणि मनोवृत्ति क्षुब्ध करून सोडणें हें अशा नाटकाचें काम नाहीं. वस्तुतः चित्तवृत्ति खवळून टाकण्याचें काम शोकपर्यवसायी नाटकाचें आहे. हें लक्षांत ठेविलें असतां मॅलोन याच्या टीकेंतला शुष्कपणा कोणाच्याही सहज लक्षांत येईल.

आतां हा उपोद्घात संपविण्यापूर्वी अद्भुत चमत्कार व अलौकिक कृत्यें यांचा संबंध नाटकांतून व सामान्यतः कोणत्याही कादंबऱ्यादि ग्रंथांतून कसा आणावा त्याविषयीं उपसंहाररूप चार शब्द मात्र येथें लिहितों. त्या प्रकरणांत शेक्स्पियर कवीची रीत कशी होती व आपले इकडील महाशय तज्ज्ञजनांनीं कोणती रीत अवलंबिली आहे हें पाहिलें असतां अनेक विचार मनांत येतात, व अलौकिक कृत्यें जशीं घडलीं म्हणून भाविक लोक समजतात; तशींच तीं मानणें

ह्मणजे सृष्टिनियमांचा भंग करून त्याचा सर्वथा विपर्यास करण्यासारखें आहे. व असा विपर्यास कोणाही सुशिक्षित मनुष्याच्या विचारी मनास पसंत पडेल असें वाटत नाहीं. या बाबतींत शेक्स्पियर--संप्रदाय कसा आहे ह्याविषयीं बरेंच विवेचन प्रसंगोपात् वर येऊन गेलेंच आहे. परंतु आधुनिक लेखकाचा विचार मनांत घेतांच अशा तुलनेला योग्य अशा संतसखू नाटकाची आठवण वाचकांस येथें होईल. हें नाटक अलीकडे फारच लोकप्रिय झालेलें दिसतें. आणि त्या लोकप्रियतेचें कारणही यांत देवाचीं कित्येक अद्भुत कृत्यें जशींच्या तशींच वर्णिलीं आहेत हेंच मुख्यत्वें आहे. आपल्यांतील भाविक लोकांच्या मनाची प्रवृत्ति कशी आहे हें पाहून भक्तिविजयांतील एक लहानशी कथा संतसखू नाटकाच्या कर्त्यानें उचलून घेतली व तिच्या पायावर एका लोकप्रिय नाटकाची इमारत उठवून दिली, पण ती उठवितांना सृष्टिक्रमांच्या विपर्यासाचा विचारही त्याच्या मनांत आला असेलसें दिसत नाहीं. वस्तुतः सृष्टिनियमांचा भाविक लोकांच्या समजुतीशीं मेळ घालून देण्याची खटपट त्यानें करावयाची होती. पण त्या खटपटींत तो मुळीं शिरलाच नाहीं, किंबहुना अशा अस्ताव्यस्त भाविक-समजुतींच्या तळाशीं गूढरूपानें वास करीत असलेल्या ह्या सृष्टिनियमांचा उलगडा करण्याचा शीणही त्यानें आपल्या

सुविचारगर्भ मनास तिळमात्र दिला नाहीं, असें मोठ्या दुःखानें ह्मणावें लागतें. ही गोष्ट एकंदर संतांच्या अनेकविध लीलांसही लागू पडते. ज्ञानोबारायांनीं रेड्याकडून वेद ह्मणविला ही एकच गोष्ट उदाहरणार्थ घ्या. ही गोष्ट संतांच्या अत्यंत मठ्ठ भक्तजनांपैकीं अत्यंत अंध समजुतीसही बहुधा मान्य होणार नाहीं, मग तुम्हां आह्मासारख्या थोडाबहुत विचार करणारांस ती कशी पटेल? पौराणिक नाटकांतील बहुतेक पात्रांत वरील दोष दिसून येतो. किर्लोस्करकृत संगीत उत्तम सौभद्र नाटकाची ह्या दोषाच्या पायीं काय दुर्दशा झाली आहे त्याचें दिग्दर्शन मागें तुफान नाटकाच्या उपोद्घातांत केलें आहे, त्याकडे वाचकांचें लक्ष जाणें अवश्य आहे. ह्या बाबतींत संतांच्या चमत्कारासारखा एक वादसंग्रामचमत्कार आह्मांस पहावयास मिळाला. त्याची हकीकत येथें सांगितली असतां, अप्रासंगिक होणार नाहीं. एकदां एका भाविक वारकऱ्याशीं सुशिक्षित ह्मणविणाऱ्या ह्मणजे अर्धसुशिक्षित गृहस्थाचा वाद लागलेला आमच्या पाहण्यांत आला. वारकरी म्हणे, ज्ञानोबांनीं रेड्याकडून वेद बोलविला. त्यावर सुशिक्षित गृहस्थ म्हणाला, मींही ही हकीकत वाचली आहे पण ती खरी असेलशी वाटत नाहीं. त्यावर वारकरी म्हणाला, कां बरें? ज्ञानोबा महान् साधु नव्हते काय? त्यांस असंभाव्य असें

काय होतें ? पुढें बोलतां बोलतां देव अघटित कृत्यें करीत नाहीं किंवा संतांच्या ठिकाणीं अद्भुत कृत्यें करण्याचें सामर्थ्य नाहीं, असें धडधडीत बोलून दाखविण्याची छाती न झाल्यामुळें प्रत्येक भाषणांत वारकऱ्याची कोटि त्या सुशिक्षिताच्या अंगावर येऊं लागली. बरें, मान डोलवून रेडा वेद बोलेल असेंही त्याच्यानें कबूल करवेना. परंतु गडी मोठा आग्रही दिसला. मग रेडा वेद कसा बोलेल ? तुम्हीच बोलवून दाखवा ना ? एवढाच हेका तो धरून बसला. आणि वारकरीही तितक्याच आग्रहानें आपला पक्ष ताणून धरितां धरितां शिव्याशापावर त्यानें पाळी आणली. त्यांचा हा वादलीलाचमत्कार पाहून त्रासून गेल्यामुळें आमच्या एका मित्रानें त्या दोघांस गप्प बसविण्याची एक युक्ति केली. त्यांस हांक मारून ह्मटलें, ' रेड्यानें वेद ह्मटला ही गोष्ट खोटी नाहीं; आह्मीही ती खरी मानतों. ' हे शब्द ऐकतांच वारकऱ्यास संतोष वाटला. मग पुढें त्या अर्धसुशिक्षिताकडे वळून आमच्या मित्रानें त्यास सांगितलें कीं, तुझ्याही बोलण्यांत तथ्यांश आहे. तुमचा वाद तुमच्या भाषणपद्धतीनें कधीं मिटणार नाहीं. यास्तव मी काय म्हणतों तें एकवार ऐकून घ्या. ' अहो ! ह्या आख्यायिकेची पूर्वपीठिका अशी आहे कीं, ज्ञानोबारायांच्या शिष्यमंडळींत एक अत्यंत मूढ, तरुण मनुष्य

होता. त्याच्या मठ्ठपणावरून ते त्यास रेडा म्हणत असत.' अशा मनुष्यासही मोठ्या प्रयासानें शिक्षण देऊन त्यांनीं वेद पढविला व काशीयात्रादि प्रवासाहून स्वस्थळीं परत आल्यावर त्यांच्या पिच्छेस लागलेले कित्येक खदिदुर्जन तेथें होते, त्यांस ते सहज म्हणाले, 'आम्हां संतांस काय अशक्य आहे ? रेड्याकडूनही आह्मी वेद म्हणवूं. ' लगेच त्यांनीं आपल्या तैनातींत असलेल्या त्या मठ्ठ शिष्यास बोलावून सांगितलें, ' रे गड्या, वेद बोल. ' असें म्हणतांच त्यानें खडाखड् बोलण्यास सुरुवात केली; व आलेल्या मंडळीस आश्चर्यचकित केलें. सर्वांस ठाऊक होतें कीं, हा मनुष्य अगदीं मठ्ठ. त्यास ज्ञानदेवही रेडा ह्मणूनच कित्येक वेळां हांका मारीत असत; व मंडळीही त्याच विशेषणानें ओळखीत असत. मग आश्चर्यचकित होत्साती मंडळी " आज रेड्यानें किंहो वेद म्हटला, व तो चमत्कार ज्ञानोबारायांनीं किंहो करून दाखविला ! " असें म्हणत निघून गेली. ही पूर्वपीठिका समजतांच रेड्याच्या वाणीचा उलगडा पडला व वारकरी आणि अर्ध-सुशिक्षित यांजमधील वाद मिटला.

संतसखूनाटकांतले जे अलौकिक चमत्कार वर्णिले आहेत त्यांचें स्वरूप थोडक्यांत महिपतीचेच शब्द उतरून

घेऊन नाटककारानें आकाशवाणीच्या रूपानें वर्णिलें आहे तें असें:—

( ओंव्या. )

गिरिजेचें रूप धरोनी । सखूसि दिधलें सोडोनी ॥
स्वयें मग सखू बनुनी । तत्पतीसी तोषविलें ॥
गरुडें वाट दाखविली सखूस । ती गेली पंढरी नगरीस ॥
येवोनि माझ्या राउळास । पायीं मिठी घातली ॥
माझे चरणीं वाहिला । सखूनें प्राण आपुला ॥
ब्राह्मणीं तद्देह जाळिला । सर्वथा सत्य हें असे ।
परि रुक्मिणीनें तिजला । पुनः घालुनी जन्माला ॥
दिधलें लावुनि कऱ्हाडाला । करावया संसार ॥

असे चमत्कार नाटकांतून प्रत्यक्ष करविण्यांत काय चमत्कार असेल तो असो. आम्हांस तर हा शुद्ध पोरकट प्रकार वाटतो. नाटक तर रम्यचमत्कारमय असावें. मनोगम्यकल्पनातरंगांच्या मालांवर माला प्रेक्षकांच्या व वाचकांच्या मनांत त्याच्या दर्शनानें व वाचनानें उत्पन्न झाल्या तरच तें नाटक “ नाटक ” ह्या नांवास पात्र होईल. परंतु संतसखूच्या कर्त्यानें ह्या चमत्कारांच्या पायांवर त्यांची सुसंगता दाखवून कांहीं नाट्यकुशलता दाखविलेली दिसून येत नाहीं. आरंभापासून प्रवेशांवर प्रवेश ह्या दैविक

चमत्कारलीलांनीं भरलेले दिसतात. पात्रांचीं भाषणें, चटकदार बायकांचीं ठसकेदार बोलणीं, धुण्याचे पिळे व कमरेवर घागर, हातांत कळशी असे देखावे, आणि शेवटीं कजाग सासूचा दणका व बायल्या पतीचा दुर्बळपणा यांच्या मौजेंतच अप्रबुद्ध वाचक व प्रेक्षक तल्लीन होऊन खुष होत असतील तर होवोत, आह्मांस तर यांत कांहींच रुचि लागत नाहीं, असें स्पष्टपणें सांगणें जरूर आहे. शेक्स्पियर-संप्रदाय वरील पद्धतींच्या अगदीं उलट आहे. चमत्कारजन्य संभ्रम उत्पन्न करून त्यांत वाचकांचीं व प्रेक्षकांचीं मनें बुडवून टाकणें यांत नाटककारांची कुशलता आहे. ह्या कुशलतेस उद्देशून शेक्स्पियर कवीच्या एका नामांकित टीकाकारानें आपलें असें मत दर्शविलें आहे:—

Each change of many-colour'd life he drew,
Exhausted worlds, and then imagined new.

*Dr. Johnson.*

---

# प्रस्तावना--परिशेष.

## नाट्यविषयचर्चा.

प्रस्तुत खंडाच्या आरंभीं प्रस्तावनेंत आह्मीं वाचकांस कळविलेंच आहे कीं, विविधज्ञानविस्तार मासिकपुस्तकांत आमचा तिसरा खंड "व्हेनिसनगरचा व्यापारी" या ग्रंथावर एक टीकात्मक लेख प्रकट झाला आहे. त्यांतील टीका आम्हांस अनुकूल नाहीं इतकेंच नाहीं तर ती सर्वथा प्रतिकूल आहे. टीकाकारांचें म्हणणें थोडक्यांत असें आहे कीं, रा. बेलसरे यांनीं इतःपर ग्रंथच लिहूं नयेत. ह्या टीकेस उत्तर देण्याची फारच अवश्यकता आहे, यास्तव अगोदर टीकेचें स्वरूप काय आहे हें वाचकांच्या लक्ष्यांत यावें ह्मणून तींतून मुख्य मुख्य मुद्यांचे उतारे खालीं देतोंः—

आरंभालाच त्यांनीं लेखाचा "श्रीगणेशा" केला आहे तो असाः—

> " जेथें प्रवेश करण्यासहि सन्त भीती ।
> निःशंक तेथ घुसुनी खळ आंत जाती ॥ "

यापुढें शेक्स्पियरच्या बुद्धिमत्तेची प्रशंसा करून त्याच्या ग्रंथांचे मराठींत अनुवाद करणाऱ्या कांहीं अधिकारी गृह-

स्थाचीं नांवें दिलीं आहेत. आतां हीं नांवें वाचून पहातां असें आढळून येतें कीं, सदर गृहस्थांनीं केवळ एकएका नाटकाचाच मराठी अनुवाद केलेला आहे; केवळ रा ब. यांचे हातून मात्र त्यांचे मोहविलसित व तारा हे दोनच अनुवाद मराठींत आले आहेत, परंतु महाराष्ट्राची पुण्याई सांप्रत विशेष असल्यास त्यांचे हातून त्यांच्या हयातींतच शेक्स्पियरचे आणखी कांहीं अनुवाद लवकरच मराठी वाचकांस वाचावयास मिळावयाचें भाग्य उदयास येईल असा संभव आहे.

पुढें आमच्या ग्रंथाचे प्रकाशक के० सी० कुळकर्णी आणि मंडळी यांस हें कृत्य भूषणावह आहे अशी आटपशीर प्रशंसा करून हे टीकाकार पुस्तकाच्या दिरंगाईची प्रशंसा करण्याचा आव घालतात. येथें त्यानें मोठ्या कुशलतेनें पुस्तकाचे कर्ते रा० बेलसरे यांचे नांवाचा उच्चार करण्याची चिळस वाटूनच कीं काय, आपल्या सबंध टीकेंत त्यांच्या नांवाचा स्पर्शही होऊं दिला नाहीं! ही चुकवाचुकव त्यानें फारच चतुराईनें केली आहे, असें दिसून येतें. नंतर शेक्स्पियरच्या ग्रंथांच्या मेजवानीचा बेत कसा काय आहे त्याचें वर्णन टीकाकार येणेंप्रमाणें करितातः—

“पुठ्ठा रंगित, जाड कापडी, कागद चांगले, छपाई चांगली, अर्पणपत्रिका व मुखपृष्ठही चांगलें,–म्हणजे पंक्तीचा बेत उत्तम, पाटरांगोळ्या चांगल्या आहेत, पानेंही आगोतीचीं प्रशस्त मांडलीं आहेत. उदबत्त्यांचाही घमघमाट आहे, गंध केशरी आहे; पण पानांवर जे पदार्थ वाढले आहेत ते मात्र चांगले खुमासदार आहेत कीं कसे एवढेंच पहावयाचें आहे. ते वरवर चाखून पाहिल्यावर ( कारण सबंध घांस मिळण्याची पंचाईत म्हणून ) आम्हांस जें कांहीं वाटलें तेंच येथें करून ठेवण्याचा आमचा विचार आहे.”

यापुढील हातघाईचा प्रकार टीकाकाराच्याच शब्दांनीं सांगावा हें बरें ! तो पुढें म्हणतोः—

“ गोड खाण्याकरितां हापापलेल्या मनुष्याचा हात जसा मुख्य पक्वान्नाकडे वळतो, तशीच आमची नजर पहिल्यानें भाषांतराकडे गेली व शेक्स्पियरच्या कृतीच्या अनुपम मेव्याच्या अगदीं गाभ्याचा लचका तोडण्याविषयीं आह्मीं प्रयत्न केला. ‘1001 Gems of Poetry’ या नांवाचें जें काव्यसंग्रहाचें इंग्रजी पुस्तक आहे तें हातांत घेऊन त्यांत दिलेले मूळ ग्रंथांतील उतारे व प्रस्तुत पुस्तकांत केलेलें त्यांचें भाषांतर ताडून पाहूं लागलों तों आम्हांस कसेंसेंच वाटूं लागलें. आमच्या अनुभवाची कांहीं तरी खूण वाचकांस पटावी म्हणून इंग्रजी मूळ आणि त्याचें भाषांतर खालीं देतोंः—

[ मूळ. ]

“Signior Antonio, many a time and oft,
In the Rialto you have rated me

About my *monies* and *usances* ;
Still I have borne at with a patient *shrug*"

" अहो राजश्री, सराफकट्टयांत आपली गांठ पडली असतां आपण माझ्या व्याजबट्टयाबद्दल व माझ्या पैक्याबद्दल किती वेळां बरें निंदा केली आहे ? पण मी तुम्हांला कधीं कांहीं बोललों तरी ? आपण जें जें बोलला तें सर्व निमूटपणें सोसून घेतलें आणि " जाऊं द्या " असें म्हणून स्वस्थ बसलों. "

वरील भाषांतरांत आणि इंग्रजींतील मूळ उताऱ्यांत किती तफावत आहे, याचा वाचकांनींच विचार करावा. १. " आपली गांठ पडली असतां " हा अधिक मजकूर कोठून आला ? २, ३. व्याजबट्टा आणि पैका याचा व्युत्क्रम कां झाला ? ४. मूळांतील स्वार्थी वाक्याबद्दल प्रश्नार्थक वाक्य कां केलें ? Shrug म्हणजे काय ? "पण मी तुम्हांला" येथपासून तीन ओळी " Still I have borne it with a patient shrug " या वाक्याचाच अर्थ ना ?

[ मूळ. ]

" You call me misbeliever, cut-throat dog "

" तुम्ही मला नेहमीं काय म्हणतां ? तूं पाखांडी आहेस, गळेकापू आहेस, कुत्र्यासारखा लघाळ आहेस. "

या भाषांतरांतही स्वार्थी वाक्याबद्दल प्रश्नार्थक वाक्य आहेच; पण Cut-throat हें कुत्र्याचें विशेषण मूळांत आहे, त्याचा अर्थ " गळे-

304601

कापू" करून तें विधानार्थी योजिलें आहे व dog या शब्दाचा "कुत्र्यासारखा लघाळ" असा अर्थ केला आहे! हा लघाळपणा कोठून आला व Cut-throat dog या दोन शब्दांच्या अर्थाचीं खंडें कोणत्या आधारानें पाडलीं हें भाषांतरकारासच माहीत!

यानंतर भाषांतरांतलें वैगुण्य दाखविण्याकरितां टीकाकारांनीं हा पुढील उतारा देऊन त्यावर आपलें मत दिलें आहे. प्रीतिकल्पनेचें करुणगीत या पद्यावर टीकाकारांची टीका येणेंप्रमाणें आहेः—

[ मूळ. ]

"Tell me where is fancy fed
Or in the heart or in the head?
How begot how nourished?
Reply, reply."

[ भाषांतर. ]

"जन्मली कुठें प्रीति कल्पना। १०
सत्य तें वदा, त्यजुनि जल्पना। ११
हृदयपंकजीं म्हणति जन्मली। १२
म्हणति ही मनोभ्यंतरस्थलीं। ११

या श्लोकांत कवींच्या प्रश्नार्थक उत्प्रेक्षेचें स्वार्थी जनोक्तींत रूपांतर झालें. तें असो. पण in the head याचा "**मनो**भ्यन्तरस्थलीं" म्हणजे मनाच्या अगदीं आंतल्या गाभ्याच्या अवकाशांत, हें भाषांतर करसेंच लागतें. पण कवींना अंकुश नाहीं, ह्याचा आम्हांस विसर पडला! ह्मणति ह्मणति–ही द्विरुक्तीची खुबी मनोहर आहे. दुसरी ओळ वृत्तपूरणार्थ आहे हें सांगणें नको!

## [ मूळ. ]

“ It is engendered in the eyes,
With gazing fed; and fancy dies.
In the cradle where it lies.
Let us all ring fancy's knell:
I'll begin it, Ding, dong, bell.”

## [ भाषांतर. ]

मजसि तो गर्मे जन्म ही धरी ११
नयनमान्दिरीं, भुवनसुन्दरी । १२
निमिषचालनें उदय पावली १२
वीक्षणें तशी पुष्ट जाहली ॥ २ ॥ १०
गोष्ट परि पुढें काय वर्तली ? ११
ही वया क्षणीं नष्ट जाहली । १०
दृष्टमात्र ही कोंवि लोपली १०
हाय हायरे ! शुद्ध सावली ॥ ३ ॥ १०
पाळण्यांतच्चि स्वर्ग गांठि रे । १०
प्रीतिसावली हाय हायरे ! १०
करुणगीत या प्रीतिचें पुरें । ११
तरि म्हणूं मुखें हाय हायरे ! ११
क्षणिक मात्र ही प्रीति जी दिसे ११
काय तरि तिचें काम तें असे ? ११
शुद्धरूप जी हृदयभावना ११
तीच आदरूं बोध द्या मना ॥ ५ ॥ १०

मूळ इंग्रजींतल्या ५ ओळींच्या भाषांतरास मराठींत १६ ओळी लागल्या. पहिल्या ओळींतील “ जन्म ही धरी ” दुसऱ्या ओळींतील

" नयनमंदिरीं " हें engendered in the eyes याचें भाषांतर झालें. बाकीचे " भुवनसुंदरी " इत्यादि शब्द वृत्तपूरणाकरितां घातले आहेत. असो. पण तिसऱ्या ओळींतील " निमिषचालनें उदय पावली" हें कशाचें भाषान्तर ? " उदय पावली " म्हणजे जन्मास आली असा अर्थ करावा, तर पुनरुक्तीचा दोष येऊं पाहतो. With gazing fed याचें हें भाषांतर धरावें तर " वीक्षणें तशी पुष्ट जाहली " या चरणाची काय वाट लावावयाची ? पुढील २ ओळी, म्हणजे ५ आणि ६, या वृत्तपूरणार्थी आहेत हें उघड आहे. पण ७ वी ओळ वाचून आह्मी अगदीं गांगरून गेलों. " निमिषचालनें उदय पावल्या " वर व " वीक्षणानेंच " पुष्ट झाल्यावर " दृष्टमात्र " होतांच ही लोपली कशी ? विरुद्धार्थं म्हणण्याची छाती होईना, म्हणून इंग्रजी टीकाकारांकडे धांवलों. त्यांचीं पुस्तकें चाळतां चाळतां Deighton यांचे टिपणांत in the cradle where it lies यावर *i. e.* the eye which first gave birth to it and in which it dies when the object is withdrawn अशी टीप सांपडली. " when the object is withdrawn " हें Deighton साहेबांनीं कोठून आणलें ? ते इंग्रज आहेत. असोत बिचारे ! त्यांस शेक्स्पियरचें रहस्य समजलें कशावरून ? आठवी ओळ वृत्तपूरण आहे ९ व्या ओळींत " पाळण्यांत " हा मूळांतील " in the cradle " शब्दांचें भाषांतर होय, व " स्वर्ग गांठिरे " ही " दृष्टमात्र " लोपल्याचीच अधिक व्याख्या होय. पण "गांठणें" या शब्दांत कष्टाचा किंवा श्रमाचा ध्वनि असतो, अशी आमची गरीब समजूत आहे. पण " दृष्टमात्र " होतां " नष्ट " होऊन " लोपणारीस " कष्ट कोठून पडावे ? १० वी

ओळ वृत्तपूरण. व ११ व्या ओळींत, knell या इंग्रजी शब्दास मराठी पर्यायशब्द " करुणगीत " समजावयाचा ! १२ वी ओळ पुनः वृत्त-पूरणार्थी समजावयाची. शेवटचे चार चरण, म्हणजे ओळी १३–१६, ही भाष्यकाराची पूरणिका होय ! ह्या श्लोकांतील शेवटला चरण कोणांस उद्देशून आहे ? "आदरूं" हें प्रथम पुरुषीं व "बोध घ्या" हें आज्ञार्थी द्वितीय पुरुषीं ! कोणी बोध घ्यावयाचा ? मनानें असें ह्मणावें तर तें एकवचनी. मोठीच पंचाईत !

मूळ इंग्रजींत गाणें आहे, तसें हेंही गाणेंच असेल असें आम्हांस पहिल्यानें वाटलें. परंतु भाषांतरकारांनीं " कामदा–वृत्त " असें शिरो-भागीं कंसांत सुचविलें आहे–म्हणून आह्मी गण वगैरे पाडण्याच्या विचारांत होतों, पण पहिल्यानें अक्षरेंच मोजून पहावीं असें मनांत आलें. अक्षरें मोजलीं तों अजब चमत्कार दृष्टीस पडला ! तो असाः—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| श्लोक | पहिला. | चरणास | अनुक्रमें | अक्षरें. | १०-११-११-११ |
| ,, | दुसरा. | ,, | ,, | ,, | ११-१२-१२-१० |
| ,, | तिसरा. | ,, | ,, | ,, | ११-१०-१०-१० |
| ,, | चवथा. | ,, | ,, | ,, | १०-१०-११-११ |
| ,, | पांचवा. | ,, | ,, | ,, | ११-११-११-१० |

मिळून कशास कांहींच मेळ बसेना ! पण छंदःशास्त्राची तरी जबर-दस्ती कां ? कवी निरंकुश नाहींत का ?

या समश्लोकीची खुमारी पाहून वाचकांचे तोंडास खवखव सुटली असेल, म्हणून आणखी एक समश्लोकीचा मासला त्यांस सादर करितों. ही दुसरी समश्लोकी पहिलीची पुरणिका आहे. बासेनियो करण्डकाची

निवड करण्याकरितां निघाला, तेव्हां जें गाणें म्हणण्यांत आलें, त्याची समश्लोकी वर दिली आहे. आतां पुढें जी समश्लोकी आह्मी देत आहों, ती करण्डकाची निवड झाल्यावरची आहे. अर्थात्, तींत बासेनियोचें अभिनंदन आहे. बासेनियो म्हणतो, " Here's the scroll, the continent and summary of my fortune." याचें भाषांतर " बरें, पण या लिखितपत्रांत काय लिहिलें आहे, हें पाहूं—हो या पत्रावरच माझें जीवित अवलंबून आहे." वा ! काय भाषांतर ! मूळांतील continent and summary of my fortune याचा अर्थ " जीवित अवलंबून आहे !" बा शेक्स्पियरा ! नशीब तुझें म्हणून असा भाषांतरकार तुला लाभला !

[ मूळ. ]

You that choose not by the view,
Chance as fair and choose as true !
Since this fortune falls to you,
Be content and seek no new.
If you be well pleased with this
And hold your fortune for your bliss,
Turn you where your lady is
And claim her with a loving kiss

[ भाषांतर. ]

१ भलेरावजी ! ठीक केली परीक्षा,
२ नको बाह्य शोभा, तिचा काय लेखा ?
३ विवेकेंच कीं, दैव होतें प्रसन्न,
४ जगा दाविली गोष्ट ही शिष्टमान्य ॥ १ ॥

५ जिची मूर्ति येथें सुतेजें विराजे,
६ जिला लोभले मोठमोठेंहि राजे,
७ वसे कीं तिची अंतरीं प्रीति साची ?
८ तरि ( री ? ) भेट द्या आजि त्या सुंदरीची ॥२॥
९ बरें योग्य दैवें दिलें जें तुह्माला,
१० जरि ( री ? ) त्यांत संतोष वाटे जिवाला ।
११ जरि ( री ? ) प्रीति साची, न गोडी दुजीची
१२ तरि ( री ? ) भेट द्या जा तिये सुंदरीची ॥ ३ ॥
१३ प्रिया ती शुभांगी पहा येथ दारा,
१४ पुढें बैसली तूमची हीच दारा,
१५ स्वतां भेटी ( टि ? ) ला जीहि उत्कण्ठ झाली
१६ करा धन्य ती भेटूनी कंठनालीं ॥ ४ ॥

वरील समश्लोकींत ३-४-५-६-१३-१४ ह्या ओळी केवळ वृत्तपूरणार्थ आहेत. इंग्रजी मूळांतील पहिल्या दोन ओळींत स्वार्थी विधान आहे; त्याचें भाषांतर प्रश्नार्थी केलें असून chance as fair and choose as true याचा अर्थ जसा यावा तसा आलाच नाहीं. ३–४ ओळींतील विधानास मूळांत आधार नाहीं. "जिची मूर्ति–विराजे" याला मूळांत this एवढाच शब्द सांपडतो. ६ वी ओळ शुद्ध पदरची आहे. Be content and seek no new ह्या आज्ञार्थी वाक्याचा संकेतार्थ होऊनच राहिला नाहीं; तर त्याचे खण्ड पडले व पुढचा अर्धा तुकडा ११ व्या ओळींत जाऊन पडला ! ८-१०-११-१२ ओळींतील 'जरी' या शब्दाची दीर्घ वेलांटी फुकटच तुटली. "प्रिया शुभांगी दारा" पुढें होती कशावरून ? १५ व्या ओळींत "भेटीला" यांतील 'टी' दीर्घ कां झाली ? असो. "उत्कण्ठ झाली" म्हणजे काय ?

" उत्कण्ठा " हें नाम आहे. त्यावरून " उत्कण्ठित ", " सोत्कण्ठ " अशीं विशेषणें आमच्या पाहण्यांत आहेत. पण समजलों ! भेटीकरित प्रियेनें " कण्ठ " वर केला होता, म्हणजे उंच मान करून उभी होती, आणि म्हणूनच पुढल्या ओळींत " भेद्गनी कंठनालीं " असे शब्द आले असावे ! पण " कंठनालीं भेद्गन " म्हणजे काय ? कंठनालाचें **भेदन** अथवा **छेदन**–आणि तेंही प्रियेच्या ! छे ! छे ! मग हें काय असेल ? कदाचित् **भेटुनी** या शब्दाचें " मुद्रकपिशाच्चानें " **भेद्गनी** तर केलें नसेल ! पण कण्ठ**नालीं** भेटावयाचें म्हणजे गळ्याच्या किंवा मानेच्या पोकळ नळीला मिठी घालावयाची असा अर्थ असेल ! " झाली " या शब्दाला प्रास पाहिजे होता, म्हणून कण्ठाचे पुढें ना ठेवून दिला ! ठीक !

## [ मूळ. ]

(1) " So may the outward shows be *least themselves.*

(2) The world is still deceived *with ornament*

(3) In law, what *plea so tainted and corrupt,*
But, being *seasoned with a gracious voice*
Obscures the show of evil ?

(4) The *beauteous scarf* velling an *Indian beauty.*

(5) Thy *plainness moves* me more than *eloquence.*

## [ भाषांतर. ]

( १ ) आणि अशाच रीतीनें या जगांत वस्तूंचें बाह्य स्वरूप पाहून लाक **फसत असतात.**

( २ ) त्याचें कारण ह्मटलें म्हणजे **कल्पनेचे नुसते तरंग हेंच होय.**

( ३ ) बरें न्याय अन्याय कोणता हें पाहिलें तर जी **धडधडीत खोटी गोष्ट तिचा खोटेपणा** एखादा वकील केवळ **आपल्या पांडित्यानें व शब्दजालानें** लपवून टाकतो, नाहीं काय ?

( ४ ) कोणी स्त्री **स्वतः कुरूप आहे** व वर्णानें काळी आहे तेव्हां ती **तोंडावरून बुरखा घेते.**

( ५ ) " तथापि ज्या ह्या ओळी तुझ्यावर कोरल्या आहेत त्यांजकडे मी लक्ष देत नाहीं. पण केवळ ह्या **फिक्कटपणाकडे** पाहून माझें मन तुझ्याकडे **विशेष ओढ घेतें.** "

वरील वाक्यांतील मुद्याचे शब्द आह्मीं मोठ्या टैपांत दिले आहेत व त्या त्या शब्दांचें भाषांतर कसें साधलें आहे हें पाहण्याचें आम्ही वाचकांवर सोंपवितों.

' 1001 Gems ' पुस्तकांतील ह्याच्या पुढचा मूळांतला उतारा अत्यंत हृदयंगम आहे अशी प्रसिद्धि आहे. त्यांतील थोडा मासला आपण पाहूं.

( 1 ) " It is twice blest; "

" दया करण्यांत दोहों **रीतींनीं** कल्याणच आहे. "

" दोहों **रीतींनीं** " का दोहोंपक्षीं ? म्हणजे दया करणारा व दयेचा विषय झाला असेल असे दोघे ?

( 2 ) " Tis mightiest in the mightiest. "

" दया ही **श्रेष्ठाहून श्रेष्ठ** आहे. "

या वाक्याच्या अर्थासंबंधानें Deighton साहेबांची टीप अशी आहेः–

" It shows itself in its noblest form in the hands of those who have the greatest power. "

Scott साहेब " mightiest " या शब्दांत " Kings and God " यांचा समावेश करतात. **श्रेष्ठांहून श्रेष्ठ** म्हणजे श्रेष्ठतम असा भाषांतरकारांच्या शब्दांचा अर्थ होतो, व ह्याच अर्थ खरा धरला तर सर्व इंग्रज भाष्यकार चुकले असें म्हणणें भाग आहे !

( 3 ) " It becomes the *throned monarch* better than his crown. "

" **शिरावर धारण केलेल्या** मुकुटापेक्षांही दयेच्या श्रेष्ठ भूषणानें **सार्वभौम** राजा फारच शोभतो. "

मुकुट **शिरावर धारण करितात** हें नव्यानेंच समजलें. पण तें असो. सार्वभौम हा शब्द कोठून आला ? " throned" याचा तर अर्थ तसा नसेल ना ?

(4) " His sceptre shows *the force of temporal power*
*The attribute to awe and majesty*
Wherein doth sit the dread and fear of kings."

" त्याचा राजदण्ड त्याची सत्ता **अपार** (?) आहे असें सुचवितो. तो पुष्कळ **लोकांना** व इतर **राजांना** भीति दाखविण्याचें एक साधन आहे. "

" अपार " शब्दाला मूळांत तर आधार दिसत नाहीं. तसेंच "इतर राजांना " ह्याचाही ध्वनि निष्पन्न होण्यासारखें मूळांत कांहीं नाहीं. कदाचित् of kings याचा अर्थ तसा केला असेल; पण dread and fear of kings या शब्दसमुच्चयांतील हा शब्द अपादानवाचक आहे, कीं कर्मवाचक आहे ? **राजापासून** भीति वाटते, कीं राजेच स्वतः भितात ? या वाक्यावर Deighton साहेबांची टीप मनन करण्यासारखी आहे. डेटन म्हणतातः—

"The attribute–Majesty,"–"the outward symbol of awe and majesty."

'Awe' properly of the subject; 'majesty' of the king, the cause of awe"

By hendiadys, both might be taken together, equivalent to *awful majesty,*

Wherein—Kings; in which (as a symbol of power) reside *the dread and fear which kings inspire.*

Scott साहेब म्हणतातः—

"*Attribute too*"—on which is based his right to be regarded with veneration as one awful and majestic.

"*Dread and fear.* These words which are virtually synonymous do not mean terror, but awe or high veneration. They are the feelings in man the subject, whereas awe and majesty denote the qualities with which the sovereign is invested, his unique supremacy and greatness."

याहून अधिक विवरण नको.

(5) It is enthoroned in the hearts of kings.

"दया ही राजे लोकांच्या **हृदयांतील सिंहासनावर** विराजमान झालेली असते."

**हृदयांतील सिंहासन म्हणजे काय?** हृदय हेंच तिचें आधिष्ठान अथवा सिंहासन, किंवा हृदयांत एखादें सिंहासन असतें?

आतां आणखी एक खुमारीदार मासला दाखवून या मुख्य पक्वान्नाचें गुणवर्णन पुरे करितों. '1001 Gems' पुस्तकांतील पुढच्या उताऱ्यांतील तीनच वाक्यें देतों.

(1) "I would *outnight* you."

मीं तुम्हांवर **सरशी केली असती.**

Scott साहेब म्हणतातः--

"Have the last world through the dialogue continued till morning.

"Would Outnight" हा कोण काळ ?

(2) How sweet the moonlight
Sleeps upon this bank"

"या समुद्राच्या कांठीं **शयन करणारी** ही कौमुदी कशी रमणीय दिसत आहे ?"

या वाक्यांत विधान कशाचें ? कौमुदीचें कां तिच्या शयनाचें ! Scott साहेब म्हणतातः--

"The metaphor of the moonlight sleeping on the lawn suggests richness of light and the perfection of repose."

(3) Wake Diana with a hymn.
With sweetest touches pierce
*Your* mistress' ear
And draw *her* home with music

"गगनांत स्वस्थ झोंपीं गेलेल्या त्या रजनीनाथ चंद्रम्याला **तुमच्या** मधुर मंजुळ आलापांनीं जागे करा व **त्यास त्याचे घरीं लावून द्या.**"

यापुढें टीकाकाराच्या कल्पनातरंगांवर तरंग कसे प्रगट होत गेले व तो कसा वाहवत गेला तें पहा:—

ह्या भाषांतरानें आमची पांचावर धारण बसली. हें भाषण गवयांना उद्देशून केलेलें आहे. hymn या शब्दापुढें : विरामचिन्ह आहे. Diana हा शब्द स्त्रीलिंगी आहे खरा, पण मधल्या विरामचिन्हानें

Diana शब्दाचा संबंध पुढील वाक्याशीं कसा येतो, हें आमच्या मंदबुद्धीस समजत नाहीं. तसेंच your ह्या शब्दानें त्या गवयांची धनीण, असें आमच्या अल्पबुद्धीस वाटतें: व पोर्शिया त्या रात्रीं घरीं येणार होती, तिच्या स्वागतार्थ गाणें सुरू केलें होतें. त्याचा संबंध चंद्राकडे लावून त्याला त्याचे घरीं पाठवून देण्याची क्लृप्ति खरोखर कडेलोटेचीच होय ! **गवयांची धनीण चन्द्र** व चांदोबाचें घर आभाळांत ! तो भटकत भटकत बेलमांट येथें येऊन समुद्रकिनाऱ्यावर झोंपीं गेला होता, त्यास जागा करून आभाळांत परत पाठविण्याची तजवीज **लारेंझो**नें केली हें सर्व ठीक आणि सुसंगतच झालें ! ! ! ' 1001 Gems ' पुस्तकांतील शेवटचा उतारा देऊन या सरस ( कां निरस ) पक्वान्नाची आपण रजा घेऊं.

> The man that with no music in himself,
> Nor is not moved *with concord of sweet sounds,*
> Is fit for *treason, stratagems and spoils:*
> The *motions* of his spirit are *dull as night,*
> And his *affections dark as Erebus:*
> Let no such men be trusted.

" ज्या मनुष्याला स्वत: कधीं गावेंसें वाटत नाहीं किंवा **उत्तम गायनानें** जो मोहित होत नाहीं, तो मनुष्य म्हणजे **फंदाफितुरी** किंवा **अशींच नीच कर्मैं करण्यास योग्य** आहे. त्याचे मनांत जे **विचार** चालतात ते नेहमीं **अंधकाराप्रमाणें** व त्याचे मनोविकार **कोळशाप्रमाणें काळे असतात.** अशा माणसाचा कोणीं कधींही **विश्वास करूं नये.** " ( भाषाशुद्धि, नंबर १. )

वरील वाक्यांतील मूळ इंग्रजी शब्द व त्यांचें भाषान्तर हीं दोन्ही ताडून पाहण्याचें आम्ही वाचकांवर सोंपवितों. " विश्वास करूं नये " या नवीन वाक्प्रचाराबद्दल सर्व महाराष्ट्र या अभिनवसाहित्याचार्याचें साभिमान कौतुक करीलच !

पुढील चुकी टीकाकारानें फारच सौम्यपणानें दर्शविली आहे, याबद्दल आम्हीं त्यांचे आभार मानले पाहिजेत.

एवढा वेळ आह्मीं सबंध वाक्याचे भाषांतराकडेसच नजर दिली. पण सर्व काम किती काळजीनें झालें आहे याचा मासला म्हणून एकच शब्द आतां वाचकांस सादर करितों. " Some men there are love not a *gaping* pig " असें एक वाक्य चौथ्या अंकाच्या पहिल्या प्रवेशांत आहे. याच भाषांतर करतांना भाषांतरकारांनीं gaping pig या शब्दांचा " डुकराचें तळलेलें मांस " असा अर्थ ठोकून दिला आहे. ( पृष्ठ १३४. ) या शब्दाचे संबंधानें Deighton म्हणतातः— "It has been doubted whether by this is meant a pig roasted for the table or the living, squealing pig, and the matter is not very important. " Scott म्हणतातः–"It is doubtful where the reference is to a living pig, or a roasted one on the dining table."

इंग्रज व्याख्यानकारांना शंका आली, पण आमचे भाषांतरकारांनीं बेलाशक " तळलेले मांस " असा अर्थ ठोकून दिला ! दोघेही इंग्रज टीकाकार वैकल्पिक पक्षांत roasted हा शब्द वापरतात, व हाच विकल्प मान्य केला तरी roasted शब्दाचा " तळणें " असा अर्थ आम्हांला कोणत्याही कोशांत सांपडला नाहीं ! दुर्दैव आमचें ! बरें, " तळलेला डुकर " असा अर्थ कबूल केला, तरी मेजावर आणल्यावर त्याचें तोंड आ वासल्यासारखें उघडें कां राहावें, ही शंका राहतेच ! पण, न जाणों, **अर्थरितात्पर्य** असेल ! पुनः एकवार शंका काढणाराचें दुर्दैव म्हणून स्वस्थ बसतों !

झालें ! या मेजवानीच्या बेतांतील मुख्य पक्वान्न जी जिलबी, तिची नळी कशी पडली आहे, तिच्यांत पाक कसा उतरला आहे, हें एवढा

वेळ दाखविलें. जिलबीनें आपलें पोट भरणार नाहीं असें वाटल्यावरून वरणभातावरच ताव मारावा म्हणून आह्मी प्रस्तावना व उपोद्घात यांकडे वळलों. तों भाताचे तांदूळ असडी, राताड, जाडा हत्तीभोग, एक एक दाणा गव्हाएवढा व त्याला कुजकट वास! व शिजविण्यांतही तीन प्रकार झालेले! कांहीं भात बुडीं लागलेला, मधला गिळगिळीत व वरचा तर अतिशय फडफडीत! वरणांतले डोळ तर अहमहमिकेनें डुळडुळ करीत होते, व तूप तर अष्टघाण! असा प्रकार पाहिल्याबरोबर शिसारी येऊन आह्मी पान जसेंच्या तसेंच ठेवून पानावरून उठलों. पण आमच्या नुसत्या वर्णनानें वाचकांची समजूत पडणार नाहीं म्हणून कांहीं भाताचीं शितें, वरणांतले डोळ व तुपाच्या दोन चार कण्या त्यांच्या सेवेस सादर करतों.

"मातृभाषा" ह्या शब्दावर लांबच लांब चऱ्हाट वळलें आहे. हें चऱ्हाट वळण्यापूर्वी mother आणि mother tongue हे दोन शब्द भाषान्तरकारांनीं कोशांत काढून पाहिले असते तर बरें होतें. Webster चे कोशांत mother हा शब्द विशेषण मानून त्याचा अर्थ received by birth or from ancestors असा दिला आहे, व त्याचें उदाहरण म्हणून mother language असा शब्द दिला आहे. तसेंच mother tongue हा सामासिक शब्द देऊन त्याचा अर्थ the language of one's native land असा दिला आहे. अर्थात् यांत मातेचा कांहींच संबंध नाहीं, व mother म्हणजे native इतकाच अर्थ राहिला. तेव्हां 'मातेची भाषा' असा षष्ठीतत्पुरुष समास कल्पून त्यावर जें तर्कट रचिलें आहे, तें केवळ अस्थानीं आहे. ह्या वितंडवादांत शिरण्याची आमची मुळींच इच्छा नव्हती, पण "मातृभाषा" शब्दाची टवाळी करण्यांत भाषांतरकारांनीं आपल्या बहुश्रुतपणाचें--आपल्या व्याकरणन्यायालङ्कारादि शास्त्रनैपुण्याचें--जें प्रदर्शन केलें आहे, त्याचा स्फोट केल्याशिवाय भाबड्या

गिऱ्हाइकाचे डोळ्यांत धूळ टाकण्याचें त्यांचें कसब उघडकीस येणार नाहीं, म्हणून त्यांच्या प्रत्येक कोटीस उत्तर देणें भाग आहे.

" मातृभाषा " म्हणजे " आईची भाषा " असा मूळच्या इंग्रजी शब्दाचा अर्थच नाहीं, हें आह्मीं वर दाखविलेंच आहे, म्हणून आईची भाषा एक व बापाची भाषा दुसरी अशी कल्पना करून ( १ ) तसे विवाह हिंदुस्थानांत होत नाहींत व झाले तर जी मजा उडते तिचें प्रत्यन्तर म्हणून पोर्शियाचे भाषणाचा जो निर्देश केला आहे तो, ( २ ) हीं दोन्ही ग्रंथकाराच्या बाष्कळपणाचीं उदाहरणें आहेत. अशा तऱ्हेच्या भिन्न देशांतील स्त्रीपुरुषांचे विवाह आपल्याही देशांत होत आहेत व पुढेंही होतील. परंतु अशा संबंधापासून उत्पन्न झालेल्या मुलांची जन्मभाषा आईचीच किंवा बापाचीच एवढ्याची न राहतां, हें कुटुंब ज्या राष्ट्राचें अवयव आपल्यास मानीत असेल व जी भाषा आईबाप आपल्या घरांत बोलत असतील तीच होईल. इंग्लंडासारख्या देशांत असे मिश्र विवाह पुष्कळ होतात, परंतु तीं कुटुंबें इंग्रजी भाषाच बोलतात, व आई जरी फ्रेंच, स्पॅनिश, जर्मन किंवा रशियन असली, तरी तिच्या जन्मभाषेचा प्रश्न मुळींच उपस्थित न होतां, ज्या राष्ट्रांत त्या कुटुंबाचा समावेश होत असेल, त्या राष्ट्राची भाषा त्या कुटुंबांतील मुलांची " जन्मभाषा " होते. ग्रंथकार मोठ्या तोऱ्यानें " जन्मभाषा " हा शुद्ध शब्द म्हणून सुचवितात; परंतु त्या शब्दानेंही कार्यभाग होत नाहीं. पुष्कळ इंग्रज आईबापांचीं मुलें हिंदुस्थानांत जन्मलीं आहेत, पण त्यांची स्वभाषा मराठी, गुजराथी वगैरे होत नाहीं. सारांश, भाषेच्या अभिवृद्धींत, म्हणजे नवीन रचनेंत संकेत, लक्षणा इत्यादि प्रकार असतात. ते असेच कां असावे, हा केवळ वितंडवाद आहे. " अमुक मनुष्य आमच्या घरा**वरून** गेला," म्हणजे तो विमानात बसून कौलांवरून उडून गेला असा अर्थ होत नाहीं. अमुक मनुष्य "स्टेशना**वर**" भेटला, म्हणजे बोलणाराची व त्या मनुष्याची स्टेशनाच्या पत्र्यावर

गांठ पडली असें होत नाहीं. " देवानां प्रियः " म्हणजे " देवांचा लाडका " असा अर्थ न होतां " मूर्ख " असा अर्थ होतो. " मातृ-शासित " म्हणजे " मूर्ख " असा अर्थ होतो. याला कारण एकच, व तें " प्रयोगशरणा वैयाकरणाः " या सूत्रांत आमच्या प्राचीन आचार्योंनीं संमत केलेलें आहे. धत्वर्थापासून भिन्नदर्शक शब्द सर्व भाषांत आहेत; आणि मातृभाषा, मातृभूमि असे शब्द जर रूढ झाले आहेत तर त्या शब्दांस नांवें ठेवणें व त्या शब्दांचा उपयोग करणारावर निष्कारण " घसरावें " हें मनाचा हलकेपणा मात्र दाखवितें.

"मातृभाषा" म्हणणारांनीं " भाषामाता" असें तरी म्हणावें, असें हे भाषापंडित म्हणतात; कारण मराठींत "कालीमाता", "मरीआई" असें म्हणण्याचा प्रघात आहे; पण " माता भवानी ", "राजा दशरथ", " राणी शिप्री " असें म्हणण्याचाही परिपाठ आहे. एवढेंच नाहीं, तर " राणी शिप्रीची मशीद " असेही शब्द कानावर येतात. आमच्या अभिनव आचार्यांचे मताप्रमाणें " शिप्री राणीची मशीद " असा प्रयोग व्हावा, पण भाषा बोलणारे जशी ते बोलतील किंवा त्या भाषेंत ग्रंथ-रचना करणारे तिचे जसे प्रयोग करतील तशी ती होईल. वैयाकरणांस, नैयायिकांस, किंवा साहित्याचार्यांस ती मुळींच पुसत नाहीं व त्यांनीं कितीही आक्रोश केला तरी तें त्यांचें रडणें अरण्यरुदनच होईल.

" मातृभाषा " शब्दाची टर उडविण्याचे भरांत या आचार्योंनीं Mother-Country या शब्दाचा उद्धार केला आहे, पण जर्मन भाषेच्या संप्रदायांत स्वदेशाला Father-land असें म्हणतात, त्याची गति काय लावावयाची ? ग्रंथकारांनीं जातां जातां आपल्या साहित्य-शास्त्रप्रावीण्याचें अर्थात् आपल्या "बहुश्रुतपणाचें" ही प्रदर्शन केलें आहे. " मातृभाषा " हा शब्द सदोष आहे असें जरी क्षणभर मानलें, तरी यांत विरुद्धार्थ कसा उत्पन्न होतो, हें आमच्या मठ्ठ डोक्यांत शिरत नाहीं. " भवानीपति" या शब्दांत विरुद्धार्थाची प्रतीति होण्याचा संभव

आहे, तथापि " भवानी " शब्दानें " दुर्गा " असा अर्थ घेऊन, या येऊं पहाणाऱ्या दोषाचें निराकरण या श्लोकाचे टींकेंतच काव्यप्रकाशाच्या नवीन आवृत्तींत केलें आहे. तिकडे ग्रंथकारांनीं लक्ष द्यावयास पाहिजे होतें; पण इतकें कोण करतो ? एका चार ओळींच्या टीपेंत आपलें साहित्यनैपुण्य प्रदर्शित होऊन भवभूतीसारख्या नामांकित कवीच्या कृतीचें दोषोद्धाटन झालें तर आपली योग्यता त्याहूनही थोर आहे असें लोकांस वाटेल, हा त्यांस मोह पडला ! बरें ! मोह पडला तर पडो ! परंतु या अलंकारदोषाचें नांव तरी बरोबर उतरून घ्यावयास पाहिजे होतें. काव्यप्रकाशांत या दोषाचें नांव " **विरुद्धमतिकृत्** " असें दिलें आहे. आमचे पण्डित " **विरुद्धार्थप्रतिकृत** " असें नांव देतात ! ! ! " घड्याळाच्या हाताची " कोटी नुसती बाष्कळ आहे ! " रुद्राक्षाविषयीं " संवाद तसाच केवळ विदूषकी आहे.

नंतर सहानुभूति शब्दावरील त्यांचें विवेचन पहाण्यासारखें आहे. तें असें:—

" सहानुभूति " हा शब्द आज पाव शतक तरी रूढ झाला आहे. "सहकारी ", " सहचर ", " सहज ", "सहधर्मिणी, " "सहपान", " सहभोजन ", " सहमरण " असे अनेक शब्द रूढ झाले आहेत व होत आहेत; असें असतां सहानुभूति शब्दासच आक्षेप कां घ्यावा, हें आह्मांस समजत नाहीं. त्यांतून हा शब्द जर रूढ होऊन जर इतकीं वर्षें झालीं आहेत, तर पुनः " प्रयोगशरणा वैयाकरणाः " ह्या न्यायाचाच आश्रय करणें योग्य आहे.

याप्रमाणें नाक मुरडीत व तोंड वेडेंवांकडें करीत प्रस्तावनेंतून जों सुटलों, तों ५० पृष्ठांचा उपोद्घाताचा ढीग दृष्टीस पडला. एवढा ढीग आणखी जर पोटांत रिचविला तर मग आपली धडगत लागणार नाहीं, अशी भीति वाटूं लागली. पण आमंत्रण अगत्याचें पडलें व आग्रहही फार, ह्मणून नाकाओंठावर चार घांस कसे तरी घेण्याची छाती केली !

ह्या उपोद्धातांत ( १ ) ह्या नाटकाच्या रचनेचा काल, ( २ ) ह्या नाटककथानकाचे आधार, व ( ३ ) ह्या नाटकाची लोकप्रियता असे विषय क्रमानें सादर केले आहेत. ही अनुक्रमणिका पाहिली तेव्हां हें नाटक युनिव्हर्सिटीच्या M. A. परीक्षेकरितां नेमलें असावें असें वाटलें. पण मराठी भाषान्तर नेमल्याचा कोठें उल्लेख सांपडला नाहीं. मग हे परिश्रम भाषांतरकारांनीं कां केलें बरें ? आपलें पुस्तक सर्वांग परिपूर्ण करण्याकरितां ? मग ह्या पुस्तकाचे शेवटीं प्रस्तावनेवर, उपोद्धातावर प्रश्न काढून दिले असते तर फार बहार झाली असती ! ह्या इतका खटाटोप करण्यापूर्वी या कार्याचे काठिन्याविषयीं थोडा तरी विचार करावयास पाहिजे होता. शेक्स्पिअर कवीच्या निधानाची सांवत्सरिक तिथि खातर्फे येथें पाळण्यांत येते. यंदां हा वार्षिकोत्सव जेव्हां साजरा करण्यांत आला तेव्हां देशोदेशींचे प्रतिनिधि हजर होते, व त्यांपैकीं कित्येकांचीं त्या प्रसंगीं भाषणेंही झालीं. त्यांत पोर्तुगाल देशांतील वकील ना. मोमेझ् यांचें भाषण मनन करण्यासारखें आहे त्यांतील ५।६ ओळी पुढें देतोंः—

"Referring to the controversies on Shakespeare's early days and his education, Signor Gomez confessed to a difficulty—a difficulty which he said was *not to be approached by the foreigner* when it was so little understood by Englishmen themselves. The luxury of the language in which Shakespeare indulged made it difficult for the average foreigner to appreciate to the full his wonderful imagery and *character studies.*"

इंग्लंडांत पुष्कळ वर्षे राहिलेल्या, इंग्रजी भाषेचें आह्मांहून तरी अधिक ज्ञान असणाऱ्या ना. मोमेझसारख्या गृहस्थाला शेक्स्पिअरच्या कृतीचें हृद्य समजण्याला अवघड जातें. शेक्स्पिअरची बाल्यावस्था, त्याचें शिक्षण व विशेषतः त्याच्या नाटकांतील संविधानकें त्यांना गूढ

वाटतात. पण आमच्या ग्रन्थकारांनीं या सर्व गोष्टींचा छडा लाविला आहे ! असो.

या अनावश्यक व अनिश्चयात्मक वादविवादांत १६ पृष्ठें भरून काढल्यावर आमचे ग्रन्थकार संविधानकाच्या पर्यालोचनांस आरंभ करितात. या पर्यालोचनांत पहिल्या प्रथम ते आपल्या बहुश्रुतपणाचा फायदा वाचकांस अनायासें करून देतात. हा बहुश्रुतपणा अस्थानीं आहे, असें वाचकांस वाटलें तर खुशाल वाटो !

अन्तोनियो रंगभूमीवर प्रवेश करतो तेव्हांच त्याचे तोंडांतून उदासीनतेचे शब्द निघतात. दुष्यन्त ५ व्या अंकांत प्रवेश करतो तेव्हां तोही उदासच ! केवढें साम्य ! आतां येथें शाकुन्तलांतील " रम्याणिवीक्ष्य " इत्यादि श्लोकाचा उद्धार करूं नये तर काय करावें ? पण कालिदासानें औदासीन्याचें कारण दुष्यन्ताकडूनच वदविलें आहे. दुष्यन्ताला "जनान्तर " संमत होतें, तसें तें अन्तोनियोला होतें का ? अन्तोनियो उदासीनतेचें कारण सांगत नाहीं. असें जर आहे तर साम्य चित्तवृत्तीचेंच उरलें, मग येथें श्लोकाचें स्वारस्य काय ?

मोरोक्कोच्या शिद्दी राजपुत्राचें व " शितिकंठधनु " उचलूं पाहणाऱ्या दशकण्ठाचें साम्य फारच मनोहर ! व त्यांतले त्यांत "मदनशत्रशरासन हें महा " ह्या वामनाच्या श्लोकाचा उद्धार तर काळजाचा गड्डा भेदून जातो ! ! ! क्या बात !

" भवानीपति " या शब्दावर चर्चा करितांना भवभूतीची बोहनी प्रस्तावनेंत झालीच आहे. मृच्छकटिकाचा कर्ता शूद्रक याची संभावना करावयाची राहिली, ती पहा. ' शूद्रक ' आणि शेक्स्पिअर या दोन्हा शब्दांचें आद्याक्षर श ! अहो साम्यम् ! ! ! चारुदत्त व वसन्तसेना यांच्या........( पुढील शब्द आमच्यानें लिहवत नाहीं ) शीं राज्यक्रांतीच्या हकीकतीचा अर्थाअर्थी कांहींएक संबंध वसत नाहीं. इतकेंच केवळ नाहीं तर एका हकीकतीनें दुसऱ्या हकीकतींतील कथेचा परिपोष

व्हावा हें इष्ट असतांही तो मृच्छकटिकांतल्या कथाभागांत झाल्याचें दि-सत नाहीं–' असें भाषान्तरकार म्हणतात. परलो॰ का॰ पां॰ परब ह्यासंबंधानें आपल्या प्रस्तावनेंत लिहितातः—

" The deposition of Palaka is interwoven with the main story so intimately that it could not be detached from it without injury, and yet it never becomes so prominent as to divert attention from that to which it is only an appendage."

अभिप्रायांत खरा आणि ग्राह्य कोणता आहे हें वाचकांनीं ठरवावें. असो. दोन कथा गुंफण्याच्या कहाणींतच त्रिवेणीसंगमाची आठवण ग्रन्थकारास झाली व मग " त्या त्रिजगन्नट श्रीकृष्णाचें " स्मरण हो-तांच " हरिकरिं यमुना हो मूद गंगावनाची " ह्या भामाविलासांतील श्लोकाचें स्फुरण झालें व देहभान इतकें नष्ट झालें कीं, प्रयागास सरस्वती नदी गुप्त आहे कीं वाहते आहे याचेंसुद्धां त्यांस भान राहिलें नाहीं ! ! ! प्रयागाचें वर्णन तरी वाचावयाचें होतें ! पण तें कोण करतो ? अहो धाष्टर्यम् !

अंटोनियो बासेनियोचा जिवलग मित्र ! आणखी काय पाहिजे ? ' पापान्निवारयति-' हा श्लोक द्या ठोकून ! असो.

आम्हांला अशी आशा वाटत होती कीं, आपण उपोद्घाताच्या भोंवऱ्यांतून सुटलों म्हणजे बहुश्रुतपणाच्या प्रवाहांत गटंगळ्या खाव्या लागणार नाहींत. पण आमचें नशीब एवढें थोर कोठें आहे ! तिन्ही करण्डकांतून निश्चित केलेला करण्डक भलतासलता कोणी निवडून काढणार नाहीं असें नेरिसानें म्हटल्याबरोबर " असंशयं क्षत्रपरिग्रहक्षमा " हा सबंध श्लोक व परलो॰ परशुरामपंतांचें त्या श्लोकाचें भाषान्तरही आलेंच ! How much more elder art thou than thy looks असे शब्द शायलॉकाचे तोंडून निघतांच " ऐकोनि चातुर्याची

गोष्टी " ही मुक्तेश्वराची ओंवी आलीच ! " The man that hath no music in himself " असे शब्द लॉरेंझोचे तोंडांतून येनांच ' साहित्य संगीतकलाविहीनः ' हा सबंध श्लोक आलाच ! मूळ इंग्रजींत गाण्याचा महिमा वर्णन करण्यांत दहापांच ओळी कवीनें लिहिल्या आहेत. उद्धृत केलेल्या संस्कृत श्लोकांत फक्त " संगीत " शब्द आला आहे. पण शब्द तरी आहेना ? बिचाऱ्या भर्तृहरीच्या या श्लोकांत केवळ **संगीत** हा शब्दच सांपडला, त्यावरून " साहित्यसंगीतादिकांचें महत्व जसें येथें ( म्हणजे लॉरेंझोचे भाषणांत ) वर्णिलें ( ? ) आहे तसेंच **सरासरीनें** भर्तृहरीनेंही वर्णिलें आहे. " लॉरेंझोचे भाषणांत **साहित्याचा** गन्धही नाहीं व भर्तृहरीचे श्लोकांत **संगीताचा** रस वर्णिला नाहीं. असें असतां साहित्यसंगीत शब्दाचा मुद्दाम उच्चार करून भर्तृहरीवर **सरासरीचा** छाप दिला ठोकून ! आपण संगीताचें महत्व चांगलें वर्णन केलें नाहीं तर विसाव्या शतकांत आपली **सरासरींत** गणना होईल, असें स्वप्न बिचाऱ्या भर्तृहरीस पडतें, तर त्यानें तसा प्रयत्न करून पाहिला असता !

असो. पण एवढ्यानेंच संगीताची सुटका झाली नाहीं. " सुभाषितेन गीतेन ! " हा श्लोक आहेना ? आणि तोही समग्र दिला नाहीं तर आपला बहुश्रुतपणा कसा दिसेल ? पृष्ठसंख्या तरी कशी वाढेल ? उपोद्घाताच्यापुढें ३२ पृष्ठांचें संविधानक, त्यांत पुढील नाटकाचा गोषवारा व जागोजाग अवतरणें; हीं अपचनाचे भयानें आह्मीं टाकून दिलीं. १०९ पृष्ठांचा पूर्वरंग, व १८८ पृष्ठांचें आख्यान ! ! !

आमच्या ह्या लांबलचक पर्यालोचनाचा आमच्या वाचकांस आतां कंटाळा आला असेल. म्हणून नाट्यमालेच्या ह्या खण्डाविषयीं, तिच्या

कर्त्यांच्याच शब्दांनीं आम्ही आपला अभिप्राय व्यक्त करितों. "ह्या ग्रंथांत बहुधा अर्थाची उणीव; मुद्देसूद विचारांची उणीव व सामान्यतः रसिकत्वाची उणीव अशी सर्वच प्रकारें उणीव आहे." (पृष्ठ ३३, प्रस्तावना.) विशेष एवढाच आहे कीं, भाषान्तर करण्याची पात्रता लेशमात्र नसून दर्प मात्र मोठा आहे. "अशक्त आणि दुर्जन" असा कांहीं प्रकार यांत झाला आहे. आपण मोठे व्यासंगी, आपण पहिल्या प्रतीचे लेखक, अशी घमेंडी मात्र प्रत्यक्ष पृष्ठावर दिसत आहे; व ही सर्वस्वीं अक्षम्य आहे. महाराष्ट्रवाङ्मयाची अनेक ग्रन्थकार मनोभावें यथाशक्ति सेवा करीत आहेत, त्यांत त्यांच हातून प्रमाद होत असतील. अपशब्दांचे प्रयोगही होत असतील; नाहीं असें नाहीं. पण ते दाखविणेंच असतील तर त्याला स्थळ निराळें, प्रसंगही निराळा पहावयाचा होता. बरें, हे आपले व्यवसायबन्धु आहेत,—यांत कोणी आपल्याहून वडील असतील, कोणी धाकटे असतील, त्यांच्याविषयीं लिहितांना कांहीं तरी आदर, कांहीं तरी प्रेम दाखविणें अवश्य आहे. "मुखमस्तीति वक्तव्यम्" तशी हातांत लेखणी असली म्हणून पाहिजे त्यावर तुटून पडावें. ज्या विषयांत आपला प्रवेशसुद्धां नाहीं त्यावर मनास मानतील तशीं मतें ठोकून द्यावीं, हें वाङ्मयाचे राज्यांत महा-पाप आहे. अखिल मानवजातीचें कल्याण हाच वाङ्मयाचा हेतु आहे. ह्मणून ग्रंथकर्त्यांनीं जनतेस विनयाचें—शालीनतेचें उदाहरण घालून देणें अवश्य आहे. प्रस्तावनेंत जे निर्गल प्रलाप केले आहेत ते जर केले नसते तर, आह्मींही या मासिकाची इतकी जागा अडवून आमच्या वाचकांस इतका शीण दिला नसता; पण लोकांवर तोंड टाकण्याचा दुर्गुण सांथीच्या रोगासारखा असतो. त्याचें वेळेवर निर्मूलन करण्याचा प्रयत्न

केला पाहिजे; नाहीं तर तो फैलावण्याची भीति असते. सर्वांनाच वाङ्-मयाचा व्यासंग ठेवण्यास अनुकूलता नसते. बाजारांत विकावयास आलेल्या मालांत चोख माल कोणता व कोणत्या मालांत भेसळ आहे हें पहाणें जसें अवश्यक आहे, तसेंच वाङ्मयाच्या व्यवहारांतही. तसें न केलें तर भाबडीं गिऱ्हाइकें फसण्याचा संभव असतो. म्हणून शेक्स्पियरच्या प्रति-कृतीच्या ह्या पोत्यांत माल कसा आहे, हें उघडून दाखविणें आम्हास भाग पडलें. हें काम करण्यांत आम्हांस फार दिलगिरी वाटली, परंतु ह्या पुस्तकां-तील दोष दाखविणें हें आमचें कर्तव्यकर्म म्हणूनच तें आम्हीं केलें आहे.

" **शेक्स्पियरचा चाहता.** "

**जादा कलम.**—आमचा हा लेख लिहून झाल्यावर या मालेचा आणखी एक खण्ड प्रसिद्ध झाला आहे असें समजतें ! ! ! " काव्य करावें म्यां नच वचकावें " अशी एक मोरोपंतांची आर्या प्रसिद्ध आहे. नाट्यमालेंतील भाषांतर करणारांस आम्ही पुढील आर्या विनयानें नजर करतोंः—

ग्रंथ लिहावे म्यां, नच वचकावें, येउ मार्मिकां वीट ।
कां न सदन बांधावें ? जरि न टिके एकही दगड, वीट ॥ १ ॥

ही त्यांस पसंत नसल्यास दुसरी त्यांच्या सेवेस हजर आहेः—

ग्रंथ लिहावे म्यां नच ! लेशहि न ज्ञान, तेंवि न रसिकता ।
कां न सदन बांधावें ? लागे पायांत जल, तशी सिकता ॥ २ ॥

शान्तिः ! शान्तिः ! ! शान्तिः ! ! !

वरील टीकेस उत्तरादाखल प्रतिटीका आमच्या एका मित्रानें लिहून आह्मांकडे पाठविली आहे. ती जशी मुद्दे-

सूद तरी खरमरीत आहे; परंतु ही आमच्या मित्राची प्रतिटीका येथें देत नाहीं. सध्यां विविधज्ञानविस्तारांतील टीकाकारानें रा. रा. बेलसरे यांस ग्रंथकर्तृत्वकौशल्य मुळींच नसून त्यांनीं इतःपर ग्रंथ लिहूं नयेत असा जो अभिप्राय शेवटीं दर्शविला आहे त्यांत कितपत सत्यता आहे याची साक्ष पुढील दोन अभिप्रायांवरून वाचकांस पटेल. हे अभिप्राय ज्यांनीं दिले आहेत ते तरी सामान्य गृहस्थ नसून सदर टीकाकाराला गुरुस्थानीं शोभतील किंबहुना त्यांचे गुरुही असतील. तेव्हां जास्त पाल्हाळ न लावितां सदर दोन अभिप्रायच येथें सादर करतों.

ऑन० डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचा अभिप्रायः—

It ( Mr. Belsare's translation ) reads very well indeed as a Marathi production. There is nothing uncouth or unidiomatic about it. The Marathi is racy. The sense of the original is well brought. I read a portion of his Romeo and JULIET also.................. Altogether, Mr. Belsare seems to me to be best qualified for the

work he has undertaken; and ........ as to the correct sense of the original, there is no reason why his translations should not be unexceptionlly good.

रे॰ डॉक्टर मॅकिकन, वुइल्सन कॉलेजाचे प्रिन्सिपाल, व युनिव्हार्सिटीचे व्हॉइस चान्सेलर यांचा अभिप्रायः—

"DEAR MR. BELSARE...I have gone over portions of your translation of the Tempest—the first instalment of your Shakespeare Series. It is difficult to reproduce Shakespeare in Marathi, but I think that you have been very successful in your rendering of the language and the spirit of the piece. In some places, I find the translation free rather than exact; but I can understand how a translator may, in certain cases, prefer such a free and expanded rendering. The illustrative notes, taken from Sanskrit and Marathi are a very interesting feature in present effort. Your Marathi style shows, in many places, both vigour and elegances."

याशिवाय आणखी अभिप्रायः—

माजी नाट्यकथार्णवाचे कर्ते कै. **शंकर मोरो रानडे** यांनीं एका पत्रांत म्हटलें आहे, " तुफान पुस्तकाच्या लेखनांत भाषेचा सरळपणा व स्पष्टपणा हे गुण विशेषतः वाखाणण्याजोगे आहेत. "

**काळ** २ ऑक्टोबर १९०६:—" भाषांतर करण्याची जी धर्ती अवलंबिली आहे, ती शेक्स्पिअर काय आहे हें मराठी वाचकांना समजावून देण्याचा जो हेतु त्या दृष्टीनें पाहतां कांहीं वावगी नाहीं. "

वर दिलेल्या अभिप्रायांचा अर्थ सर्वांना कळण्यासारखा आहे; तेव्हां त्यासंबंधानें अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

**इति शं.**

# मधुयामिनी स्वप्नदर्शन

## नाटकाचें संविधानक.



सुप्रसिद्ध अथेन्स नगरामध्यें एके काळीं एक चमत्कारीक कायदा चालू होता. त्या कायद्या अन्वयें तेथील लोकांस वाटेल त्या पुरुषाशीं आपल्या मुलीचें लग्न लावून देण्याचा हक्क असे, इतकेंच केवळ नव्हे, तर बापानें जी वरयोजना केली असेल ती जर मुलीला पसंत नसली व योजिलेल्या वराशीं लग्न करण्यास ती कबूल नसली तर कायद्या अन्वयें मुलीला सुळावर देवविण्याचा अधिकार बापास असे. आतां हें खरें कीं आपल्या मुलीला मरण यावें असें कोणत्याही बापाला क्वचितच वाटेल. तथापि कित्येक हट्टी मुली आपलाच हेका धरून बसत व बाप योजना करील त्या वराशीं लग्न करण्याचें नाकारीत. त्यावेळीं वडिल माणसें ह्या कायद्याचें त्यांस भय घालीत. असें होतें तरी, हा कायदा कोणी कधींही अमलांत आणला नाहीं.

तथापि असें एक उदाहरण एकेकाळीं घडून आलें; नाहीं असें नाहीं. इजीयस नांवाचा कोणी एक वृद्ध गृहस्थ त्या नगरांत राहात असे व त्याला हर्मिया नांवाची एक तरुण मुलगी होती. तिचें लग्न याच नगरांतील एक कुलीन व श्रीमान् गृहस्थ डिमेट्रियस यांशीं करून देण्याचें त्यानें मनांत आणलें होतें. आतां हर्मिया हिला डिमेट्रियस एवढा आवडत नसून तिचें प्रेम त्याच शहरांतील लायसॅन्डर नांवाच्या एका तरुणावर बसलें होतें. शिवाय तिची मैत्रीण हेलेना नांवाची एक तरुण कुमारी होती. तिचें प्रेम डिमेट्रियस याजवर इतकें कांहीं बसलें होतें कीं त्याचेसाठीं ती वेडी होऊन गेली होती असें म्हणावयास चिंता नाहीं. अशी स्थिती असल्यामुळें हर्मियेनें बापाच्या इच्छेप्रमाणें डिमेट्रियस यांशीं लग्न करण्याचें नाकारलें. यामुळें इजियस याला मुलीचा मोठा संताप येऊन तो, अथेन्स नगरचा त्या वेळचा राजा थिसियस याजकडे फिर्याद गेला. तो म्हणाला—" महाराज ! काय सांगावें ? मी तर अगदीं त्रासून गेलों आहें. आणखी माझी मुलगी हर्मिया हिजविषयीं मी आपणाकडे फिर्याद आणिली आहे. न्याय करा, आणि शहरच्या कायद्याअन्वयें माझ्या मुलीला जी शिक्षा करणें योग्य असेल ती तिला भोगूं द्या."

यावर हर्मियेनें आपणास जें काय सांगणें होतें तें सर्व सांगितलें, व बापाची आज्ञा आपण कां मोडतों याचाही खुलासा केला. त्यांत, हर्मियेची मैत्रीण हेलेना हिचें डिमेट्रियसवर अतिशय प्रेम होतें व

त्याचेंही तिजवर कमी नव्हतें हें कारण मुख्य होतें. परंतु त्या खाष्ट म्हातान्या इजियसपुढें तिचें सर्व बोलणें फुकट गेलें व त्याच्या मनाला तिळभरही द्रव आला नाहीं.

आतां थीसियस हा जरी मोठा बलाढ्य व दयाळु राजा होता तरी आपल्या राज्यांतील कायदा मोडण्याचें सामर्थ्य त्याच्या आंगीं नव्हतें. तेव्हां त्यानें असें ठरविलें कीं हर्मियेला आह्मीं चार दिवसांची मुदत देतों; तेवढ्या अवधींत तिनें आपला काय तो निश्चय करावा; ह्मणजे चवथे दिवशीं देखील जर तिचा विचार फिरला नाहीं,व डिमेट्रियस याशीं विवाह करण्याचें तिनें नाकारलें तर तिला कायद्याअन्वयें सुळावर देण्यांत यावें.

हर्मिया दरबारांतून निघून गेल्यावर लागलीच आपल्या प्रियक राला जाऊन भेटली, आणि आपणावर आज कोणतें संकट ओढवलें आहे, ती हकिगत करुणस्वरानें त्याला सांगितली. तात्पर्य, आपण लायझॅन्डर याला सोडलें पाहिजे एक, अथवा चवथे दिवशीं देहान्त शिक्षा भोगण्याला तयार झालें पाहिजे एक, या व्यतिरिक्त तिसरी गोष्ट नाहीं; असा घोर प्रसंग तिला प्राप्त झाला.

ही हकिगत ऐकून लायझॅन्डर याला पराकाष्टेचें दुःख झालें; पुढें विचार करतां करतां त्याला असें सुचलें कीं आपली एक मावशी अथेन्स नगरापासून कांहीं अंतरावर एके गावीं राहाते, व तेथें ह्या दुष्ट कायद्याचा अंमल चालत नाहीं. कारण हा कायदा त्या नगरापुरता मात्र असून त्याच्याबाहेर तो चालत नव्हता.

यास्तव तो हर्मियेला ह्मणाला—"प्रिये, आज रात्रीच्या वेळीं आपल्या बापाच्या घरांतून निघून येशील तर आपण त्या माझ्या मावशीच्या घरीं जाऊं, आणि आपला यथाविधी विवाह करून घेऊं. "तो आणखी असेंही ह्मणाला कीं तुला यायचें कोठें, तें ठिकाणही तुला ठाककच आहे. शहराबाहेर एक कोसभर गेलीस, ह्मणजे तुला दाट अरण्य लागेल; त्यांत मागें एकदां मधुमासांत एके दिवशीं सकाळींच मी कांहीं साधन करण्याकरितां ह्मणून गेलों असतां, त्या ठिकाणीं तुझी व हेलेनेची गांठ पडली होती तेंच हें ठिकाण. तेथें मी तुझी वाट पाहातों.

ही गोष्ट हर्मियेला पसंत पडली, व तिनें येण्याचें मोठ्या आनंदानें कबूल केलें. मग तिनें हा आपला बेत आपली प्रिय मैत्रिण हेलेना हिला कळविला; हिजवांचून इतर कोणालाही कळविला नाहीं पण ह्मण आहेना—अल्पवयस्क व असमंजस स्त्रिया प्रेमासाठीं काय वाटेल तो मूर्खपणा करतील.यास अनुसरून हेलेनाही डिमेट्रियस याजकडे गेली व तिनें त्याला हर्मियेच्या पलायनाची गोष्ट कळविली. यांत तिचा हेतू एवढाच होता कीं आपला प्रियकर हर्मियेच्या शोधासाठीं तिच्या मागून अरण्यांत गेला ह्मणजे आपणासही त्याचे मागोमाग जातां येईल, व त्याच्या समागमाचा लाभ अनायासें करून घेतां येईल. या वांचून तिला कोणता फायदा होता ? अर्थात कांहींच फायदा होण्यासारखा नव्हता. आतां हर्मिया व लायसॅन्डर यांनीं वकूत येऊन ज्या ठिकाणीं एकमेकांस भेटण्याचें ठरविलें होतें त्याच

अरण्यांत पिशाच्चाचें संचार करण्याचें आवडतें ठिकाण होतें. ऑबेरान हा त्या पिशाच्चांचा राजा होता व टिटॅनिया ही त्यांची राणी होती. हीं राजा राणी उभयतां अनेक वेळां मध्यरात्रीच समयीं येऊन, नाना प्रकारच्या क्रीडा येथें करीत असत, व त्यांजबरोबरच त्यांचे ते चिमुकले पिशाच्चरूप अनुचरही असत, व ते अनेक प्रकारच्या मौजा करीत. यावेळीं अशी तऱ्हा झाली होती कीं, भुतांचा तो राजा व ती राणी यांजमध्यें वांकडें आलें होतें, व त्यामुळें तीं उभयतां कांहींशीं रंजीस झालेलीं होतीं. यामुळें जेव्हां जेव्हां ती या निबिड छायेच्या अरण्यांत स्वछ शुभ्र चांदणे पडले असतांना फिरावयास येत, तेव्हां तेव्हां बहुधा त्यांचें भांडण जुंपत असे. असें झालें ह्मणजे त्यांच्या त्या बिचाऱ्या छोटेखानी अनुचरांस अत्यंत भय वाटे; व ते झाडावरच्या फुलांत त्यांच्या नलिकांत जाऊन बसत. या भांडणाचें कारण मिळून एवढेंच होतें कीं टिटॅनिया राणीपाशीं एक लहान सुंदरसा मुलगा होता. तो दृष्टीस पडल्या वेळेपासून, ऑबेरान राजा तिजपाशीं तो मला दे ह्मणून मागत होता. परंतु त्याची आई टिटॅनिया राणीच्या पंथाची असून तिची मैत्रिण व उपासकही होती. हा मुलगा उपजल्यावर लवकरच ती मरण पावली. मरतेवेळीं तिच्या लोभास्तव हा मुलगा राणीनें चोरून आणून ह्या जंगलांत ठेवला होता, व तेथें त्याचा प्रतिपाळ केला होता. आतां ज्या रात्रीं हर्मिया व हेलेना, आणि त्यांचे प्रियकर लायसॅन्डर व डिमेट्रियस, यांच्या गांठी या जंगलांत पडावयाच्या होत्या, त्याच रात्रीं पिशाच्चांचा राजा ऑबेरान याची स्वारी तेथें आली; व तो आला नाहीं तोंच टिटॅनिया

राणीही आपल्या परींच्या परीवारासह तेथें येऊन धडकली तिला पाहातांच आवेरान ह्मणतो,–"अग टिटॅनिये तूं कितीतरी गर्विष्ठ आहेस! अशा चांदण्यारात्रीं तुझी गांठ पडली हें कांहीं बरें झालें नाहीं." यावर राणी उत्तर करते–'आपण तरी कमी मत्सरी आहां कीं काय? काय ह्मटलें आपण?-पऱ्यांनों, चलाग बायांनों, आपणच येथून निघून जाऊं कशा! यांच्या सहवासाला रहायचें नाहीं, किंवा त्यांच्याशीं कोणताही संबंध ठेवायचा नाहीं. अशी शपथ मी वाहिली आहे.' यावर ऑबेरान ह्मणाला "अग तूं किती अविचारी आहेस! थांबेनास का जरा. मी तुझा स्वामी नाहीं काय? टिटॅनियेनें तरी माझ्या मर्जीबाहेर कां जावें? तुझ्यापाशीं असलेला लहान मुलगा मला देऊन टाकिनासना बरें? तो मी तुझ्याजवळ मागतों. माझ्या मनांत त्याला माझा हुजऱ्या करावें असें आहे." मग टिटॅनिया ह्मणाली,––"होय तर? आपण आपलें सगळें राज्य दिलें, तरी देखील तो मुलगा तुह्मांला मिळणार नाहीं, मी खचित सांगून ठेवतें." असें ह्मणून रागारागानें ती तेथून निघून गेली.

तेव्हां आवेरान ह्मणाला,—"ठीक आहे; जा हवीतिकडे तूं जा. पण मला तूं जो हा त्रास दिलास त्याबद्दल छळल्यावांचून, या झाडींतून मात्र मी तुला जाऊं देणार नाहीं." मग त्यानें पक नांवाच्या पिशाच्चाला बोलाविलें. पक हा एक पिशाच्च रूपच असून त्याच्या फार आवडीचा होता. कांहीं मसलत करणें झाली तर ती तो त्याच्या विचारानेंच करीत असे. ह्या पक पिशाच्चाला कधीं कधीं

" सुजाण रॉबीन " असेंही ह्मणत असत. हें पिशाच्च एकंदरीनें पाहातां फारच मजेदार होतें. त्याची धूर्तता व समयसूचकता हे गूण नावाजण्यासारखे होते, व तेणें करून आसपासच्या खेड्यापाड्यांतून तो कुचेष्टा करून अशी मजा उडवून देई कीं हासतां हासतां पुरेवाट. खेडेगांवातल्या मुलींना भिवविणारा, दुधावरील मलई खाणारा, कांहीं वेळ विरटीं फिरविणारा, आणि घरांतल्या बायका ताक घुसळतां घुसळतां अगदीं दमून गेल्या तरी ताकावरील लोणी त्यांच्या हातीं न लागूं देणारा, आणखी कधीं कधीं दारूवर मुळींच साय न येऊं देणारा, रात्रीच्या वेळीं हिंडणाऱ्या माणसांना वाट चुकवून त्रास झालेला पाहून हंसणारा, आणि कधीं कधीं तर प्रभुभोजनाचे वेळीं, कोणी ह्मातारी बाई तोंडानें उगाच बडबड करित, दारूचे गलास घेऊन पिण्याकरितां तोंडाशीं नेत आहे, तों सुंदरशा झुरळाचा आकार धरून आंत पडणारा, व लगेच तिच्या नाकावर उडी मारून, तिला आपलीं सुरकुतलेलीं गालफडें हातानें झाडावयास लावणारा, त्याचप्रमाणें केव्हां केव्हां एखाद्या शहाण्या मावशीबाई आपली दुःखाची कहाणी सांगूं लागल्या ह्मणजे तिवईचा आकार धरून तेथें राहणारा, व त्या तिवईवर मावशीबाई बसूं लागल्या ह्मणजे तेथून निसटून जाणारा, व मावशीबाई एकदम उताण्याच्या पाताण्या पडल्या, व पडतां पडतां 'बाई बाईग पडलें,' असें ह्मणून ओरडत ओरडत मोठ मोठ्यानें खोकूं लागल्या, ह्मणजे सर्व मंडळी टाळ्या वाजवून खो खो करित हसत राहतात, व हा त्यांचा आनंद वाढत जाऊन " इतक्या गमतींत आपला वेळ कधीं गेला नव्हता

बोवा " असें ह्मणूं लागतात—अशा अशा चेष्टा करणारा जर कोणी असला तर तें हेंच पिशाच्च बरें !

रात्रींच्या वेळीं मौजेनें फिरणाऱ्या अशा या पिशाच्चास हाक मारून ऑबेरान ह्मणतो—' अरे पक, ज्या फुलाला कुमारिका "शुष्क प्रेमदर्शन फूल " असें ह्मणतात तें मला आणून दे. त्या फुलाचा गुण असा आहे कीं त्याचा रस निजल्यावर कोणाही मनुष्याच्या डोळ्यांना लाविला असतां, त्याला एकदम भुरळ पडते, व त्याला वेड लागतें, आणि जो कोणी जिवंत प्राणी पहिल्यानें दृष्टिस पडेल, त्याच्यावर त्याचें प्रेम बसतें. तें फूल एकदां हातीं आलें ह्मणजे टिटॅनिया झोंपीं जातांच, मी त्याचा रस तिच्या डोळ्यांत घालतों. मग जेव्हां ती जागी होईल, आणि जो प्राणि पहिल्यानेंच ती पाहिल—मग तो सिंह असो, अस्वल असो, किंवा लटपट करणारें माकड असो—मदनानें व्यथित होऊन त्याच्यामागें ती लागेल. आणि तिच्या नजरेंत उत्पन्न झालेलें हें मदनाचें वेड मी कधीं घालविणार नाहीं, सांगून ठेवतों ! बाकी दुसऱ्या एका वनस्पतीच्या योगानें मला तें घालवितां येतें ह्मणा ! पण अगोदर तिचा तो हुजऱ्या मला देऊन टाकावयाला मी तिला लावीन, व मग हें वेड दूर करीन.

या पिशाच्चाला चेष्टा मुळीं मनापासूनच आवडत असत. यामुळें आपल्या स्वामीची ही आज्ञा ऐकतांच, त्याला पराकाष्ठेचा आनंद झाला, व धांवतच, तें फूल आणावयाला तो निघून गेला. इकडे

फूल हातीं येण्याची वाट पहात ऑबेरान बसला आहे तोंच तेथें डिमिट्रियस व हेलेना हीं आलीं. ऑबेरान अदृश्य रूपानें संचार करीत असल्यामुळें, त्याला सहजच त्या दोघांचा संवाद ऐकावयास सांपडला. त्यांत त्याला असें कळून आलें कीं डिमेट्रियस हा हेलेना हिला झिडकारित आहे. तो तिला ह्मणाला " मी दहादां तुला सांगितलेंना ! माझें तुझ्यावर मुळींच प्रेम नाहीं ह्मणून. आणखी माझ्या मागोमाग तूं कांहीं उगाच येऊं नको. " यावर हेलेना हिनें मोठ्या काकळुतीनें त्याची विनवणी केली आणि मागें तूं मजवर कसें प्रेम करीत होतास तें अगदींच विसरलास काय, अशीहि आठवण त्याला दिली. तथापि तिच्या भाषणाकडे तिळभरही लक्ष न देतां, तिला एकटलि रानांत सोडून तो निघून गेला. त्याला वाटलें कीं आपण गेलों कीं जंगलांतील हिंस्रपशूंसच तिची दया येऊन तिचे प्राण वांचले तर वांचतील, नाहीं तर जिवंत राहावयाची नाहीं. मग तो जाऊं लागतांच, तीही होईल तेवढ्या जलदीनें त्याच्याच मागोमाग गेली. यांचें एकमेकांवर प्रेम जडलेलें होतें तेव्हां तीं उभयतां ह्याच रम्य अरण्यांत चांदण्यारात्रीं वारंवार क्रिडा करावयास येत असत. ही गोष्ट लायझॅन्डर यासही माहित होती. आणि बहुधा त्याचवेळीं ऑबेरान यानें त्यांस पाहिलें असावें. यामुळेंच हेलेनेकडे त्याचें मन वळलें. हें कसेंही असलें तरी, पक हा तें जांबळें फूल घेऊन येतांच, ऑबेरान त्याला ह्मणाला. "हें पहा, याच अरण्यांत एक बिचारी अथीनियन सुंदर स्त्री आहे.

२

एका अधम तरुण पुरुषावर प्रेम बसलें आहे. यासाठीं, ही घे फुलाची पाकळी, आणि तो तरुण निजलेला तुला आढळला कीं त्याच्या डोळ्यांला त्याचा रस लाव. पण लक्षांत ठेव कीं ती तरुण स्त्री त्या समयीं त्याच्या सरशीच असावी. सारांश, जागा होऊन त्यानें डोळे उघडले कीं त्यानें टाकून दिलेली ही स्त्रीच त्याचे दृष्टीस पडावी. त्या पुरुषाच्या आंगांत अथीनियन चालीचा पोषाख आहे, यावरून तो तुला सहज ओळखतां येईल. आपल्या स्वामीचें हें उत्तर ऐकून पक ह्मणाला–"महाराज,आपणाला कांहीं काळजी नको; आपला नोकर हें काम बजावल्याशिवाय खचित राहणार नाहीं."

इतकें झाल्यावर ऑबेरान हा नकळत टिटॅनिया राणीच्या लतामंडपाकडे गेला. त्यावेळीं टिटॅनिया राणीची निजावयाची तयारी चालली होती. हा लतामंडप एका नदीच्या कांठीं असून, तेथें अनेक प्रकारचीं जंगली फुलें नेहमी फुललेलीं असत कोठें कोठें कुन्द्याचीं फुलें फुललेलीं दिसत होतीं, तर कोठें कोठें मोगरीच्या व चंपकाच्या कळ्या उमललेल्या आढळत होत्या. आणि हा लतामंडप तरी धायटीच्या सपुष्प वेलींचा व त्यांतच कुसरीच्या वेलींचा बनलेला होता. अशा मंडपांत टिटॅनिया राणी रात्रीच्या प्रहरीं कांहीं वेळ झोंप घेत असे, व त्यावेळीं एका मोठ्या परीला पुरेल एवढी मोठी: लांब रुंद सर्पाची कांत ती पांघरावयास घेत असे.

ऑबेरान हा लता मंडपाकडे गेला, तेव्हां कोणतीं कामें कोणी करावयाचीं याविषयीं आपल्या अनुचर पऱ्यांना टिटॅनिया राणी हुकूम देत होती. राणीसाहेब ह्मणाल्या " पऱ्यांनो मी काय ह्मणतें तें नीट ऐका. गुलाबाच्या व चंपकाच्या कळ्यांतले किडे कांहीं-जणींनीं मारावे, व कांहीं जणींनीं पाकोळ्या बरोबर लढाई करून त्यांचे पंख काढून घ्यावे. आमच्या भूतांच्या सेनेला त्या पंखांचा पोषाख मला करून द्यावयाचा आहे. आणि रात्रीं जें घूत्कार करून आपल्याला त्रास देतें, व आपल्या भूतांची नाजुक आकृती पाहून ज्याला आश्चर्य वाटतें, त्या घुबडाचाही कांहींजणींनीं बंदोबस्त करावा. तर चालूंद्या आतां तुमचीं गाणीं. मला झोंप लागेल, आणि मी झोंपीं गेलें ह्मणजे तुह्मी आपापल्या उद्योगाला जा. " मग पऱ्या गाणें गाऊं लागल्या तें हें. पहिली परी गाऊं लागते.—

श्लोक ( मालिनी वृत्त )

झणिं बुल बुल पक्ष्या। मंजु मंजु स्वनातें  
करुनि, मधुर गाणें गाय, जें दे सुखातें ।  
प्रियकर अजि राणी आमुची नीज घेते  
परि हरिं अहितातें मोहुनी मंत्र गीतें ॥

सर्व जणी ह्मणूं लागतात—

गीत

( ' मारुतिराया बलभीमा ' या चालीवर )

कवळ्या सर्पांनो, बाई ।  
राणी करिते अंगाई ॥

दूर येथुनी झणिं जाई ।
न करीं पीडा मुळिं कांहीं ॥
कांटे साळू गे ! वारीं ।
साळ-पिसें अपुलीं सारीं ॥
सरसर सरड्यांनो ! जाई ।
कामचि तुमचें अजि नाहीं ॥
पालीबाई ! चुक चुकुनी ।
नकरीं पीडा अजि कार्नीं ॥

दुसरीपरी गाऊं लागते—

श्लोक ( मालिनी वृत्त. )

झणिं बुलबुल पक्ष्या ! मंजुमंजुस्वनातें
करुनि, मधुरगाणें गाय, जें दे सुखातें ।
प्रियकर आजि राणी आमुची नीज घेते
परि हरीं अहितातें मोहुनी मंत्र गीतें ॥

सर्व जणी ह्मणूं लागतात--

गाणें ( चाल वरची )

जीव जंतुनो ! करि बाई ।
राणी अमुची अंगाई ॥
कोष्टी कोळी कीटक हो ।
पुरे, अह्मांला कष्ट नहो ॥

लांब पाय ते अखुडावे ।
जलदी-जलदीनें जावें ॥
अमुची राणी अंगाई ।
करिते, ह्मणुनि करा घाई ॥
खबरदार रे नच येई ।
राणी करिते अंगाई ॥

पऱ्यांचें गाणें संपल्यावर राणी झोंपी गेली असें पाहून, त्या आपापलीं महत्वाचीं नेमलेलीं कामें करावयास निघून गेल्या. मग ऑबेरान टिटॅनिया राणीपाशीं गेला, व तिच्या डोळ्यांना हळूच त्या फुलांचा रस त्यानें लावला आणि ह्मणाला "ठीक आहे आतां तूं जागी झालीस ह्मणजे पहिल्यानेंच जो प्राणी तूं पाहाशील, त्याजवरच खरें प्रेम कर. व तोच आपला प्रियकर ह्मणून समज."

इकडे डिमेट्रियस याशीं मला लग्न करावयाचें नाहीं ह्मणून हर्मिया ह्मणत होती, व जिला या हट्टासाठीं देहान्त शिक्षेचें भय पडलें होतें ती ह्या संकटांतून सुटण्याच्या हेतूनें बापाच्या घरून कोणालाही नकळत निघाली, ह्मणून वर सांगितलें आहे. तिचें पुढें काय झालें तें आतां सांगू या. हर्मिया निघाली ती थेट वर सांगितलेल्या अरण्यांतच आली. तेथें तिची व तिच्या प्रियकराची भेटही झाली. कारण लायझँडर तिची वाटच पाहात होता, व तिला आपल्या मावशीच्या घरीं घेऊन जाण्याला तयारच होता. तीं उभयतां रस्ता चालू लागलीं व अर्धा रस्ता झाला असेल नसेल

तोंच हर्मिया थकून गेली, व जिनें प्रीतिस्तव बापाचें घर सोडून आपला जीव एवढया धोक्यांत घातला, तिला एवढी पिडा होते ह्मणून चिंता करूं लागला. तो तिला ह्मणाला " प्रिये, तूं अंमळ येथेंच पडून झोंप घे. गवत उगवलेला हा मऊ मऊ उंचवटा तुला निजायला बरा आहे. सकाळपर्यंत आपण येथेंच विश्रांती घेऊं." मग हर्मिया निजली असतां तोही तिजपासून कांहीं अंतरावर पडून झोंपीं गेला. अशा झोंपेंतच पक हा तेथें आला. त्यांना पाहातांच त्यानें ताडलें कीं आपल्या स्वामीनें ज्या खुणा आपणास सांगितल्या, त्या येथें जमतात. तो आपल्याशीं ह्मणाला, याच्या आंगांत अथेनियन चालीचा पोषाख आहे, नाहीं काय? आणि त्याच्या जवळ निजलेली ही स्त्री, तीच त्यानें सोडून दिलेली त्याची प्रिया; नव्हे काय? खचित् खुणा जमल्या. तेव्हां हाच तो पुरुष, व हीच ती स्त्री, आणि हा जागा झाला ह्मणजे प्रथम हिलाच पाहिल, हेंही बरें आहे. मग विशेष भानगडींत न पडतां त्यानें फुलाचा थोडासा रस त्याच्या डोळयावर पिळला. पुढें असें झालें कीं त्याच ठिकाणीं हेलेना अवचित आली आणि लायझॅन्डर जागा होऊन डोळे उघडतो तों, हर्मियेच्या जागीं हेलेना हीच प्रथम त्याचे दृष्टीस पडली. कोणाला सांगितलें तर आश्चर्य वाटेल, पण त्या फुलाचा असा कांहीं प्रभाव दिसून आला कीं, लायझॅन्डर याच्या मनांतील हर्मियेवरील प्रीति पार लयास गेली आणि तितकीच हेलेनेवर बसली.

लायझॅन्डर जागा झाला तेव्हां त्याची दृष्टी जर प्रथम हर्मियेवर गेली असती, तर पक याच्या हातून झालेली चुकी कदाचित उघडकीलाही आली नसती. कारण लायझॅन्डर याचें हर्मियेवर अगोदरच अत्यंत प्रेम असल्यामुळें त्यांत विशेषसें काय घडून आलें असतें ? पण खरोखर लायझॅन्डर याचें हें दुर्दैवच समजलें पाहिजे आणि ह्मणूनच पिशाच्चाच्या तावडींत तो सांपडला. तेणेंकरून असें घडून आलें कीं त्याचें हर्मियेवरील प्रेम अगदीं उडालें व तिला जागचे जागीं निजलेली सोडून, दुसऱ्याच एका स्त्रीचा नाद धरून तो तिच्यामागें निघून गेला.

झाली ही गोष्ट तर एकंदरीनें पाहातां दुर्दैवानेंच झाली, असें ह्मटलें पाहिजे. डिमेट्रियस निष्ठुरपणें निघून गेल्यावर हेलेनाही त्याच्या पाठोपाठ गेली, हें वर सांगितलेंच आहे. परंतु किती झालें तरी ती स्त्री पडली, यामुळें डिमेट्रियस याच्याइतक्या वेगानें तिला चालतां आलें नाहीं, यांत काय नवल ? थोड्याच अवकाशांत ह्या धावपळीचा परिणाम असा झाला कीं हेलेना मागें राहिली, व डिमेट्रियस तिच्या दृष्टीच्या आटोक्याबाहेर गेल्यामुळें दिसेनासा झाला. रस्ता चुकल्यामुळें चालतां चालतां तिचे हातपाय थकले, मन उदास झालें, व व्याकुळ होत्सातो, लायझॅन्डर निजला होता तेथें अवचीत येऊन पोंचली. त्याला पाहातांच ती ह्मणाली- "अरेरे हा कोण ? लायझॅन्डर ? नुसत्या जमिनीवर पडला आहे ! हा झोंपेंतच आहे काय ? श्वास वाहातो आहेना पण? पाहूंदे. अरे बाबा ! जिवंत

असलास, तर जागा हो. हे शब्द ऐकतांच, लायझॅन्डर तत्काळ जागा झाला आणि तिला पाहातांच फुलाचा प्रभाव दिसूं लागला; मग तो हेलेनेची पराकाष्ठेची प्रशंसा करून, तुजवर माझें फार प्रेम आहे ह्मणून सांगूं लागला. तो ह्मणाला,"अहागे सुंदरी ! तूं हर्मियेहून कितीतरी सुरेख आहेस ! कावळीला कधीं हंसीची सर येईल काय ? तुझ्या स्वरूपाला मी एवढा भ्ललों आहे, कीं तुजसाठीं मी अग्नींतून सुद्धां चालून जाईन. हीं तर काय पण याहून देखील पराकाष्ठेचीं प्रेम दर्शक भाषणें तो बोलत सुटला. पण लायझॅन्डर याचें प्रेम हर्मियेवर होतें, व तिच्याशींच त्याचें लग्न व्हावयाचें होतें, हें हेलेना हिला चांगलें ठाऊक होतें. यास्तव त्याची वरील भाषणें ऐकून तिला पराकाष्ठेचा संताप आला व त्याच्या भरांत ती त्याला ह्मणाली--" अरे बाबा मी तुझें असें काय केलें आहे, ह्मणून तूं माझा असा पाणउतारा करतोस ? मी समजून आहें कीं माझा प्रियकर मजकडे कधीं ढुंकूनही प्रेम दृष्टीनें पाहात नाहीं, व कधीं पाहील असें मला वाटत नाहीं. मग माझ्या स्वरूपांत जीं व्यंगें आहेत, त्यांची आठवण देऊन मला मेल्याहूनही मेली कां करित आहेस ? तेवढ्यानें तुझें समाधान होत नाहीं काय ? मला वाटलें होतें कीं तुझ्या अंतःकरणांत दया वास करीत असेल. पण शिव शिव ! कोण हा प्रसंग ! एखाद्या स्त्रीचें एखाद्या पुरुषावर प्रेम बसावें, व त्यानें तिला झिडकारावें, व त्यानें झिडकारल्यावरून दुसऱ्याच एकानें प्रेम करण्याचें ढोंग करून, तिची पाहिजे तशी विटं-

बना करावी हें चांगलें ना ? ” असें ह्मणून ती रागानें तेथून निघून गेली; व तिच्या मागें लागून लायझॅन्डरही गेला. हर्मिया निजली आहे, या गोष्टीचें त्याला भानदेखील राहिलें नाहीं. हर्मिया जागी होऊन पाहते तों आपण एकटीच येथें पडलों आहों असें तिला दिसून आलें. मग भयानें घाबरून जाऊन, ती जिकडे पाय नेतील तिकडे जाऊं लागली, त्यांतही लायझॅन्डर याचें काय झालें ही आणखी एक चिंता तिजपुढें उभी राहिली. त्याला शोधावें तरी कोठें हेंच तिला आधीं कळेना.

इकडे, लायझॅन्डर व हर्मिया हीं दिसेनाशीं झाल्यामुळें, डिमेट्रियस हाही त्यांचा शोध करीत चोहोंकडे फिरूं लागला. शेवटीं चालून चालून अगदीं थकून गेला असतां, त्याला एके ठिकाणीं, बसल्या जागींच, झोंप लागली. इतक्यांत पिशाच्चराज ऑबेरान यांची स्वारी तेथें आली. तेव्हां गाढझोंप लागलेला डिमेट्रियस त्यांच्या सहजच दृष्टीस पडला. तेव्हां त्यानें पक यास जे कांहीं प्रश्न केले, त्यांवरून त्याला असें कळून आलें कीं पक यानें फुलाचा रस डोळयावर पिळण्यांत मोठी चुक केली आहे. कारण, त्यानें भलत्याच मनुष्याच्या डोळयावर रस पिळला असून, ज्याच्या डोळ्यावर पिळावयाचा त्यावर मुळींच पिळला नाहीं. ही गोष्ट लक्षांत येतांच, ऑबेरान यानें डिमेट्रियस निजला होता त्याच्या डोळ्यावर त्या फुलाचा रस पिळला; मग तो जागा होतांच, हेलेना त्याच्या दृष्टीस पडली, तेव्हां तोही लायझॅन्डरप्रमाणेंच माझें प्रेम

तुजवर आहे ह्मणून तिला ह्मणूं लागला. इतक्यांत लायझॅन्डर व त्याच्या मागोमाग हर्मिया हीं दोघेही तेथें आलीं. मग जी मौज झाली ती पाहून त्या चेष्टेखोर पक पिशाच्चाला जो आनंद झाला तो सांगतां पुरवत नाहीं. या चुकीमुळेंच आपल्या प्रियकरा मागोमाग फिरण्याची व त्याची विनवणी करण्याची पाळी आतां हर्मियेवर आली. यास कारण तरी केवळ तिचें दुर्दैव; याहून अधिक काय ह्मणावें ? लायझॅन्डर यानें तर हर्मियेचें नांव सोडलें, आणि तो हेलेनेवर प्रेमयुक्त भाषणांचा वर्षाव करूं लागला. बरें, आतां डिमेट्रियस याचें ही मन फिरलें, व तोही हेलेनेवरच प्रिती करूं लागला. कारण दोघांच्याही डोळ्यांवर त्या फुलाची पूर्ण छाप बसली असल्यामुळें असा प्रकार घडला. डिमेट्रियस व लायझॅन्डर हे दोघेही आपणाकडे प्रेमयुक्त दृष्टीनें पाहूं लागले, हें झालें तरी कसें ? याचा कांहींच उलगडा हेलेनेला न झाल्यामुळें ती मोठ्या अचंब्यांत पडली. तिला तर असेंच वाटलें कीं आपणावर प्रेम करतोंसें दाखऊन, आपली विटंबना करावी असाच यांचा बेत झाला आहे, व त्यांतच हर्मिया ही देखील त्यांस जाऊन मिळाली आहे.

बरें, हर्मियेलाही हा काय गोंधळ आहे याची कल्पना नव्हती; व तीही मोठ्या अचंब्यांत पडली. तथापि ज्या अर्थी लायझॅन्डर व डिमेट्रियस हे दोघे आपणावर प्रेम करित असतां, एकाएकीं आतां हेलेनेवर करूं लागले, त्याअर्थी यांत कांहीं तरी गोम आहे

खचित; ही कांहीं निव्वळ थट्टा नव्हे, असें तिच्या मनानें घेतलें.

याप्रमाणें दोघींची दोहों प्रकारची समजूत होऊन गेल्यामुळें, असें झालें कीं बोलतां बोलतां त्यांचें भांडण जुंपलें, व तें फारच विकोपास गेलें.

शेवटीं हेलेना हर्मियेला ह्मणाली--" माझी विटंबना करून, मला अगदीं तुच्छ करून टाकण्यासाठीं या तिघांनीं मिळून हा विश्वासघातकी खेळ आरंभिला आहे कीं काय ? असें असेल तर फार चांगलें ! माझी फजिती करण्यासाठीं तूंच लायझॅन्डरला माझ्या डोळ्यांचें व रूपाचें वर्णन करावयाला माझ्या मागोमाग पाठविलेंस, हें खरेंना पण ? लायझॅन्डरप्रमाणेंच तुजवर प्रेम करणारा व मला नुक्तेंच ज्यानें लाथेनें झुगारून दिलें तो डिमेट्रियस यालाही 'देवी' 'परी' 'जिचें स्वरूप सगळ्या पृथ्वीवर क्वचितच दृष्टीस पडेल अशा प्रकारची, व जिच्या रूपाला कसलीच उपमा देतां येणार नाहीं' अशा अशा नाना प्रकारांनीं मला हाका मारायला तूं पढविलेंस हें खरेंना पण ? तसें जर नसतें तर जिचा तो द्वेष करितो तिला त्यानें अशा रितीनें काय ह्मणून हाका माराव्या ? आणि लायझॅन्डरच्या अंतः--करणांत तुजविषयीं येवढें अपार प्रेम नांदत असतांना, तें तुजवर नाहीं आणि मजवर मात्र अत्यंत जडलें आहे, असें बोलावयाला, तुझ्या संमतिवाचून व तुझ्या चिथवणीवांचून तो कधीं तरी धजता काय ? अग निर्दय हर्मिये ! याप्रमाणें पुरुषांच्या मसलतींत शिरून तूं आपल्या मैत्रिणीची विटंबना

करण्यास तयार व्हावेंस काय? एकमेकींवर विश्वास ठेवून आपण आजपर्यंत एकमेकींना आपल्या मनांतल्या गोष्टी सांगितल्या; तशाच अगदीं सख्या बहिणीप्रमाणें आपण एकमेकींशीं वागलों, व एकमेकींशी हित गुज करण्यांत आपण गुंग होऊन गेलों असतां घरीं जावयाचेंही भान राहत नसे; आणि तेव्हां देखील आपणाला एकमेकींपासून वेगळें व्हावें लागेल या भयानें अगदी जलदीनें निघुन जाणाऱ्या वेळाची आपण 'मेल्या मेल्या' ह्मणून शिव्यांनीं निंदा करित असूं.–हें कांही तुला आठवतें का?–अगदींच विसरलीस अं? आपण शाळेंत जात होतों तेव्हांची आपली मैत्री तूं अगदींच विसरलीस काय? व कोणालाही उपद्रव करावयाचा नाहीं, अशा बाळपणच्या सात्विक वृत्तीला तूं पारखी झालीस काय? ज्याप्रमाणें दोन देवतांनीं एकच वस्तू उत्पन्न करावी, त्याप्रमाणें तूं व मी मिळून एकाच गादीवर बसून एकच गाणें ह्मणत असूं,व जे सूर काढीत असूं तें एकांत एक मिळून गेल्यामुळें दोघींनी मिळून एकच सूर काढला असें वाटत असें; इतकेंच केवळ नाहीं, तर याप्रमाणें जसे काय आपले हात, आपलीं शरीरें, आपले आवाज, आपलीं मनें हीं एकच आहेत अशा रितीनें आपण वागत असूं, हें तूं विसरलीस काय? अशा रितीनें आपण आपल्या सुयांनी एकच फूल गुंफले होतें ह्याची तुला आठवण आहे काय? तसेंच करंदीवरच्या दोन गोड फळांप्रमाणें दिसण्यांत वेगळ्या पण आंतून एकजीव अशा आपण लहनाच्या मोठ्या झालों–अशा प्रकारें लहानपणापासून वाढत आलेलें जें

आपलें प्रेम त्याच्या मुळावरच तूं कुऱ्हाड घालतेस ? आणखी ह्या कटांत मिळून, तूं आपल्या दीन मैत्रिणीची विटंबना करतेस काय ? असें करणें मैत्रीला खचित उचित नव्हे. स्त्रीजातीलाही हें कृत्य शोभण्यासारखें नाहीं."

यावर हर्मिया तिला ह्मणाली,--"हें तुझें रागाचें बोलणें ऐकून मला मोठें आश्चर्य वाटतें. मी तुझा तिरस्कार करित नाहीं. तूं मात्र माझा निष्कारण द्वेष करितेस असें दिसतें."

तेव्हां हेलेना ह्मणते--"बरें आहेग ! असेंच चालूंदे बाई ! अग थोडें तरी वाईट वाटण्याचें सोंग कर, आणि मी पाठ फिरविली कीं लागलीच मला वेडावून दाखीव; आणि एकमेकांकडे पाहून डोळे मिचकिव, आणि थट्टेचीही बतावणी अशीच चालूं दे. तुला माझी कींव आली असती, अनाथावर परोपकार करण्याची बुद्धी तुझ्या ठिकाणीं असती आणि संभावितपणानें कसें वागावें हें जर चांगलें समजत असतें तर मला या दशेला आणून, तूं माझी अशी फजि-ती केली नसतीस."

वर वर्णिल्याप्रमाणें हर्मिया व हेलेना यांचें भांडण चाललें असतां डिमेट्रिस व लॉयझॅन्डर हे दोघेही त्यांना सोडून अमंळ दूर गेले व हेलेनेसाठीं एकमेकांशीं दोनहात करून काय तो निर्णय लाऊन घ्यायाचा ह्मणून सोईची जागा पाहात होते. मग ते गेले असें पाहून त्यांच्या शोधार्थ त्या दोघीजणीही अरण्यांत

फिरूं लागल्या त्या गेल्या असें पाहून आबेरान हा पक याला ह्मणाला--" हें पाहिलेंस तुझ्या चुकीचें फळ! तूं ही चूक समजून उमजून केलीस काय?" त्यावर पक यानें उत्तर दिलें " पिशाच्च महाराज, ही केवळ नजर चूक झाली. अथीनीयन चालीचा पोषाख घातलेला तो पुरुष आहे अशीच नाहीं का खूण तुह्मीं सांगितली? तथापी जें झालें त्याचें मला अगदीं वाईट वाटत नाहीं; कारण त्यांचे भांडणापासून किती तरी मौज पाहावयाला मिळाली." हें ऐकून हंसराज ऑबेरान त्यास ह्मणाला-- "डिमेट्रियस व लायझॅन्डर हे दोघेही दोन हात करावे ह्मणून जागा पाहात आहेत हें तूं आतां पाहिलें आहेसच तर तूं आतां असें कर कीं रात्रभर सर्वत्र धुकें पसर व या दोघांनांही एकमेकांची गांठ पडणार नाहीं असे एकमेकांपासून दूर दूर नाजीव. एकदां तूं लायझॅन्डरसारखा बोल, व वेडावांकडा शब्द बोलून तूं डिमेट्रियसला चिडिव, आणि तूं डिमेट्रियस याच्या स्वरानें शिव्या देऊं लाग; आणि त्यांना असे फिरव कीं चालतां चालतां त्यांचे पाय शिशासारखे अगदीं जड होऊन जातील. त्याचप्रमाणें झोंप आल्यामुळें ते अगदीं मेल्यासारखे होऊन जातील असें कर; एवढेंच नाहीं तर जमिनीवर अंग टाकतांच त्यांना गाढ झोंप लागूं दे. मग लायझॅन्डर निजला असतां त्याच्या डोळ्यांवर ह्या दुसऱ्या फुलाचा रस पीळ, ह्मणजे त्याच्या हृदयांतून या नव्या प्रीतीचा विसर पडेल, व हर्मियेवरील मुळची प्रीती पुन्हां ताजी होईल. असें झालें ह्मणजे त्या दोघीही

तरुणींस आपापल्या प्रियकरांच्या प्रितीचा लाभ होऊन त्या सुखी होतील, आणि हा जो प्रकार घडला व जीं दुःखें त्यांस भोगावयास लागलीं हें सर्व स्वप्नवत त्यांस वाटेल. इतक्यांत आपण दोघे टिटॉनियेला कोण प्रियकर मिळाला हें पाहूं.

ऑबेरान गेला तेव्हां टिटॉनिया राणी झोंपेंतच होती, जंगलांत फिरणाऱ्या एका अडाणी मनुष्याला आपला प्रियकर समजून त्याच्या गळ्यांत गळा घालून ती पडली होती. हा अडाणी मनुष्य वाट चुकल्यामुळें दमून तेथें झोंप येऊन पडाला होता. त्याच्या डोक्यावर त्यानें गाढवाचें डोकें आणून अशा रितीनें बसवून दिलें कीं तें जणूं त्याचें मुळचेंच डोकें आहे, असें कोणाही पाहाणाराला वाटावें! आतां गाढवाचें हें डोकें ऑबेरान यानें जरी फार चतुराईनें व अगदीं हलक्या हातानें बसविलें, तरी तेवढ्या हालचालीनें देखील तो बिचारा अडाणी मनुष्य जागा झाला. तथापि आपल्या शरीरांत कांहीं फेरबदल झाला असेल, याची मात्र त्याला शुद्ध होती असें दिसलें नाहीं. कारण लगेच तो उठला आणि तसाच टिटॉनिया राणीच्या लतामंडपाकडे पळत गेला. इतक्यांत टिटॉनिया राणीनें डोळे उघडले आणि त्याला पाहतांच ती त्याला ह्मणूं लागली" हा कोण? कोणी देवदूत आला आहे कीं काय?' अरे वः! तूं किती तरी देखणा आहेस! व किती तरी शहाणा आहेस रे"! यावर तो अडाणी मनुष्य ह्मणतो -" बाईसाहेब, या अरण्यांतून मला जर

सुखरूपपणें एकदाचें निघून जातां येईल, तर माझ्या त्या शहाणपणाचा मला कांहीं उपयोग झाला असें ह्मणतां येईल. "

त्यावर टिटॅनिया ह्मणाली--"नको रे नको ! या आरण्यांतून निघून जाण्याचें तूं मनांत देखील आणूं नको. तुला येथल्या येथेंच राहिलें पाहिजे,--मी नाहीं तुला जाऊंद्यायची ! मग तुला तें आवडो कीं न आवडो ! मी कांहीं साधारण प्रतीचें पिशाच्च नाहीं मी जिकडे जाईन तिकडे मधुमास माझ्याबरोबर येत असतो. माझें तुझ्यावर प्रेम जडलें आहे, तेव्हां तूं मजबरोबर चल. " अरे, तुझ्या शुश्रूषेला पाहिजे तर मी पऱ्या देईन; आणि त्या तुला समुद्रांतून रत्नें आणून देतील; तूं पुष्पशय्येवर निजलास ह्मणजे तुला झोंप लागावी, ह्मणून त्या तुला गाणीं ह्मणतील. मनुष्यमात्राच्या ठिकाणीं स्वभावतः जें जडत्व असतें तें तुझ्या अंगीं आहे, हें खरें; पण तें मी घालवून टाकीन ह्मणजे पिशाच्चाप्रमाणें तुलाही हवेमध्यें यथेष्ट संचार करितां येईल. " असें ह्मणून तिनें आपल्या पिशाच्चरूप अनुचरींतून डाळींबी,गुलाबी, वाळवी व मोहरी या चौघीं जणींस हाक मारून हजर होण्याविषयीं आज्ञा केली. व त्या येतांच त्यांस ती ह्मणाली--" या गृहस्थाशीं प्रेमानें व आदरानें वागा बरें ! तो चालूं लागला ह्मणजे त्याचे सभोंवार नाचून बागडून त्याचें मनोरंजन करा. चांगलीं चांगलीं सिताफळें आणि स्वादिष्ट द्राक्षें आणून त्याला खावयाला द्या. व त्याचप्रमाणें उत्तमोत्तम जांभळें, पेरू, ओले अंजीर आणि तुतें हीं

फळेंही द्या. गुणगुणणाऱ्या मधमाशांकडून मधाचीं पोळीं आणून तीं त्याला द्या; आणि ज्यांच्यावर मेण चिकटलें आहे, अशा त्यांच्या तंगड्या तोडून आणून त्या काजव्याच्या दिव्यानें पेटवा; व माझ्या प्रियकराला नीज येऊं लागली ह्मणजे त्याला निजवा, आणि तो उठला ह्मणजे त्याच्या तैनातींत असा. तो जागा होऊं नये ह्मणून पतंगाचे चित्र विचित्र पंख उपटून ते त्याच्या डोळ्यावर धरा. पऱ्यांनो, याच्याशीं नम्रपणानें वागून त्याचा चांगला मानमरातब ठेवा बरें--समजलांना ! " नंतर तीनें त्या अडाणी माणसाला आपल्या शेजारीं पुष्पशय्येवर बसवून घेऊन त्याला ह्मणूं लागली--" ये तुझ्या नाजूक गालावरून मी हात फिरवितें, व कस्तुरिचा वास दिलेलीं गुलाबाचीं फुलें तुझ्या सपाट, गुळगुळीत, मऊशा कपाळावर बांधतें. ये, प्रियकरा, मी तुझ्या सुंदरशा लांब लांब कानाचा मुका घेतें. " अशा प्रकारें टिटॅनिया राणीनें ही जी त्याची मनधरणी प्रेमानें आपल्यापरी चालविली तिजकडे फारसें लक्ष न देतां, गाढवाचें डोकें लावलेल्या त्या अडाणी माणसानें, आपणास ह्या ज्या नव्या दासी मिळाल्या त्यांबद्दल गर्व मानून त्यांस हर्षानें हांका मारून ह्मटलें--" अगे, ती डाळिंबी कोण आहे ? " हाक ऐकतांच डाळिंबी पुढें होऊन ह्मणते--" हजर आहें, सरकार ! " तिला तो अडाणी मनुष्य ह्मणतो--" अगे, माझें अंमळ डोकें खाजीव पाहूं ! आग, पण ती गुलाबी कोठें गेली ?" तेव्हां गुलाबी ही पुढें येऊन ह्मणते--" सरकार, ही पहा मीही हजर आहें. " तिजकडे

डौलानें पाहून तो ह्मणतो--" बरें, तूं आपलीं हत्यारें अमंळ घेऊन ये; व लाल ढुंगणाची गुणगुणणारी एक मधमाशी मारून बाभळीच्या कांट्याला टोंचून अडकव, आणि इकडे घेऊन ये. तसेंच माझ्याकरितां एक मधाचें पोळेंही घेऊन ये. पण, ऐकलेंस काग--हें काम करण्यासाठीं फारशी तसदी घेऊं नको बरें का ! आणखी हें पहा, मधाचें पोळें फुटणार नाहीं अशी खबरदारी घे. बरें का ! मधाचें पोळें फुटून तें तुझ्या अंगावर सांडलेलें पाहाणें आपल्याला कांहीं आंवडणार नाहीं बोवा ! बरें पण ती चणचणीत स्वभावाची मोहरीबाई कोठें आहे? "

तेव्हां मोहरीबाईपुढें येऊन ह्मणते– " ही मी तेथेंच आहें सरकार ! काय आज्ञा आहे ? " तो ह्मणतो-" आज्ञा काय मोठीशी नाहीं.–इतकीच कीं माझें डोकें खाजविण्याच्या कामीं तूं या गुलाबबाईला मदत कर. मला अगोदर न्हाव्याकडे गेलें पाहिजे. कारण माझ्या तोंडावर पुष्कळसे केंस आले आहेत, असें मला वाटतें. माझे केंस मला बोंचून खाजविण्याचें काम करीतच आहेत, तरी पण खाजविल्यावांचून मला चैनच पडत नाहीं. राणी कुरवाळून त्याला ह्मणते,–"प्रियकरा, आपल्याला खावयास पाहिजे काय? माझ्या येथें एक मोठी हुषार परी आहे ती त्या खारीच्या घरोट्यांतून अगदीं नवे दाणे चोरून आणून तुला देईल, मग तर झालें ? " तेव्हां तो अडाणी मनुष्य ह्मणतो,–" एक तोबराभर चंदी, व दुर्मिळ मधुर असें वाळलेलें गवत मिळेल तर फार बरें ! एक दोन ओंज-

ळी वाटाणे जरी मला मिळतील तरी चिंता नाहीं. पण हें पहा, माझी एक विनंती आहे. मला झोंप येत आहे तेव्हां कोणीही त्रास देऊं नये ह्मणून आपल्या दासदासींना आधीं ताकीद दे पाहूं ''? यावर टिटॅनियाराणी ह्मणते,--" बरें आहे; तूं नजि व तुला मिठी मारूनच मी पडतें. मला तूं किती आवडतोस ह्मणून सांगूं ! तुझ्या पासून मला जें सूख होत आहे तें किती हें सांगतां येत नाहीं. अशीं भाषणें करित करित तीही झोंपीं गेली. इतक्यांत पिशाच्च-राज आबेरॉन हा पक याला बरोबर घेऊन तेथें येऊन पोंचला. राणीचा तो थाट पाहून तो त्याला ह्मणाला,--" तूं बरा आलास. ही मजा तूं पाहिलीस काय ? राणीच्या या प्रेमचेष्टा पाहून मला तर बोवा तिची भारी कींव येते. अरे, मी तिला नुकतीच पाहिली तों ती या जंगलाच्या मागच्या बाजूला या गाढवासाठीं ह्मणून सुंदर सुंदर फुलें गोळा करित होती. तेव्हां मी तिची चांगलीच शोभा केली. तिनें त्याच्या गळयांत सुंदर व सुवासिक अशा पुष्प गुच्छांच्या माळा बांधल्या होत्या; व तीही त्याला मिठी देऊन पडली होती. हें जेव्हां मी प्रत्यक्ष पाहिलें तेव्हां तिलाही ती गोष्ट नाका-रतां येईना. मग मी तिजपाशीं तो मुलगा मागितला, आणि लज्जेनें अगोदरच ओशाळी झाली असल्यामुळें तिनें तो बिनतक्रार तोंडांतून ब्रही न काढतां, एकदम माझ्या स्वाधीन केला. "

मुलगा हातीं लागतांच ऑबेरान यालाही राणीची फार दया आली, आणि आपण मोठ्या मौजेनें थट्टा करून तिचा गर्व

परिहार केला, याबद्दल स्वतः त्यालाही क्षणभर कृतार्थता वाटली. मग झालें एवढें पुरे झालें असें ह्मणून तिच्या डोळ्यावर त्या दुसऱ्या फुलाचा रस त्यानें पिळला व तिजवर टाकलेली माया काढून घेतली. तेव्हां तत्काळ तिचा भ्रम नाहींसा झाला आणि डोळे उघडून ती पाहते तों आपण कोणावर प्रेम धरलें होतें याचा तिला विस्मय वाटूं लागला. आणि ती ह्मणूं लागली–" कीं माझ्या डोळ्यांना तर तो आतां किती तरी हिडीस दिसत आहे! किती ओंगळ त्याचें स्वरूप!" मग पिशाच्च राजानें त्या अडाणी माणसाच्या डोक्यावरून तें गाढवाचें डोकें काढून घेण्यास आपल्या अनुचरांस हुकूम केला. आणि तो ह्मणाला,-" त्याला त्याच्या स्वतःच्याच रूपानें निजूं द्या, ह्मणजे जागा झाल्यावर तो शहरांत निघून जाईल."

या प्रमाणें पिशाच्चांचा राजा व राणी यांची समजी झाल्यावर तीं एकमेकांशीं मौजेनें गोष्टी बोलूं लागलीं; त्यांत, प्रेमी जनांचीं जीं भांडणें त्या अरण्यांत चाललीं होतीं त्यांचीच मौजेची हकीगत त्यानें राणीस सविस्तर सांगितली. ती ऐकून त्या भांडणाचा शेवट काय होतो हें पाहण्यास मीही तुमच्याबरोबर येतें ह्मणून ती निघाली.

लवकरच ते दोघे प्रेमीजन व त्यांच्या त्या दोघीं प्रियतमा गवतावर एकमेकांपासून थोड्या अंतरावर निजलीं होतीं तीं त्यांच्या

दृष्टीस पडलीं. कारण पक यानें त्यांस समजून उमजूनच त्यांस न कळतां एके ठिकाणीं आणलीं होतीं. व आपण आधीं जी चूक केली ती दुरुस्त करावी व त्यांना जो त्रास झाला त्याचा वचपा सूख देऊन भरून काढावा असें त्यानें मनांत आणलें. मग पिशाच्चराजानें दिलेल्या त्या दुसऱ्या फुलाचा रस लायझॅन्डर याचे डोळ्यावर पिळून त्यानें त्याचा भ्रम दूर केला.

मग हर्मिया प्रथम जागी झाली आणि पाहते तों निघून गेलेला तिचा प्रियकर लायझॅन्डर हा जवळच अंतरावर निजला आहे असें तिला दिसून आलें. त्याचें प्रेम एवढें डळमळीत कसें झालें याचेंच क्षणभर तिला मोठें आश्चर्य वाटलें. लवकरच लायझॅन्डर हाही जागा झाला, व हर्मियेला पाहतांच स्मरल्यासारखें करून ह्मणाला,--" काय, मी स्वप्नांत तर नव्हतों ना ? आतां तुजवर माझें प्रेम होतें हें मला चांगलें आठवतें. मग आपण रात्रभर पाहिलें तें काय पाहिलें ? सगळा स्वप्नांतलाच प्रकार झाला कीं काय ? " असें ह्मणून तीं सर्वजणें त्याच संबंधाच्या गोष्टी एकमेकाशीं बोलूं लागलीं.

इतक्यांत डिमेट्रियस व हेलेना हीं दोघे हीं जागीं झालीं. हेलेनो हिच्या मनाला रात्रभर जो शीण झाला होता तो आतां गाढ झोंप लागल्यामुळें कांहींसा उतरला. व तिच्या जिवाला समाधान वाटूं लागलें. आणि ती आनंदीत वृत्तीनें डिमेट्रियस यांजकडे पाहूं

लागली. डिमेट्रियस हा हेलेनेला जीं प्रेमयुक्त भाषणें बोलत होता तीं अजूनही तशींच चालू होतीं. कारण आतां त्याचें प्रेम तिजवर बरेच अंशीं स्थिर झालें होतें असें ह्मणावयास चिंता नाहीं.

या प्रमाणें एकंदर स्थिती पालटून गेली असून रात्रभर धावाधाव करणाऱ्या त्या दोघी सुंदरी ह्मणजे हर्मिया व हेलेना या पुन्हा पूर्ववत् मैत्रिणी झाल्या. परस्परांविषयींची मत्सरबुद्धि त्यांच्या मनांतून समूळ नष्ट झाली. व मोडून गेलेल्या मित्रत्वाचे वृक्षास ताजे अंकूर फुटले. तेणंकरून पूर्वी एकमेकींची निंदा करतांना उच्चारलेल्या शब्दांचा त्यांस आनंदाच्या भरांत लवकरच विसर पडला. मग पुढें काय करावयाचें या गोष्टीचा तीं सर्वजणें एकत्र जमून विचार करूं लागलीं. सर्वांनुमतें असें ठरलें कीं ज्या अर्थी डिमेट्रियस यानें हर्मियेविषयीं आपली मागणी सोडून देण्याचें कबूल केलें आहे त्याअर्थी त्यानेंच हर्मियेच्या बापाचें मन वळवून राजाकडून तिला झालेली देहान्त शिक्षा रद्द करून घ्यावी. पुढें कांहीं स्वतःचे कामासाठीं ह्मणून डिमेट्रियस शहराकडे चालला होता तों वाटेंतच त्याला हर्मियेचा बाप इजियस भेटला. तो तरी जंगलांत पळून गेलेल्या आपल्या मुलीच्या शोधासाठींच चालला होता. त्याला थांबवून डिमेट्रियस यानें वर सांगितल्याप्रमाणें आपापसांतील झालेल्या समजीची हकिगत सांगितली.

मग डिमेट्रियस हा आपण होऊनच जर हर्मियेशीं लग्न करित नाहीं ह्मणून ह्मणत जर आहे तर आपणही त्याला त्या भरीस घालूं नये, असें इजियस यानें मनांत आणलें व लायझॅन्डर यालाही प्रतिकूळ व्हायचें नाहीं असें ठरलें. व त्या दोघांचें लग्न त्यादिवसापासून चवथे दिवशीं ह्मणजे ज्या दिवशीं हर्मियेला देहान्त शिक्षा भोगावयाची होती त्याच दिवशीं लावून देण्याचा त्यानें बेत केला; आणि त्याच दिवशीं हेलेनेचेंही डिमेट्रियस याशींच लग्न व्हायचें ठरलें. कारण इतःपर डिमेट्रियस याच्या प्रेमाच्या खरेपणाविषयीं व स्थिरपणाविषयीं हेलेनेला बिलकूल शंका राहिली नाहीं.

ह्या प्रेमी जनांच्या प्रेमाचा हा चमत्कार पिशाचाचा राजा व राणी हीं दोघेंही अदृश्य रूपानें पाहत होतीं. व त्याची परस्परांमध्यें कशी समजी झाली व कसकशीं भाषणें झालीं तीं चित्त देऊन ऐकत होतीं. एकंदरीनें या प्रेमीजनांच्या प्रेमकथेचा शेवट गोड झाला हें पाहून त्यांना पराकाष्ठेची खुशाली झाली व तिच्या भरांत चोहोंकडे ख्यालीखुशालीचा मोहोत्सव करून सोडण्याचा त्यांनीं निश्चय केला.

वाचकहो! ही गोष्ट येथें संपली. येथें पिशाचांनीं ह्मणून केलेल्या ज्या गोष्टी वर्णिल्या आहेत त्यावाचून किंवा ऐकून कित्येकास त्या खोट्या वाटतील, आणि ते हंसून ह्मणतील कीं ह्या निव्वळ गप्पा

होत, कांहींतरी मौजेखातर हें लिहिलें आहे. त्यांस आमचें एवढेंच सांगणे आहे, कीं त्यांनीं पाहिजे तर आपण ही गोष्ट वाचतांना झोपेंत आहों व आपण ज्या ज्या हकिगती वाचिल्या त्या त्या आपण स्वप्नांत पाहिल्या असें मानावें ह्मणजे त्यांची समजूत पडेल असें वाटतें व ते स्मितवदन करून आश्चर्यानें ह्मणतील कीं खरेंच मधुमासांत मध्यरात्रीला पडलेलें हें स्वप्न फारच मनोवेधक व आश्चर्यकारक आहे, यांत शंका नाहीं.



**थिसियर**---प्रिये! तुझ्याशीं मी जें आतां लग्न करणार आहें तें थाटामाटाचेंच होईल, व चोहोंकडे मोठा उत्सव होईल.

मधु. स्वप्नदर्शन अं. १ प्र. १

The Bombay Art Printing Works, Fort.

# मधुयामिनी-स्वप्नदर्शन.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

**स्थळ**—अथेन्स नगर—थीसियस राजाचा राजवाडा.

( थीसियस, हिपोलायटा, क्रुडाध्यक्ष व इतर
नोकर प्रवेश करतात. )

**थीसियस**—हे सुंदरी, आतां काय ?—आपल्या लग्नाची वेळ अगदीं जवळ आली; आणखी चार आनंदाचे दिवस गेले कीं शुक्ल प्रतिपदेचा चंद्र उगवेल. पण काय करावेंगे ! हा क्षीण चंद्र लवकर लवकर नाहींसा होत जात नाहीं. मला तर वाटतें, सावत्र आईसारखीच किंवा म्हातारी झालेल्या खऱ्या आईसारखी याची तऱ्हा दिसते; ती जशी क्षीण होऊन मरत पडली, म्हणजे चैन करण्याची तिच्या मुलाची इच्छा लांबणीवर पडत जाते व लवकर सफल

होण्याचीही आशा नसते, तशी माझी इच्छा हीं, हा क्षीण चंद्र नष्ट झाला नाहीं, तोंपर्यंत सिद्धीला जाण्याचा संभव नाहीं.

**हिपोलायटा**—अं:, चार दिवस काय तेव्हांच निघून जातील; आणखी चार रात्रीं देखील स्वप्नासारख्या चटकन निघून जातील; आणखी मग आकाशांत रुपेरी धनुष्यासारखा प्रतिपदेचा चंद्र उगवेल, आणि आपल्या लग्नसमारंभाची रात्र त्याला पहायला सांपडेल.

**थीसियस**—( क्रीडाध्यक्ष याजकडे वळून ) तूं जा, आणखी या अथेन्स नगरींतील दरोबस्त तरुण मनुष्य आनंदोत्सव करितील अशी व्यवस्था ठेव. त्यांच्या आनंदाच्या उल्लसित वृत्तीला जागृत कर, व उद्विग्नतेला जाळून टाक; कारण अशा आनंदाच्या वेळीं निरुत्साह करून टाकणारी ती द्वाड उद्विग्नता आमच्या समोरही असतां कामा नये.

( क्रीडाध्यक्ष जातो. )

हे प्रिये, तुला आठवतेंना ? मीं तुझ्याशीं प्रेमाचें बोलणें सुरू केलें तें आधीं तरवारीचे जोरावरच सुरू केलें; आणखी पुढेंही तुझें प्रेम संपादन केलें, त्यांतही मी तुला अनेक प्रकारें त्रास दिला. पण तुझ्याशीं मी जें आतां लग्न करणार आहें तें मात्र अगदीं निराळ्या तऱ्हेनें होईल; म्हणजे

तें थाटामाटाचेंच होईल; चोहोंकडे मोठा उत्सव होईल आणि तेव्हां खाद्यपेयाची रेलचेल करून जेवणावळींचा थाट उडेल.

( ईजियस, हर्मिया, लायझॅन्डर व डिमेट्रियस प्रवेश करितात. )

**ईजियस**—आमच्या महाविख्यात थीसियस महाराजांचें क्षेम असो !

**थीसियस**—शाबास, तुम्हीं आलां, बरें झालें; पण आपल्या इकडील सर्व कुशल आहेना ?

**ईजियस**—काय सांगावें, महाराज ? मी तर अगदीं त्रासून गेलों आहें. आणखी माझी मुलगी हर्मिया हिजविषयीं मी आपणाकडे फिर्याद आणिली आहे. ( डिमेट्रियस यास उद्देशून ) अहो गृहस्थ, असे महाराजांच्या पुढें या. प्रतापशाली महाराज, माझ्या मुलीशीं या गृहस्थाचें लग्न व्हावें अशी माझी इच्छा असल्यावरून मी ह्यास तशी परवानगी दिली आहे. ( लायझॅंडर याजकडे बोट करून) अहो, तुम्हीही इकडे या. दयावंत सरकार, या मनुष्यानें माझ्या मुलीला नादीं लावून, तिचें मन अगदीं मोहून टाकिलें आहे. कायरे, तूंचना तिला शृंगारिक कविता आणून दिल्यास ? आणखी आपल्या प्रेमाच्या खुणा म्हणून कांहीं वस्तु तूंचना माझ्या मुलीकडे पाठवून दिल्यास ? चांदण्यामध्यें तिच्या खिडकीपाशीं जाऊन तिचें

मन वेधण्यासाठीं मुद्दाम मोहक अशा आलापांनीं तिची स्तुति करणारीं व तिला गोड वाटणारीं सुस्वकर पद्यें तूंचना तिला गाऊन दाखविलींस ? आपल्या केसांचे दोरे व गंडे मनगटांत बांधावयाला तूंचना तिला दिलेस ? हें तर काय ?–पण आंगठ्या व इतर आवडीच्या वस्तु व मनाला मोह उत्पन्न करणारे हौशीचे तऱ्हेतऱ्हेचे क्षुल्लक पदार्थ, हार, गजरे, मेवामिठाई इत्यादि इत्यादि विलासाचे पदार्थ तूंचना तिच्याकडे पाठविलेस ? आणि या पोर-वयांत तिचें मन आपल्याकडे वळविण्याचें काम कांहीं धूर्त आणि तुझ्या विश्वासांतील माणसांकडे सोंपवून, तूं तिला आपलें इतकें वेड लावि-लेंस कीं ध्यानीं, मनीं, स्वप्नीं, तुझ्यावांचून तिला दुसरें कांहींएक दिसेनासें झालें. अशा अशा प्रकारें कपट करून, मायावीपणानें तूं माझ्या मुलीचें अंतःकरण हरण केलेंस; आणि माझी आज्ञा पाळणें हा तिचा धर्म असतांना, माझ्याशीं विरोध करणारें वर्तन करावयास तूं तिला लाविलेंस; आणि तिच्या मनांत भलतेंच कांहीं तरी भरवून देऊन, तूं तिला हट्टी व निष्ठुर बनविलीस. कृपावंत सरकार, मी म्हणतों तें खरें कीं खोटें हें आप-णच पहा. तूं याशीं लग्न करतेस का म्हणून तिला विचारलें असतां, करीत नाहीं म्हणून साफ उत्तर देईल. मी म्हणतों तें खरें नसतें तर ती असें उत्तर कधीं

देतीना. म्हणून मी म्हणतों, सरकार, ती जर माझी आहे तर—येथील पुरातन काळापासून चालत आलेला कायदाच असा आहे. त्यास अनुसरून म्हटलें म्हणजे—माझ्या मर्जीप्रमाणें तिला वागावयास लावण्याचा मला पूर्ण अधिकार आहे, हें मी आपल्याला नम्रपणें सांगतों. तेव्हां एक तर तिनें माझ्या मर्जीप्रमाणें या गृहस्थाशीं लग्न करावें; नाहीं तर, कायद्यांत सांगितलेली मरणाची शिक्षा भोगावयाला तरी तयार व्हावें.

**थीसियस**—कायग बाई हर्मिये, यावर तुझें काय म्हणणें आहे ? बाळे. नीट विचार कर. ज्यानें तुला येवढें सौंदर्य दिलें; इतकेंच काय—पण ज्याला तूं केवळ मेणाच्या बाहुलीप्रमाणें असून, तुझें सौंदर्य आहे तसेंच ठेवणें, किंवा तुला कुरुप करून टाकणें ह्या दोन्हीं गोष्टी ज्याच्या मर्जीवर अवलंबून आहेत त्या परमेश्वराप्रमाणें तूं आपल्या बापाला मानावेंस; नाहींका ? ( डिमेट्रियसकडे बोट करून ) हा खरोखरींच तुला योग्य असून, अगदीं शोभेसा आहे. खरोखर हा तुला कांहीं वाईट नाहीं.

**हर्मिया**—( लायझॅन्डर याजकडे बोट दाखवून ) हे देखील तसेच योग्य आहेत.

**थीसियस**—तो स्वतः तसा असेल; पण तुझ्याशीं लग्न करण्याच्या या बाबतींत ज्याअर्थी तुझ्या बापाची त्याला

अनुकूलता नाहीं, त्याअर्थी तो दुसरा गृहस्थच तुला अधिक अनुरूप आहे असें म्हटलें पाहिजे.

**हर्मिया**—माझ्या वडिलांना जर माझ्याच दृष्टीनें पाहतां आलें असतें तर किती चांगलें झालें असतें!

**थीसियस**—यापेक्षां मी असें म्हणतों कीं तुझ्या बापाच्या विचारी दृष्टीनेंच तुला पाहतां आलें पाहिजे; नव्हे का?

**हर्मिया**—महाराज, आपण कृपा करून मला क्षमा करावी. आपणासारख्या थोरामोठ्यापुढें येऊन माझ्या बाजूचें म्हणणें आपणास निवेदन करण्याचें धैर्य आज मला कोणी दिलें?—अशी धैर्य देणारी ही दिव्यशक्ति कोण हें माझें मलाच कळत नाहीं. त्याचप्रमाणें माझा हा धीटपणा माझ्या शालीनतेला कितपत शोभण्यासारखा आहे हेंही मला समजत नाहीं. पण महाराज, ( **डिमिट्रियस याजकडे** बोट दाखवून ) याजशीं लग्न करण्याचें जर मी नाहीं म्हटलें तर या अपराधाबद्दल मला कोणती कडक शिक्षा फर्मावण्यांत येईल हें मला कळेलका?

**थीसियस**—देहांत शिक्षा! ती नको असेल तर जन्मभर अविवाहित राहून पुरुषांचा सहवास कधींही करणार नाहीं अशी शपथ वहावी लागेल. म्हणून म्हणतों, मुली, हा हेकेखोरपणा सोड. नीट विचार कर. तूं तरुण आहेस ही

गोष्ट ध्यानांत आण. आपले मनोविकार कितपत प्रबळ आहेत, कितीसे तुला आवरतां येतील, तें तूंच पहा. बापाच्या इच्छेप्रमाणें वागण्याचें तूं जर नाकारिलेंस, तर भगवीं वस्त्रें परिधान करून जोगिणीप्रमाणें तुला काळ कंठावा लागेल! बोल, हें तुझ्यानें होईल का ? कारण, देवळांच्या आवारांतील वृक्षांच्या थंडगार छायेंत, कडकडीत ब्रम्हचर्यव्रतानें जोगिणीप्रमाणें राहून, निरपत्य स्थितींत, अत्यंत शीतल चंद्राच्या चांदण्यांत बसून, रात्रीच्या रात्रीं काढण्याची पाळी तुजवर येईल. सारांश, तुला आपला सारा जन्म अशा प्रकारें घालवावा लागेल. ज्या कोणी स्त्रिया आपल्या मनोविकारांना जिंकून, कौमार्याला धक्का न लागूं देतां, या तपश्चर्येचें असें खडतर व्रत पाळितात, त्या खरोखरीच धन्य होत. पण आरण्यामध्यें कोणाचा स्पर्श न होणाऱ्या अशा कांटेरी झाडांवर उत्पन्न झालेल्या व फुलल्यावरही कोणाचा हात न लागतां एकटेंच कोमेजून नाश पावलेल्या सुगंधी फुलाचें तें कसलें भाग्य! मी म्हणतों कीं खचित, सुगंधानें मनुष्यलोकाला आनंदित करणाऱ्या फुलांचेंच भाग्य अधिक समजलें पाहिजे.

**हर्मिया**—तर मग, एकच सांगतें कीं जो पुरुष मला आवडत नाहीं त्याचें स्वामित्व पत्करून आपल्या कुमारीपणाच्या हक्कावर पाणी सोडण्यास मी तयार नाहीं. अरण्यांत कोमेजून नाश पावणाऱ्या गुलाबाबरोबर, गुलाबाप्रमाणें, तशाच

स्थितींत वाढेन कांहीं दिवस जिवंत राहीन व शेवटीं कोमेजून मरून जाईन.

**थीसियस**—पण मी म्हणतों, थोडे दिवस थांबून, या गोष्टीचा अधिक विचार केलास तर बरें नाहींका ? माझ्या प्रियेचा आणि माझा शरीरसंबंध जोडून जन्माची गांठ मारण्याचा योग येत्या शुक्लप्रतिपदेला येणार आहे; त्याच दिवशीं तुझा काय विचार ठरतो तो कळव; म्हणजे बापाच्या आज्ञेचें उल्लंघन केल्यावरून मरायला तरी तयार हो; किंवा त्याच्या इच्छेप्रमाणें वागून, तो म्हणतो त्या पुरुषाशीं लग्न करायचें तरी कबूल कर; नाहीं तर सदोदित कडकडीत ब्रम्हचर्यव्रतानें वागून अविवाहित स्थितीमध्येंच सर्व जन्म कंठण्याची शपथ घे.

**डिमेट्रियस**—हे कोमलांगी, हर्मिये, मजवर दया कर; ( लायसँन्डर याजकडे वळून ) अरे गृहस्था, ह्या सुंदरीवर जो हक्क मला प्राप्त झाला आहे, तो न्यायानेंच प्राप्त झाला आहे, आणि त्याजविषयीं आतां कांहीं शंका उरली नाहीं. तर असें डोकें फिरवूं नको आणि आड रानांत शिरून, हिजवर जो हक्क सांगत आहेस तो बऱ्या बोलानें सोडून दे.

**लायसँन्डर**—( डिमेट्रियस यास उद्देशून ) अहो, हिच्या बापाचें प्रेम तुम्हांवर आहे आणि हिचें प्रेम मजवर जडलें

आहे; तर जडेना बापडें ? मी म्हणतों आतां तुम्हींच हिच्या बापाशीं लग्न करा म्हणजे झालें !

**ईजियस**—छीः छीः छीः ! काय बोलणें हें ! माझें त्याजवर प्रेम आहे हें कांहीं खोटें नाहीं, आणि म्हणून, जिच्यावर माझी सत्ता आहे ती वस्तु मी त्याला दिली आहे. आणि जी माझी आहे तीच मी याला अर्पण करितों.

**लायझॅन्डर**—महाराज, याच्याहून मी कमी कुलीन नाहीं किंवा कमी सधन नाहीं, आणि दैवही अनुकूल नाहीं असें नाहीं. मी श्रेष्ठ नसलों तरी ह्याच्या बरोबरीचाच मान मी उपभोगीत आहें. पण आत्मश्लाघेच्या ह्या पोकळ गप्पा हव्यात कशाला ? ह्या बाबतींत अत्यंत महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे ह्या लावण्यसंपन्न लीलावतीचें प्रेम कोणावर आहे ही होय; व तें मजवर जडलें आहे. असें जर आहे तर हिजवर माझा हक्क शाबीत करण्याची खटपट मी कां बरें करूं नये ? खरें सांगूं, महाराज ? मी यांच्या तोंडावर अगदीं प्रतिज्ञेनें सांगतों—याचें प्रेम त्या हेलेना नांवाच्या मुलीवर जडलें आहे, आणि ह्यानेंही तिचें मन अगदीं वश करून टाकिलें आहे. आणि ती चारुगात्री, विचारी, अत्यंत मनोभावानें व पूज्यबुद्धीनें या अधम, नीच, व आस्थिर मनाच्या माणसाला प्रत्यक्ष परमेश्वर मानून आणि ह्याच्या प्रेमाचा अभिलाष धरून याला भजत आहे.

**थीसियस**—हो हो, ही गोष्ट माझ्याही कानावर आली आहे. आणि या संबंधानें याजपाशीं बोलल्याचेंही मला आठवतें. पण कामकाजाच्या गर्दीत ही गोष्ट माझ्या स्मरणांतून नाहींशी झाली. बरें तें असो. अहो डिमेट्रियस तुम्ही आणि ईजियस तुम्ही—दोघेही मजबरोबर अंमळ चला पाहूं. माझ्या मनांतून तुम्हांला दोघांनाही एकांतांत दोन उपदेशाच्या गोष्टी सांगावयाच्या आहेत. बाई हर्मिये, तूंही आपल्या बापाच्या मर्जीप्रमाणें वागावयाचें म्हणून मनाचा निश्चय कर. नाहीं तर अथेन्स नगरच्या कायद्या-अन्वयें—या कायद्याचा कडकपणा आम्हांला कोणत्याही कारणानें कमी करितां येणार नाहीं; समजलीस ?—एक तर तुला मरणाची शिक्षा भोगली पाहिजे किंवा आजन्म कौमार्यावस्थेंत राहण्याची शपथ तरी घेतली पाहिजे.—( हिपोलायटा हिजकडे वळून ) प्रिये, तुला कांहीं त्रास तर होत नाहींना.—अहो डिमेट्रियस—अहो ईजियस, तुम्ही दोघेही मजबरोबर चला. माझ्या मनांतून आमच्या लग्नाच्या तयारीचें कांहीं काम तुम्हांला सांगावें असें म्हणतों. आणि कांहीं एका गोष्टीबद्दल तुमच्याशीं मला बोलावयाचें आहे. आणि त्या गोष्टींत तुमचाच संबंध आहे.

**ईजियस**—फार उत्तम! महाराज, हें आमचें कर्तव्यच आहे.

आपली सल्लामसलत काय मिळते ती ऐकण्याला आम्ही फार उत्सुक आहों.

( हर्मिया व लायझॅन्डर शिवाय सर्वजण जातात. )

**लायझॅन्डर**—कां प्रिये, तुझे गाल इतके फिक्कट कां बरें दिसतात? येथले हे गुलाब इतक्या लवकर कां बरें कोमेजून गेले?

**हर्मिया**—मला वाटतें, त्यांना पाणी मिळालें नसेल! पण माझ्या डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रूंच्या प्रवाहानें त्यांना हवें तितकें पाणी मिळत नाहींका?

**लायझॅन्डर**—अरे रे! आजपर्यंत जें कांहीं मी वाचलें आहे, किंवा इतिहास, दंतकथा, गोष्टी वगैरे ज्या कांहीं माझ्या ऐकण्यांत आल्या आहेत, त्यांवरून माझी तर अशी समजूत झाली आहे कीं खऱ्या प्रेमाच्या मार्गांत किती तरी अडथळे असतात; केव्हां केव्हां पहावें तों एक पक्ष उंच कुळांतला तर दुसरा पक्ष हीन कुळांतला!

**हर्मिया**—हायरे देवा! प्रेमासाठीं श्रेष्ठ माणसांना हलकेपणा पत्करण्याची पाळी यावीना!

**लायझॅन्डर**—किंवा जुनाट झाडावर दुसऱ्या झाडाचें कलम करावें त्याप्रमाणें दोहों पक्षांच्या वयामध्यें केव्हां केव्हां अतिशय अंतर असतें.

**हर्मिया**—हायहाय ! एखाद्या म्हाताऱ्याशीं तरुणीचा संबंध घडावा हें तरी केवढें दुर्दैव !

**लायझॅन्डर**—तसाच प्रेमसंबंध इष्टमित्रांवर अवलंबून राहावा हें तरी केवढें—

**हर्मिया**—हायरे देवा ! दुसऱ्यांच्या दृष्टीनें कोणालाही प्रिय वस्तूची निवड करण्याची पाळी यावी काय—

**लायझॅन्डर**—बरें, आपण एवढी आवडीनें केलेली निवड चांगली ठरली व कल्याणकारकशी वाटूं लागली, तर लढाई, मरण, व्याधी अशीं कांहीं विघ्नेंच उत्पन्न व्हावीं, मग निमिषमात्र टिकणाऱ्या ध्वनीप्रमाणें, अतिशय अस्थिर अभ्रांच्या सावलीप्रमाणें व अत्यंत क्षणिक स्वप्नाप्रमाणें ही सारी खटपट लयास गेली असें होत नाहीं काय ? एकंदरीनें पाहतां, काळ्याकुट्ट मेघांनीं भरून गेलेल्या आकाशांत अत्यंत चंचलतेनें चमकणाऱ्या व केवळ चकचकाटानें अंतरिक्षाचें व पृथ्वीचें स्वरूप व्यक्त करून, ‘ ती पहा ’ असें मनुष्याला म्हणण्याचाही अवकाश न मिळूं देणाऱ्या विद्युल्लतेला गाढ अंधकार ज्याप्रमाणें आपल्या ‘ आ ’ केलेल्या भयंकर मुखांत गट्ट करून टाकतो त्याप्रमाणें चांगल्या वस्तूलाही हा काळ गट्ट करून नामशेष करून टाकतो !

**हर्मिया**—मग, ज्यांच्या मनांत खरें प्रेम असतें. त्या माणसांवर नेहमीं संकटेंच यावयाचीं हा आपला परमे-

श्वराच्या घरचा नियमच आहे असें म्हणावें ! ह्यासाठीं मी म्हणतों, कष्ट सोसण्याची संवयच आपण केली पाहिजे. कारण विचार करीत बसणें, कल्पनातरंगांत निमग्न होणें, दुःखानें निःश्वास टाकणें व आशेनें फिरून उमेद धरणें, ह्या गोष्टी जशा प्रेमाच्या आनुषंगिक होत, अर्थात त्यांची प्रेमाशीं नेहमीं जोड आढळते तशीच कष्टांचीही प्रेमाशीं नेहमीं जोड आढळते.

**लायझॅन्डर**—खरोखर तूं हें बरोबर बोललीस, हर्मिये ! तर तुला आतां मी काय सांगतों तें ऐक. माझी एक मावशी आहे, ती विधवा आहे. तिच्या मालकीचें असें बरेंच मोठें उत्पन्न असून, तिला मूलबाळ वगैरे कांहींएक नाहीं. ती अथेन्स नगरापासून सात कोसांवर राहते. ती मला आपला मुलगाच समजते. यासाठीं, मी म्हणतों, तिच्या येथें जाऊन आपण लग्न करूं या. माझा तर असा विचार आहे. आणि अथेन्स नगरांतील कडक कायद्याचा अंमल त्या ठिकाणीं चालत नाहीं. तुझें जर माझ्यावर खरोखर प्रेम असलें, तर उद्यां रात्रीं आपल्या बापाच्या घरून निघून ये; आणि शहराबाहेर एक कोसभर गेलीस म्हणजे अरण्य लागेल, त्यांत मागें एकदां मधुमासांत एके दिवशीं सकाळींच मी कांहीं साधन करण्याकरितां म्हणून गेलों असतां, ज्या ठिकाणीं तुझी व हेलेनेची गांठ पडली होती, त्याच ठिकाणीं तूं ये. तेथें मी तुझी वाट पाहतों.

**हर्मिया**—प्रियकरा, मी पाहिजे तर मदनाच्या अत्यंत प्रतापी धनुष्याची शपथ वाहतें. आणि सोनेरी टोंक असलेल्या त्याच्या त्या उत्तम बाणाची मी शपथ वाहतें. आणि त्याच्या त्या रतीच्या निरुपद्रवी कपोतांची मी शपथ घेतें. आणि ज्या दिव्यशक्तीच्या योगानें प्रेमीजनांचे प्राण एकरूप होतात, व जी त्यांचें प्रेम नेहमीं वृद्धिंगत करीत असते, त्या दिव्यशक्तीला स्मरून, आणि कार्थेज येथील प्रख्यात डिडो राणीनें आपला प्रियकर आपणास सोडून गेलेला पाहून, सर्वांसमक्ष अग्निभक्षण केलें, त्या प्रखर अग्नीचें स्मरण करून देखील, मी पाहिजे तरी शपथ वाहतें; फार तर काय, पण आपल्या प्रेमाच्या सत्यतेबद्दल बायकांहून पुरुषच ज्या पुष्कळशा शपथा वाहतात, व त्यापुढें मोडितात, त्या सर्व गोष्टींची आठवण मनांत आणून, तुम्ही म्हणाला त्या ठिकाणीं बिनदिक्कत मी येतें. हें घ्या पाहिजे तरी माझें वचन.

**लायझॅन्डर**—प्रिये, आपलें हें वचन पाळ म्हणजे झालें. ती पाहिलीसका हेलेना इकडे येत आहे.

( हेलेना प्रवेश कारते. )

**हर्मिया**—अग सुंदर हेलेने, परमेश्वराची तुजवर कृपा आहे.

तुझे हेतु पूर्ण होतील. पण तूं निघालीस कोणीकडे हें तर आधीं सांगशील ?

**हेलेना**—तूं मला सुंदर म्हणतेस? अग तूं उच्चारिलेला तो 'सुंदर' शब्द आपला परत घे. सुंदरी, डिमेट्रियसला तुझें सौंदर्य आवडतें, तेव्हां तूंच खरी भाग्यवान सुंदरी आहेस! तुझे डोळे ध्रुवाच्या चांदिणीप्रमाणें आहेत. पारिजातकाचे झाडावर कळ्या उमलूं लागल्या आणि गव्हांचीं कणसें पिकूं लागलीं म्हणजे भारद्वाज पक्षी गाऊं लागतो, तेव्हां त्याचें गाणें ऐकून मेषपालाला जो आनंद होतो तो कांहींच नाहीं; त्याहून तुझें बोलणें मधुर आहे तें ऐकून डिमेट्रियसला किती तरी पुष्कळ आनंद होतो. कांहीं रोग जसे स्पर्शजन्य असतात तशी कृपा जर स्पर्शजन्य असती तर, हे सुंदर हर्मिये, तुझ्या स्पर्शानें मला ती प्राप्त करून घेतां आली असती! मग माझे कान तुझा गोड स्वर गृहण करते. माझी दृष्टी तुझ्या डोळ्यांचें तेज स्वीकारती, आणि माझी जिव्हा तुझ्या भाषणाचें माधुर्य स्वीकारती! मग हे तुझे गुण मला प्राप्त झाले असते, आणि ते प्राप्त करून घेऊनच मी येथून गेलें असतें. फार काय सांगूं? मला जर तुझ्यासारखें होतां येईल तर माझ्या डिमेट्रियसाखेरीज हें सर्व जग मी तुला देऊन टाकलें असतें. तूं कशी दिसतेस, कशी पाहतेस, हें मला शिकविशील का? आणखी, डिमेट्रियसाच्या अंतःकरणावर

जिच्या योगानें तुला आपली सत्ता चालवितां येते ती अशी कोणती कला तुझ्यापाशीं आहे हें मला सांगशीलका ?

**हर्मिया**—अग, कला कसली? माझ्या तर बाई त्याला पाहतांच कपाळाला आंठ्या पडतात, व मला भारी संताप येतो. तरी तो म्हणतो, तुजवर माझें भारी प्रेम आहे. ह्याला मी काय करूं ?

**हेलेना**—अग, त्याचें असें प्रेम जर मला प्राप्त होईल, तर किती बरें होईल ! मग, त्याच्या किती जरी विनवण्या, आराधना व प्रार्थना मला कराव्या लागल्या तरी मी त्या आनंदानें करीन.

**हर्मिया**—काय करूंग बाई ! जसजसा मी त्याला झिडकारितें तसतसा तो अधिकच माझ्या मागोमाग येतो.

**हेलेना**—आणखी जसजसें मी त्याच्यावर अधिक प्रेम करितें तसतसा तो माझा अधिकच द्वेष करितो.

**हर्मिया**—बाई हेलेने, त्याच्या ठिकाणीं असलेला हा मूर्खपणा कांहीं माझा दोष नव्हे.

**हेलेना**—तुझा एक नसेल, पण तुझ्या सौंदर्याचा तर आहेना; अहाहा! हांच दोष जर माझ्या ठिकाणीं असता तर किती बरें झालें असतें !

**हर्मिया**—थांब, अम्मळ धीर धर; तूं कांहीं काळजी करूं नको. यापुढें त्याला माझें तोंड देखील पहावयाला

सांपडायचें नाहीं. कारण, येथून मुळीं पळून जावें असा माझा व माझ्या प्रियकराचा बेत झाला आहे. माझा प्रियकर माझ्या दृष्टीस पडला नव्हता तोंवर हें अथेन्स नगर म्हणजे केवळ स्वर्गच मला वाटत होतें. मग बाई, माझ्या प्रेमांतच असा काय दोष असेल तो असो—मीं तें त्याला अर्पण करतांच, ह्या स्वर्गतुल्य नगराचा नरकलोक झाला व तें मला दृष्टीसमोर देखील नकोसें झालें !

**लायझॅन्डर**—हेलेना बाई, आम्ही आतां तुला आमच्या मनांतली गोष्ट सांगतों. उद्यांच रात्रीं, कुमुद्बांधव चंद्रमा जलाशयरूप आरशामध्यें आपलें रुप्यासारखें चकचकीत पांढरें स्वच्छ प्रतिबिंब पाहूं लागला, व गवतावर पडलेले दंवाचे बिंदु मौक्तिकांप्रमाणें चमकूं लागले, म्हणजे प्रेमीजनांचें गुप्तपणानें पळून जाणें उघडकीला येत नसल्यामुळें, त्याच वेळीं, अथेन्स नगराच्या वेशीच्या दरवाज्यावाटे, कोणालाही न कळतां, पळून जाण्याचा आमचा विचार ठरला आहे.

**हर्मिया**—आणखी ऐकलेंस, हेलेना बाई ? तीं कांहीं तांबूस व कांहीं पांढुरकीं अशीं फिक्कट रंगाचीं प्रिमरोज फुलें फुलून जेथें गालिचाप्रमाणें पसरलीं असतात, तें ठिकाण तुझ्या लक्षांत आहेना ? तेथें आपण दोघीजणीही किती तरी वेळां आनंदानें लोळून यथेच्छ विहार करीत

असूं हें ठिकाण तुला आठवतेंना ?----त्याच ठिकाणीं माझी व माझ्या प्रियकराची भेट व्हावी असें ठरलें आहे. आणि मग तेथून अथेन्स नगराला रामराम करून, नव्या नव्या मित्रांचा व अगदीं अनोळखी मंडळींचा सहवास पत्करून, देशांतराला निघून जाणार आहों. बरें, तर सखे, मी येतें. तूं आतां ईश्वरापाशीं आमचें अभीष्ट चिंतन कर, एवढेंच तुजपाशीं माझें मागणें आहे. तुझ्या सुदैवानें तुझा डिमेट्रियस तुला मिळो ! ( लायझॅन्डर याजकडे वळून ) प्रियकरा, तुम्ही मात्र आपलें वचन नीट पाळा बरें; अनंग-तप्त होत्सात्या प्रेमीजनांच्या नेत्रांना जें केवळ सुग्रास भोजनाप्रमाणें वाटतें, तें एकमेकांचें दर्शन उद्यां मध्यरात्री-पर्यंत आपणास मिळण्यासारखें नसल्यामुळें, आपल्या डोळ्यांना क्षुधापीडितच ठेवणें भाग पडणार आहे.

**लायझॅन्डर**---होय प्रिये, मी आपलें वचन पाळीन बरें.

( हर्मिया जाते. )

बरें बाई हेलेने, येतो तर आतां. तूं जशी डिमेट्रियसासाठीं वेडी होऊन गेली आहेस, तसाच तोही पण तुझ्यासाठीं वेडा होईल बरें. ( जातो. )

**हेलेना** ---( निःश्वास टाकीत ) कांहीं लोकानांच इतरांहून फार सुखी कसें बाई होतां येतें हें कांहीं कळत नाहीं ! मी देखील तिच्या सारखीच सुंदर आहें असें या अथेन्स

नगरांतील सर्व लोक म्हणतात; पण त्याशीं काय करायचें आहे ? डिमेट्रियसला कोठें तसें वाटत आहे ? तो खेरीज करून, सर्व लोकांना जें चांगलें कळतें तें त्याला कांहीं कळत नाहीं. आणि हर्मियेच्या नेत्रकटाक्षांनीं तो तिला भाळून गेला आहे यांत जसा तो चुकला आहे, तशीच मीही माझ्या प्रियकराच्या गुणांवर लुब्ध झालें यांत चुकलें आहें. केव्हां केव्हां यःकश्चित, क्षुद्र व ज्यांना कांहीं किंमत नाहीं अशा वस्तूंना देखील प्रेमामुळें सौंदर्य व महत्व प्राप्त होतें. प्रेम डोळ्यांनीं न पाहतां मनानें पहात असतें, आणि म्हणूनच असें प्रेम उत्पन्न करणाऱ्या मदनाचें जें चित्र काढतात त्यांत त्याला पंख लावतात; तसेंच तो आंधळा आहे असेंही दाखवितात. त्याचप्रमाणें प्रेमीजनांच्या मनाला विचार, विवेक, शहाणपण यांतून एका-चाही गंध नसतो. त्यांत त्याचे पंख आणि अंधत्व हीं चिन्हें उतावळेपणा व अविचार दर्शवीत असतात. प्रिय वस्तूची निवड करीत असतांना प्रेमाला नेहमीं भुरळ पडते. आणि म्हणूनच प्रेम उत्पन्न करणाऱ्या मदनाला बालस्वरूप मानतात. विक्षिप्त मुलें खेळतांना जशीं खोट्या शपथा वहातात, तसाच मदनही, जिकडे पहावें तिकडे, अगदीं खोट्या खोट्या अशा शपथांची रेलचेल करून सोडतो. कारण हेंच पहा ! माझ्या

प्रियकराला हर्मियेचे डोळे दिसले नव्हते तेव्हां मी फक्त तुझाच आहें असें मला सांगून त्यानें गारांच्या पावसाप्रमाणें शपथांचा कसा बाई तरी वर्षाव करून सोडला होता पण! आतां, हर्मियेच्या डोळ्यांच्या तेजाची ऊष्णता लागतांच त्या शपथांच्या गारा पार वितळून गेल्या!—ठीक आहे. हर्मिया पळून जाणार असें मी आतां जाऊन त्याला सांगतें; म्हणजे उद्यां रात्रीं तिचा पाठलाग करण्यासाठीं तो त्या अरण्यांत जाईल, आणखी ही बातमी मी दिली म्हणून तो माझ्यावर संतुष्ट होईल. पण ही रिकामी उठाठेव करण्यांत माझा फायदा तो काय? तरीपण जातां येतांना तो मला डोळे भरून पहावयाला तर सांपडेल? हें माझ्या खटपटींचें काय थोडें चीज झालें ह्मणावयाचें!

( जाते. )

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—अथेन्स नगर—क्विन्सच्या वाड्यांतील एक खोली.

( क्विन्स, स्नग, बॉटम, फ्ल्यूट स्नाउट आणि स्टार्व्हे-लिंग हे **प्रवेश** करितात. )

**क्विन्स**—कायरे, आपली सर्व मंडळी येथें आलीका?

**बॉटम**—सर्वांना तुम्हीं यादीबरहुकुम बोलावलें म्हणून बरें झालें; यांत चूक झाली नाहींना?

**क्विन्स**—मुळींच नाहीं येथील राजा व राणी यांचें ज्या रात्रीं लग्न महोत्सव व्हावयाचा आहे, त्याच रात्रीं, आपणाला जें नाटक करावयाचें आहे, त्यांत कामें करण्याला योग्य अशा दरोबस्त माणसांना बोलाविलें आहे.

**बॉटम**—काय हो क्विन्स साहेब, पहिल्यानें कोणता खेळ करणार, तें तर आम्हांला कृपा करून सांगाल कीं नाहीं? व नंतर नटांचीं नांवें सांगा; आणि एकदांचें आटोपतें घ्या.

**क्विन्स**—आमच्या खेळाचें नांव होय?—"अत्यंत शोककारक आनंदपर्यवसायी नाटक—पिरॅमसव थिस्बी यांचा नितांत निर्घृण मृत्यु!"

**बॉटम**—खरोखरीच, एकंदरीनें आपण खेळ तर मोठा उत्तम शोधून काढला आहे बोवा! आणखी तो सगळयांना मोठ्या मजेचा वाटणार हो! अहो क्विन्स साहेब, एकदां यादी वाचा पाहूं? नटांचीं नांवें तरी कोणकोणाचीं आहेत ऐकूंद्या. या, सर्व मंडळीहो, एक एक जण असे पुढें या.

**क्विन्स**—मी यादीप्रमाणें नांवें वांचतों; ज्यानें त्यानें उत्तर द्यावें. निक मॉट नामें कोष्टी.

**बॉटम**—तयार. मला कोणतें काम करावयाचें तें सांगा व पुढें चालूंद्या.

**क्विन्स**—तुला पिरॅमसचें काम करावयाचें.

**बॉटम**--हो, पण हा पिरॅमस कोण ? एकाद्या स्त्रीवर प्रेम करणारा कोणी प्रेमी माणूस होता कीं कोणी जुलमी राजा होता ?

**क्विन्स**--तो एक प्रेम करणारा राजा होता. "मेली आपली प्रिया" असें समजतांच त्यानें मोठ्या शौर्यानें आत्महत्या केली.

**बॉटम**--खासें ! हें काम मनापासून केलें तर डोळ्यांतून पाणी निघालें पाहिजे; आणखी मी जर हें काम केलें तर असें करीन कीं प्रेक्षकांनीं आपापल्या डोळ्यांचीच साक्ष द्यावी, व डोळ्यांकडेच पहावें ! मी काय जिकडे तिकडे तुफान उसळून देईन ! मी तस थोडेंबहुत दुःख करीन म्हणा. बाकीच्यांना विचारा आतां. हो, पण माझ्या मुख्य आवडीचें काम म्हटलें तर जुलमी राजाचें. पेरिक्लिजचेंही काम मीं क्वचित् प्रसंगीं केलें आहे; नाहीं असें नाहीं. तसेंच कर्कश ओरडून सर्व ठिकाण दणाणून टाकण्याचें कामही मीं केलें आहे. कडाकड फुटणाऱ्या खडकांच्या, धडाधड बसणाऱ्या धक्क्यांच्या आवाजानें तुरुंगांच्या दरवाजांचीं कुलुपें तुटून पडतील, आणि सूर्याचा रथ दुरून चकाकत येईल; आणि अभागी माणसांना भाग्यवान करील. हें असलें मर्दानी, पहाडी आवाजानें बोलायचें भाषण मला फार आवडतें. पण कायहो, आतां बाकीच्या नटांची

नांवें वाचा पाहूं. हीं मीं म्हणून दाखविलेली भाषणाची तऱ्हा पेरिक्लीजच्या भूमिकेला किंवा जुलमी राजाच्या तोंडीं फार शोभण्यासारखी आहे. प्रेमी माणसाचें भाषण अतिशय सदयपणाचें आणखी प्रेमळपणाचें असलें पाहिजे.

**क्विन्स**—फ्रॅन्सिस् फ्ल्यूट नामें भाते नीट करणारा.

**फ्ल्यूट**—हजर.

**क्विन्स**—तुला 'थिस्बी'चें काम केलें पाहिजे.

**फ्ल्यूट**—अहो, ही थिस्बी कोण? कोणी भटकणारा सरदार-बिरदार कीं काय?

**क्विन्स**—अरे, या नाटकांतला तो पिरॅमस आहेना तो जिच्यावर प्रेम करितो तीच ही थिस्बी, त्याची बायको होती.

**फ्ल्यूट**—छे बोवा, आपल्याला तें बायकोचें काम देऊं नका. आतां मला दाढी बरीच फुटली आहे.

**क्विन्स**—कांहीं हरकत नाहीं. तुला बायकोचा मुखवटा घालून काम करायचें आहे. आणखी बायकांसारखें बोलायचें आहे म्हणून तुला बोलतां येईल तितक्या बारीक आवाजानें, हळूं बोल म्हणजे झालें.

**बॉटम**—खरेंच मला मुखवट्यानें आपलें तोंड लपवितां येईल;

आणखी मी थिस्बीचें काम करीन; आणखी मी अगदीं भयंकर असा बारीक आवाजानें " थिसने, थिसने, अरे माझ्या प्रियकरा पिरॅमस, मी तुझी आवडती प्रिया थिस्बीना ? आणि तुझी आवडती बायको मीचना " असें म्हणेन.

**क्विन्स**—छे, तें कांहीं एक चालायचें नाहीं. तूं पिरॅमसचेंच काम केलें पाहिजेस. आणखी अरे ए फ्ल्यूट तूं थिस्बीचें काम.

**बॉटम**—बरें पुढें.

**क्विन्स**—रॉबिन स्टार्व्हेलिंग, नांवाचा शिंपी.

**स्टार्व्हेलिंग**—हजर.

**क्विन्स**—तूं थिस्बीच्या आईचें काम कर. समजलास ? टॉमस्नाउट, नामें मोडतोडीचा तांबट.

**टॉमस्नाउट**—हजर.

**क्विन्स**—तूं पिरॅमसचा बाप, आणि मी थिस्बीचा बाप; समजलानारे बोवानो, अरे ए सुतार, तूं सिंहाचें काम कर. मला वाटतें, नाटकाची बहुतेक जुळवाजुळव झालीच.

**स्नग**—सिंहाच्या भाषणाची तेवढी ती नक्कल आहेकां तुमच्यापाशीं लिहिलेली ? असली तर कृपाकरून ती तेवढी मला द्याल तर पहा; कारण नक्कल पाठ व्हावयाला मला फार वेळ लागतो.

**क्विन्स**--अरे ए मूर्खा, यांत पाठ करावयाचें तें काय आहे? तें तेथल्या तिथेंच तुला पाठ करतां येईल. कारण तुला फक्त मोठमोठ्यानें गुरगुरावयाचें आहे.

**बॉटम**—मला सिंहाचें सुद्धां काम करूं द्या बोवा. अहो, मी मोठमोठ्यानें ओरडेन. खचितच हें मी उत्तम करीन. आणखी तें असें करीन कीं माझें ओरडणें ऐकून प्रत्येक-जण खुष होईल. मी असा ओरडेन—असा ओरडेन कीं त्याला आणखी ओरडूं द्या—त्याला आणखी ओरडूं द्या असे उद्गार प्रत्यक्ष महाराजांच्या तोंडांतून काढीन.

**क्विन्स**—ठीक आहे. आणखी तूं तें अतिशय भयंकर रीतीनें कर बरें; इतकें कीं तुझें ओरडणें ऐकून राणीसाहेब व आणखी इतर बायका भिऊन किंकाळ्या फोडतील. आणखी आपणा सर्वांना फांसावर चढविण्याला येवढें कारण पुरे झालें नाहींका ?

**सर्व**--काय, तेवढ्यावरून आपल्याला फांशी देतील म्हणतां?

**बॉटम**—देतील म्हणजे ? मित्रांनो, मी तुम्हांला अगदीं खात्रीनें सांगतों कीं जर तुम्ही बायकांना घाबरवून सोडलें, तर त्या आपल्याला फांशी देवविल्या शिवाय कां राहतील? पण मी सांगतों—मी असाही आवाज काढीन कीं जसा कांहीं तो अगदीं दुध-पित्या खबुतराप्रमाणें सौम्य आहे असें सर्वांना वाटेल. फार काय सांगूं ?—मी असा ओर-

डेन कीं बुल्बुल पक्षीच गात आहे असेंच क्षणभर तुह्मांला वाटेल.

**क्विन्स**—छे छे. पिरॅमसवांचून दुसऱ्या कोणत्याही पात्राचें काम तुला करितां येणार नाहीं. कारण पिरॅमस देखणा पुरुष होता; उन्हाळ्याच्या दिवसांत नटून फिरायला निघालेला मनुष्य जसा दिसतो तसा तो दिसत होता. तो अतिशयच देखणा, एकाद्या सद्गृहस्थासारखा होता. तेव्हा तूंच पिरॅमसचें काम केलें पाहिजेस.

**बॉटम**—बरें, मी तें पत्करीन म्हणा. पण तें काम करितांना सर्वांत उत्तम म्हणजे कोणत्या तऱ्हेची दाढी लावूं ?

**क्विन्स**— कां बरें ?–तुला पाहिजे तसली.

**बॉटम**—हो हो ! कोणती कां असेना. आम्हांला चालेल. मी तुमच्या दाढी सारखी गवती रंगाची–तुमच्या सारखी नारिंगी, तुमच्या सारखी जांभळी, तुमच्या सारखी फ्रेंच क्राउन रंगाची किंवा तुमच्या सारखी अगदीं अस्सल पिंवळया रंगाची दाढी लावून काम करीन.

**क्विन्स**—तुमच्या त्या फ्रेंच क्राउन्स रंगाच्या कांहीं कांहीं दाढ्यांना मुळींच केंस नसतात; तेव्हां केंसावांचूनच तूं तें काम करणार कीं काय ? हं, घ्या घ्या आपापल्या कामांच्या नकला, आणि मी तुम्हांला अशी प्रार्थना करितों, विनंती करितों, मी अशी इच्छा प्रदर्शित करितों कीं उद्यां रात्रीं–

पर्यंत आपापलीं भाषणें चांगलीं पाठ करून ठेवा, आणि चांदणें पडल्यावर, शहराबाहेर एका मैलावर असलेल्या त्या राजवाड्या भोंवतालच्या बागेंत मला भेटा. तेथें आपण एकदां तालीम घेऊं; कारण आपण जर शहरांतच जमलों तर आपल्या मागोमाग येणारे लोक आपल्याला भंडावून सोडतील, आणखी आपल्या खेळाच्या खुब्या सर्वांना कळतील. मध्यंतरीं, आपल्या नाटकाला लागणाऱ्या वस्तूंची मी एक याद करितों. पण मेहेरबानी करून, मी सांगितलें त्याप्रमाणें करायाला चुकूं नका बरें.

**बॉटम**—होय, आम्ही त्या ठिकाणीं जमूं, आणखी चांदण्यांमध्यें धैर्यानें, न घाबरतां, तालीम घऊं. चांगली मेहनत घ्या आणखा उत्तम तयारी करा. यता तर आतां आम्ही बरें.

**क्विन्स**—महाराजसाहेबांच्या ओक झाडाखालीं आपण सर्वजण भेटूं.

**बॉटम**—काय वाटेल ते होवो, आपण त्या ठिकाणीं जमावयाचेंच. त्यांत चूक व्हावयाची नाहीं बरें !

(जातात.)



**ऑबेरान**—जो प्राणी पहिल्यानें पाहशील तोच आपला खरा प्रियकर म्हणून समज.

मधु. स्वप्नदर्शन अं. २ प्र. २

The Bombay Art Printing Works, Fort.

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—अथेन्स नगराजवळचें अरण्य.

( एके बाजूनें पक नांवाचें पिशाच्च व एके बाजूनें एक परी अशीं दोघें समोरासमोरून प्रवेश करितात.)

**पक**—कायग परी! कसें काय? कोणीकडे हिंडतेस?

**परी**—टेंकडीवर, दरींतून, झुडपांतून, बगीच्यांमधून, उपवनांमधून, नदीच्या पूरांतून, विस्तवांतून—मी सगळीकडे हिंडतें. चंद्रापेक्षांही माझी चालण्याची गति अधिक जलद आहे. परी राणीच्या तैनातींत मी असतें; आणखी कुरणांमधून हिरव्या गवतांचे जे पुंज दिसतात त्यांना मी दवांचे कण देत असते. उंच उंच काउस्लिप हे तिच्या पदरचे जुने नोकर आहेत. त्यांच्या अंगांतल्या पोषाखावर कांहीं ठिपके दिसतात. तीं पऱ्यांनीं त्यांना मेहेरबानी खातर नजर केलेलीं मौल्यवान माणकेंच होत. आणखी त्यांच्या अंगाला सुवासही पण चांगला आहे.—चला आपणाला इकडे तिकडे हिंडून दवाचे कांहीं बिंदू गोळा केले पाहिजेत आणि एक एक बिंदू प्रत्येक काउस्लिच्या कानांत मोत्या प्रमाणें लटकावून दिला पाहिजे. अरे ए मठ्ठ

भूता, मी आतां जातें. आमच्या राणी साहेब आपल्या लवाजम्यासह इतक्यांतच इकडे येतील.

**पक**—आज रात्रीं राजेसाहेबांच्या मेजवानीचा येथें थाट व्हावयाचा आहे; पण राणीला कांहीं त्याच्या दृष्टीस पडायचें नाहीं हें तुझ्या ध्यानांत आहेना ? कारण तिनें आजपर्यंत जीं सुंदर सुंदर मुलें मिळविलीं त्यांच्यांत तिनें एका हिंदी राजाच्या घरून चोरून आणलेला मुलगा फारच देखणा आहे. आणखी त्या मुलाला तिनें आपल्या तैनातींत ठेविलें असून, त्याच्या डोक्यांत ती नाना प्रकारचीं फुलें घालते, त्याला नटवते, सारांश तो मुलगा म्हणजे आपलें एक खेळणेंच तिनें करून ठेविलें आहे म्हणाना. परंतु आबेरान महाराजांची कांहीं वेगळी इच्छा आहे. त्यांच्या मनांतून त्याला आपला हुजऱ्या बनवून, आपल्याबरोबर रानावनांतून हिंडवावा असें होतें. पण राणीसाहेब त्या मुलाला नेहमी आपल्या भोवतीं भोवतीं बाळगतात; दूर करीत नाहींत. या गोष्टीचें आबेरान महाराजांना वैषम्य वाटून, त्यांच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला आहे; येवढेंच नाहीं तर ते तिच्यावर फार रागावलेही आहेत. आणखी झाडांच्या राईमध्यें, हिरव्या गवतावर, स्वच्छ झऱ्यावर किंवा पांढऱ्या शुभ्र चांदण्यांत त्यांच्या उभयतांच्या नेहमी गांठी पडावयाच्या त्या आतांशीं मुळींच पडत नाहींतशा

झाल्या आहेत. कधीं काळीं गांठ पडलीच, तर त्यांचें भांडण जुंपतें. मग त्यांच्याबरोबर असलेल्या भुतांवर भीतीनें ओक वृक्षाच्या फळाच्या कवचींत जाऊन बसण्याची पाळी येते.

**परी**—अरे वः ! तुझें स्वरूप आणखी आकृति पाहून मीं फसलें. मला वाटलें तूं भलताच कोणी आहेस. पण तो धूर्त आणखी कुचेष्टा करणारा रॉबिन गुड फेलो म्हणतात तो तर तूं नाहींसना ? खेडेगांवांतल्या मुलींना भिवविणारा, दुधावरील मलई खाणारा, कांहीं वेळ घिरटीं फिरविणारा, आणि घरांतल्या बायका ताक घुसळतां घुसळतां अगदीं दमून गेल्या तरी ताकावरील लोणी त्यांच्या हातीं न लागूं देणारा, आणखी कधीं कधीं दारूवर मुळींच साय न येऊं देणारा, रात्रींच्या वेळीं हिंडणाऱ्या माणसांना वाट चुकवून त्रास झालेला पाहून हंसणारा, आणि जे कोणी हाब गाबलिन किंवा फक्कड पक म्हणून हाका मारतात, आणि तुझ्या विनवण्या करितात त्यांजवर खुष होऊन त्यांचें पाहिजे तें काम करून देणारा व त्यांना दैव अनुकूल करून देणारा तोच ना तू ?

**पक**—हो, तूं म्हणतेस तें अगदीं खरें आहे. रात्रींच्या वेळीं मजेनें हिंडत जाणारा तो मीच बरें. आबेरान महाराजांची थट्टा करून मी त्यांना हांसवितों. आणखी तरण्या घोडी-

प्रमाणें खिंकाळून मी वाटाणे खाऊन माजलेल्या गलेलठ्ठ घोड्याला फसवून मी भलतीकडेच घेऊन जातों; आणखी कधीं कधीं तर प्रभु भोजनाचे वेळीं कोणी म्हातारी बाई तोंडानें उगाच बडबड करीत दारूचें गलास घेऊन पिण्याकरितां तोंडाशीं नेत आहे, तोंच मी सुंदरशा झुरळाचें रूप घेऊन आंत पडतों व तिच्या नाकावर उडी मारतों, व तिला आपल्या सुरकुतलेल्या गालफडावर झाडावयास लावतों. केव्हां केव्हां तर एखाद्या शहाण्यामावशीबाई आपली दुःखाची कहाणी सांगूं लागल्या म्हणजे मी तिवई आहें असें समजून माझ्यावर बसायला जातात, आणखी मी लागलींच तेथून निसटलों म्हणजे मावशीबाई कशा एकदम उताण्या पडतात व पडतां पडतां ' बाई बाईग पडलें ' असें म्हणून त्या ओरडत ओरडत मोठमोठ्यानें खोकूं लागतात. आणखी मग काय विचारतेस, तेथें असलेली सगळी मंडळी टाळ्या वाजवून ' खो खो ' करीत हसत राहतात. व हा त्यांचा आनंद वाढत जाऊन "इतक्या गमतींत आपला वेळ कधीं गेला नव्हता बोवा" असें ते म्हणतात. पण अग ए परी, चल, एका बाजूला हो. ते पहा आबेरान महाराजच इकडे आले.

**परी**—आणखी आमच्या राणीसाहेब देखील आल्या; त्या

पहा. ते जर या वेळेला येथून जातील तर बाई बरें होईल.

( एका बाजूनें आबेरान महाराज व दुसऱ्या बाजूनें टिटॅनिया राणी आपापल्या परिवारासह प्रवेश करितात. )

**ऑबेरान**—अग टिटॅनिये ! तूं किती तरी गर्विष्ठ आहेस. या चांदण्या रात्रीं तुझी गांठ पडली हें कांहीं बरें झालें नाहीं.

**टिटॅनिया**—आपण तरी कमी मत्सरी आहां कीं काय ? काय म्हटलें आपण ? पऱ्यानों ! चलाग बायानों, आपण येथून निघून जाऊं कशा ! त्यांच्या सहवासाला रहायचें नाहीं, किंवा त्यांच्याशीं कोणताही संबंध ठेवायचा नाहीं अशी मी शपथ वाहिली आहे.

**ऑबेरान**—अग, अविचारी जारिणी, थांबेनास कां जरा ? मी तुझा स्वामी नाहीं का ?

**टिटॅनिया**—तर मग मी तुमची स्वामिनी आहें का ? तुम्ही वनांतून एकाएकी नाहींसे झालां; व धनगराचें सोंग घेऊन बरूची मुरली करून साऱ्या दिवसभर त्या विलासी फिलिडेला शृंगारिक गाणीं वाजवून दाखवीत बसलां होतां हें मला ठाऊक नाहीं कीं काय ? ( ऑबेरान नाहीं नाहीं ह्मणून मान हालवीत असतां ) मग हिंदुस्थानचीं तीं लांबचीं सुंदर अरण्यें सोडून तुम्ही

जे यावेळीं इकडे आलां ते काय म्हणून ? हो, पण समजलें, तुमच्या त्या दांडग्या, संग्रामप्रिय, आवडत्या शूर बाईचें लग्न थीसियस राजाशीं तुम्ही लावून देणार आहां, नाहीं का ? आणखी त्यांचा हा संबंध आनंदप्रद होऊन त्यांची भरभराट व्हावी असाही आशिर्वाद देण्याचा तुमचा विचार आहे. नाहीं का ?

**ओबेर**।—हो हो ! त्या थीसियसवरही तुझें मन गेलें आहे हें मला माहीत नाहीं कीं काय ? असें असूनही थीसियसाच्या नवरीशीं माझा तसाच कांहीं संबंध असेल, असा मजवर आळ घ्यायला तुला लाज कशी वाटत नाहीं ? अग, रात्रीच्यावेळीं मसणीपुढून तूंच नाहींका त्याला फुसलावून आणिलास ? आणखी ती सुंदर ती मैना ती चिमणी यांच्यापाशीं त्यानें वाहिलेल्या शपथा मोडायाला तूंच नाहींका त्याला लाविलेंस ?

**टिटॅनिर**।—हं ! हं ! हं ! हें काय बोलणें ? मत्सरबुद्धीनें ह्या कांहीं तरी खोट्या नाट्या गोष्टी सांगून मला दोष लावण्याची तुमची ही सारी खटपट आहे; मी समजलें. पण मुळीं मधुमध्य काळ सुरू झाल्यापासून आम्ही कोठें गेलों आहोंका तरी ? खरें म्हणाल तर टेंकड्यांवर, दऱ्या खोऱ्यांत, रानावनांत, पांढऱ्या शुभ्रगार गोट्यांनीं ज्याचें पाणी स्वच्छ दिसतें अशा झऱ्यावर, खळखळ वाह-

णाऱ्या ओहोळांवर किंवा समुद्राच्या किनाऱ्यावर वारा सूं असा गोड शब्द काढीत असतांना, आम्ही फेर धरून नाचावयाला कधीं जमलोंच नाहीं; कारण त्या ठिकाणीं तुम्ही अवचित येऊन आमच्या क्रीडेचा व आनंदाचा विरस करतां. आणि म्हणूनच वारा गोड शब्द करीत असूनही आम्ही नाचणें अगदीं सोडलें! फार काय सांगावें? यामुळेंच वाऱ्यालाही राग येऊन आमचा सूड घेण्याकरितांच कीं काय—त्यानें सरदी उत्पन्न करणारें असें रोगट धुकें समुद्रांतून शोषून घेतलें; व त्याचा पाऊस जमिनीवर पाडून दरोबस्त नद्यांना पूर आणला व तेणेंकरून त्या इतक्या कांहीं उन्मत्तपणानें वाहूं लागल्या कीं त्यांचे कांठ वाहून गेले, नांगर ओढण्यांत बैलांनीं केलेली मेहनत फुकट गेली, शेतकऱ्यांनीं व नांगऱ्यांनीं घामाघूम होईपर्यंत केलेले काबाडकष्ट निरर्थक झाले, धान्याचीं कणसें येण्यापूर्वीं पिकें हिरवीं गार असतानांच, तीं कुजून गेलीं, शेतें पाण्यांत बुडून गेल्यामुळें त्यांत बसविलेलीं बकरीं व मेंढरें सर्दी होऊन रोगानें पछाडलीं गेल्यामुळें त्यांच्या मांसावर गलेलठ्ठ झालेले कावळे मजेनें इकडे तिकडे भराऱ्या मारूं लागले; खेळ खेळण्यासाठीं तयार केलेली जमीन चिखलानें भरून गेली; व इतर खेळ खेळण्यासाठींही गवत वाढविलेल्या जमिनीवर केलेल्या

खुणा पार बुजून गेल्या; या ठिकाणीं हिवाळ्यांतील सुखें उपभोगतां यावीं असें मर्त्य माणसांना वाटूं लागलें आहे. पण तसें होत नाहीं. रात्रींच्या वेळीं देवाचीं स्तोत्रें कोणी म्हणत नाहींत; व धार्मिक कृत्येंही वेळेवर होत नाहींत. यामुळें चंद्रमा रागावला आहे; आणि नद्यांच्या पुराच्या ठिकाणीं वगैरे त्याची सत्ता असल्यानें तो सर्व हवा सर्द करून टाकीत आहे. व त्या योगानें संधिवाताचे रोग पसरले आहेत. हवेंत असे फेरफार झाल्यामुळें ऋतूंचें मान बदलून गेलें आहे. वसंतऋतु, ग्रीष्मऋतु, फळें वगैरे उत्पन्न करणारा शरदृतु, कडक हिंवाळा, ह्या सर्वांचीं स्वरूपें बदललीं आहेत; आणि भलत्याच वेळीं फळांना वगैरे बहार फार आला असल्यामुळें कोणत्या ऋतूला कसें ओळखावें याची पंचाईत पडूं लागली आहे. ही जी संकटपरंपरा उत्पन्न झाली ती आपल्या ह्या भांडणामुळेंच झाली आहे; नाहीं का ? आपणच तिला उत्पन्न केलें असून, तिच्या मुळाशीं आपणच आहों; नाहीं का ?

**ऑबेरान**—तर मग हें तूं नाहींसें कर; हें तुझ्याच हातीं आहे. टिटॅनियेनें ऑबेरान याच्या मर्जीबाहेर कां जावें ? तुझ्यापाशीं असलेला तो लहान मुलगा देईनास का मला ? तो मी तुझ्याजवळ मागतों. माझ्या मनांत त्याला माझा हुजऱ्या करावें असें आहे.

**टिटॅनिया**—होय तर? आपण आपलें सगळें राज्य दिलें तरी देखील तो मुलगा तुह्मांला मिळणार नाहीं, मी खचित सांगून ठेवतें. त्या मुलाची आई माझ्या पंथाची उपासक होती, व हिंदुस्थानामधील गंधयुक्त हवेंत रात्रीच्या वेळीं माझ्याजवळ बसून तिनें माझ्याशीं पुष्कळ गुजगोष्टी केल्या आहेत. माझ्याबरोबर येऊन, किती वेळां तरी ती आणि मी, वरुणाचें आगमन झालें असतां, त्याच्या तेजानें चमकणाऱ्या पिंवळ्या रेतीवर आम्ही बसत असूं. आणि समुद्रांतून जहाजें चाललीं असतां, त्यांचीं शिडें स्वैरगतीनें वाहणाऱ्या वाऱ्यानें फुगून मोठीं होत, तीं पाहून कितीवेळां तरी आम्ही हंसून हंसून मौज करीत असूं. तिची चालण्याची ढब तरी बाई कशी सुंदर होती सांगूं? तिला पोहण्यासारखें चालून दाखावितां येत असे. व ती जाहजाप्रमाणें पोहून दाखवी—जसें अगदीं हुबेहुब जहाजच! जहाज जसें प्रवासाहून मौल्यवान पदार्थ घेऊन येतें, तशी ती पृथ्वीवर उतरून मला कांहीं बारिकसारिक वस्तु आणून देणार होती; तोंच, तीं मरणाधीन असल्यामुळें, मुलाच्या पायीं मेली. तिजसाठीं म्हणून ह्या तिच्या मुलाला मी वाढवीत आहें; व तिजकरितां म्हणूनच तो मुलगा मी आपल्या हातून जाऊं देणार नाहीं.

**ऑबेरान**—ह्या वनांत किती वेळ राहण्याचा तुझा विचार आहे?

**टिटॅनिया**--कदाचित्, थीसियस याचा लग्नसमारंभ होई तोंपर्यंत. तुमच्याही मनांतून जर आमच्याबरोबर नाच नाचवन दोन दिवस मजा मारावयाची असेल, व मेजवान्या झोडावयाच्या असतील, तर तुम्ही आमच्याबरोबर चलावें; तसें नसेल तर, मला न विचारितां, तुम्ही हवें तिकडे जावें मी तुमच्या आड येणार नाहीं. खुशाल तुम्ही आपल्या संचारस्थानाकडे जा.

**ऑबेरान**—तो मुलगा तेवढा मला दे, ह्मणजे मी तुझ्या-बरोबर येईन.

**टिटॅनिया**—तुह्मी आपलें राज्य दिलें तरी देखील कांहीं तसें होणार नाहीं. पऱ्यांनो, चला तर येथून! मी जर येथें जास्त वेळ राहिलें तर आमचें चांगलें खडा-जंगी भांडण मात्र होईल; दुसरें कांहीं नाहीं.

( टिटॅनिया आपल्या अनुचरींसह जाते. )

**ऑबेरान**—ठीक आहे, जा, तुला हवी तिकडे तूं जा. पण मला तूं जो हा त्रास दिलास त्याबद्दल छळल्या-वांचून या झाडींतून मात्र मी तुला जाऊं देणार नाहीं. अरे पक, अंमळ इकडे ये पाहूं. तुला आठवतें कारे? मागें एकदां मी एका भूशिरावर बसलों होतों; आणखी त्यावेळीं एक जलस्त्री माशाच्या पाठीवर बसून, अशा कांहीं सुस्वर व मधुर आवजानें गात होती कीं, समुद्र

आतिशय खवळून गेला होता तरी तो तिचें गाणें ऐकून शांत झाला. आणखी कांहीं तारे देखील त्या गाण्याला लुब्ध होऊन आपापलीं स्थानें सोडून खालीं आले.

**पक**—हो हो! मला हें चांगलें आठवतें.

**ऑबेरान**—त्याचवेळीं धनुष्यबाण घेऊन, राजा झालेला मदन चंद्रलोक व पृथ्वी यांच्यामध्यें उडत असतांना मी पाहिला; कदाचित् तो तुला दिसला नसेल. पश्चिम दिशेकडे कोठल्याशा देशाचें राज्य करणाऱ्या एका सुंदर राजकुमारिकेवर त्यानें अचुक नेम धरिला होता, व धनुष्यापासून एक बाण त्यानें इतक्या जोरानें सोडला कीं तेणेंकरून कमींत कमी एकलक्ष माणसांचींतरी अंतःकरणें विदारण झालीं असतील! पण मी पुढें पाहिलें तों तरुण मदनाचा तो अग्नितुल्य बाण आर्द्रानक्षत्राच्या शुद्ध किरणांत विझून गेला. आणि राजकुमारीवर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं, व तिच्या कुंवारपणाच्या विचारांतही त्यापासून कांहींएक फरक पडला नाहीं. तरी पण मदनानें सोडलेला तो बाण कोठें पडला हें मी पाहिलें; खचित, तो बाण पश्चिमेकडे असलेल्या एका फुलावर जाऊन पडला. हें फूल पहिल्यानें दुधासारखें पांढरें होतें, पण मदनाच्या बाणाची जखम झाल्यापासून तें आतां जांभळें होऊन गेलें आहे. अविवा-

हित मुली त्या फुलाला ‘ शुष्क प्रेमदर्शन ’ असें ह्मणतात ! तें फूल मला आणून दे. तें फूल ज्या वनस्पतीवर येतें ती मी तुला मागेंच दाखवून ठेविली आहे; आहे का लक्षांत ? त्या फुलाचा गुण असा आहे कीं त्याचा रस निजल्यावर कोणाही मनुष्याच्या डोळ्यांना लाविला असतां त्याला एकदम भुरळ पडते, व त्याला वेड लागतें; आणि जो कोणी जिवंत प्राणी पहिल्यानें दृष्टीस पडेल त्याच्यावर त्याचें प्रेम बसतें.

**पक**—हा पहा मी, चाळीस मिनिटांचे आंतच, सगळ्या पृथ्वी सभोंवार फिरून येतों.

( जातो. )

**ऑबेरान**—तें फूल एकदा हातीं येऊंदे ह्मणजे दाखवितो चमत्कार ! टिटॅनियेला गाढ झोंप लागली ह्मणजे मी त्याचा रस तिच्या डोळ्यांत घालतों. मग जेव्हां ती जागी होईल, आणि जो प्राणी पहिल्यानेंच ती पाहील—मग तो सिंह असो, अस्वल असो, किंवा लटपट करणारें माकड असो—मदनानें व्यथित होऊन त्याच्या मागें ती लागेल ! आणि तिच्या नजरेंत उत्पन्न झालेलें हें मदनाचें वेड मी कधीं घालविणार नाहीं, सांगून ठेवतों ! बाकी दुसऱ्या एका वनस्पतीच्या रसानें मला तें घालवितां येतें म्हणा—पण अगोदर तिचा तो हुजऱ्या मला देऊन टाकावयाला मी

तिला लावीन, व मग हें वेड मी दूर करीन! बरें पण हें इकडे कोण येत आहे? मी तर काय अदृश्यच आहें, त्यामुळें त्यांना नकळतां त्यांचा संवाद मला ऐकावयाला सांपडेल.

( पुढें डिमेट्रियस व मागून हेलेना प्रवेश करिते. )

**डिमेट्रियस**—मी दहादां तुला सांगितलेंना? माझें तुझ्यावर मुळींच प्रेम नाहीं; आणखी माझ्या मागोमाग तूं कांहीं उगीच येऊं नको! लायझॅन्डर व ती सुंदर हार्मिया कोठें आहेत सांग पाहूं? त्याला मी खचित ठार करीन. पण अगोदर ती मला ठार करीत आहे, त्याचा काय विचार? येथल्या झाडींत लपून बसलीं आहेत, असेंच तूं मला म्हणालीस, नाहीं बरें? म्हणूनच मी येथें आलों. आणि हार्मिया तर कोठें दिसत नाहीं. त्यामुळें मी कसा वेडा होऊन गेलों आहें! चल, तूं आतां येथून चालती हो. माझ्या मागें आतां आलीस तर खबरदार!

**हेलेना**—अहारे दुष्टा! पाषाण हृदया! तूं किती कठोर आहेस! तूंच मला येथें ओढीत आणतोस. पण माझें अंतःकरण लोखंडासारखें नाहीं; तें खऱ्या पोलादासारखें खरें आहे. जिच्या बळानें तूं मला आपल्यामागें ओढीत आणितोस ती मोहिनी काढून घे, म्हणजे मी तुझ्यामागें येणार नाहीं.

**डिमेट्रियस**—मीं तुला फुसलावून आणलें आहे कीं काय? किंवा मी तुझ्याशीं गोड तरी बोलतों आहें? मी तर म्हणतों कीं तुझ्यावर माझें प्रेम नाहीं, तुझ्यावर माझें प्रेम बसण्याचा संभव नाहीं. असें मी तुला किती वेळां बजावून सांगितलें?

**हेलेना**—आणि तूं असें करतोस म्हणून तुजवर माझें प्रेम अधिकच जडलें आहे. मी आपलें तुझें एक कुत्रें आहें असेंच समजना बरें! आणि–मार मार आणखी मार–प्रियकरा! तूं जों जों मला मारशील तों तों तुझ्याशीं अधिक लडीवाळपणानें मी वागून, तुजवर अधिक अधिकच प्रेम करीन. तुझ्या कुत्र्याप्रमाणें मला तूं वागीव; मला तूं लाथाड, मार, झोड, मजकडे पाहूं नकोस व मला जवळून हाकलून दे. पण मी तुझ्या मानानें जरी अगदीं हलकी व तुला अयोग्य असलें तरी कुत्र्याप्रमाणें तुझ्या मागोमाग येण्याची तरी मला परवानगी दे, म्हणजे झालें. तुझ्या प्रेमासाटीं कुत्र्याप्रमाणें वागण्यास मी तयार आहें. याहून तुझ्या मतें आणखी कोणता अपमान मी सोसावा?

**डिमेट्रियस**—बस झालें! पुरे! मला तुझा येवढा तिटकारा आला आहे कीं तो आणखी वाढवूं नको. फार काय सांगूं?–तुला पाहिली कीं माझ्या कपाळाला तिडिक उठते–कसेंसेंच होतें!

**हेलेना**—आणखी तुला पाहिलें नाहीं म्हणजे मला कसें-सेंच होतें !

**डिमेट्रियस**—शहर सोडून व तुजवर ज्याचें प्रेम नाहीं अशाच्या आधीन होत्साती तूं आपल्या स्त्रीजातीचें ब्रीद जी मर्यादा तिला मात्र बट्टा लावीत आहेस! कौमार्यावस्थेचें महत्व लक्षांत आण, व रात्रीच्या वेळीं बरोबर कोणी नाहीं अशी एकटी राहणें कुमारीला किती जोखमाचें आहे याचा विचार कर.

**हेलेना**—कांहीं झालें, तरी तुझे सद्गुण माझें संरक्षण करितील. आणि मला ज्याअर्थी तुझें तोंड दिसत आहे त्याअर्थी ही कांहीं रात्र नव्हे! आणि म्हणून तूं म्हणतोस तसला प्रसंग मजवर नाहीं असेंच मी समजतें.

**डिमेट्रियस**—नाहीं तूं ऐकत ? तर मग मीच तुझ्या-जवळून पळून जाईन; व झाडाझुडपांत कोठें तरी लपून बसेन; आणि मग निर्दय श्वापदांच्या तडाक्यांत तूं सांपडशील.

**हेलेना**—अरेरे! त्या श्वापदांपैकीं अत्यंत क्रूर अशा श्वापदाचें देखील अंतःकरण तुझ्याइतकें कठोर नसेल ! तुला पाहिजे तर तूं पळून जा. पण त्यामुळें आपल्या वागणुकीला वेगळेंच स्वरूप येईल हें लक्षांत ठेव. पहा, कोणी प्रतापवान देव पुढें पळत आहे व त्याच्यामागें कोणी अप्सरा

लागली आहे; कोणी राक्षस धांवत आहे व त्याचा पाठलाग खबूतर करीत आहे असें पाहिलें ह्मणजे शौर्याला भित्रेपणा पळवीत आहे असेंच हें झालें; ह्या सर्व उदाहरणांत कितीही बलाढ्यता असली तरी तिचा काय उपयोग आहे साग बरें !

**डिमेट्रियस**——मी कांहीं आतां तुझें बोलणें ऐकत उभा रहात नाहीं. मला आपला जाऊं दे. आणखी इतकें करून माझ्यामागें आलीस तर तुला छळणार नाहीं असें तूं समजतेस काय ?

**हेलेना**—अरण्यांतच काय, पण देवळांत, शहरांत, शेतांत तूं मजपाशीं कसाही वागलास तरी—( तो तिला बडवितो ) अरेरे ! धिःकार असो तुला ! माझ्याशीं तूं असा वागलास त्या अर्थीं पुरुष जातीला कलंक लावलास. पुरुष ज्याप्रमाणें प्रेमासाठीं लढतात, त्याप्रमाणें आम्ही कांहीं लढत नाहीं. आमच्यावर प्रेम करून पुरुषांनीं आह्मांला वश करून घ्यावयाचें असतें; पुरुषांचें प्रेम आह्मांला कांहीं मिळवावयाचें नसतें. समजलास ?——( डिमेट्रियस जातो. ) मी तुझ्यामागून येईन, व तूं नरकांत गेलास तरी ज्या अर्थीं तुझ्या ठिकाणीं माझें इतकें प्रेम जडलें आहे त्या अर्थीं तुझ्याच हातानें मला मरण यावें ह्मणून मी आपला प्राण देऊन नरकाचाही स्वर्ग बनवीन !

( जाते. )

**ऑबेरान**—थांब, मुली, तुझें कल्याण असो. तूं ह्या झाडीं-तून निघून गेली नाहींस तोंच हा तुझ्या प्रेमास्तव तुझ्या मागें लागेल असें मी करितों. मग तूं मात्र त्याला पाहून पळून जाऊं नको ह्मणजे झालें.

( पक प्रवेश करितो. )

कायरे बाबा, आणलेसका तें फूल? या या तुह्मी भटकणारे गृहस्थ! बरेच लवकर आलां म्हणायचें!

**पक**—हो, हें घ्या तें.

**ऑबेरान**—मग तें दे पाहूं. नदीच्या कांठीं एक जागा आहे, ती मला चांगली माहितीची आहे. तेथें अनेक प्रकारचीं जंगली फुलें फुलतात. याच ठिकाणीं कुड्याचीं फुलें फुललीं आहेत, मोगरीच्या व चंपकाच्या कळ्या उमलल्या आहेत, आणि धायटीच्या सपुष्प वेलींचा व त्यांतच कुसरीच्या वेलींचा मंडप बनलेला आहे. अशा एका मंडपांत, एका परीला पांघरावयाला पुरेल एवढी मोठी लांब रुंद सर्पाची कांत पांघरून टिटॅनिया निजली आहे. तर आतां मी जाऊन या वनस्पतीचा रस तिच्या डोळयांना लावतों; म्हणजे ती जागी होतांच तिचें डोकें वाईट कल्पनांनीं व वाईट विचारांनीं भरून जाऊन, ती भलभलतें बोलूं लागेल व भलभलतें आचरण करूं लागेल. आणि यांतला थोडासा रस तूंही घे.—आणखी याच झाडीमध्यें

एक अथेनियन स्त्री निजली आहे ती कोठें आहे हें पहा. त्या स्त्रीचें ज्या गृहस्थावर प्रेम बसलें आहे तो तिला नेहमी झिडकारीत असतो, त्याच्या डोळ्यावर हा रस लाव. पण तो कसा लावशील, समजलास?—तो जागा होतांच त्याला हीच बाई दिसावी. तो तुला सहज सांपडेल. त्याच्या अंगावर अथेनियन पोषाख आहे. त्याच्या डोळ्यावर हा रस इतक्या प्रमाणानें लाव कीं त्याजवर तिचें जितकें प्रेम आहे त्याहून त्याचे मनांत तिजविषयीं जास्त प्रेम उत्पन्न होईल. जा आतां, नीट आठवण ठेव; आणखी कोंबड्याचें पहिलें आखणें ऐकतांच आधीं मला येऊन भेट.

( जातो. )

**पक**—महाराज, आपण आतां काळजी करूं नका; आपला नोकर हें काम बजावल्याशिवाय राहणार नाहीं.

( जातो )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—झाडीची दुसरी बाजू.

( आपल्या अनुचरींसह टिटॅनिया प्रवेश करिते. )

**टिटॅनिया**—पऱ्यांनों, या व एकदां फेर धरून नाचा,

आणखी गाणें म्हणा; आणि पाव पळ झालें नाहीं तोंच येथून चालत्या व्हा. आणखी मी काय म्हणतें तें नीट ऐकून घ्या. गुलाबाच्या व चंपकाच्या कळ्यांतले किडे कांहीं जणींनीं मारावे, व कांहीं जणींनीं पाकोळ्यांबरोबर लढाई करून त्यांचे पंख काढून घ्यावे. आमच्या भुतांच्या सेनेला त्या पंखांचा पोषाख मला करून द्यावयाचा आहे. आणि रात्रीं जें घूत्कार करून आपल्याला त्रास देतें, व आपल्या भूतांची नाजुक आकृति पाहून ज्याला आश्चर्य वाटतें, त्या घुबडाचाही कांहींजणींनीं बंदोबस्त करावा. तर चालूं द्या आतां तुमचीं गाणीं; म्हणजे मला झोंप लागेल, आणि मी झोंपीं गेलें ह्मणजे तुम्ही आपापल्या उद्योगाला जा.

**गायक गण—**

श्लोक ( मालिनी वृत्त )

झणिं बुलबुलपक्ष्या ! मंजु मंजु स्वनातें
करुनि, मधुर गाणें गाय, जें दे सुखातें ।
प्रियकर अजि राणी आमुची नीज घेते
सुखविं, आहित जीवां वारुनी मंत्रगीतें ॥

**पहिली परी—**

गीत.

( ' मारुतिराया बलभीमा० ' या चालीवर )

कवड्या सर्पांनो, बाई ।
राणी करिते अंगाई ॥

दूर येथुनी ह्मणिं जाईं ।
नकरीं पीडा मुळिं कांहीं ॥ १ ॥
कांटे, साळू गे ! वारीं ।
साळ-पिसे अपुलीं सारीं ॥
सरसर सरड्यांनो! जाई ।
कामचि तुमचें आजि नांहीं ॥ २ ॥
पालीबाई ! चुकचुकूनी ।
नकरीं पीडा आजि कानीं ॥

**गायक गण—**

**श्लोक.** ( मालिनी वृत्त )

झणिं बुलबुलपक्ष्या ! मंजु मंजु स्वनातें
करुनि, मधुर गाणें गाय, जें दे सुखातें ।
प्रियकर अजि राणी आमुची नीज घेते
सुखविं, अहित जीवां वारुनी मंत्रगीतें ॥

**दुसरी परी—**

**गाणें.** ( चाल वरची )

जीवजंतुनो ! करि बाई ।
राणी अमुची अंगाई ॥ ३ ॥
कोश्री कोळी कीटक हो! ।
पुरे, अम्हाला कष्ट न हो ॥
लांब पाय ते अखुडावे ।
जलदी--जलदीनें जावें ॥ ४ ॥
अमुची राणी अंगाई ।
करिते, ह्मणुनि करा घाई ॥
खबरदाररे ! नच येई ।
राणी करिते अंगाई ॥ ५ ॥

**पहिली परी**—आतां सर्व व्यवस्था हुकुमाप्रमाणें झाली नाहींका ? आतां पाहऱ्यासाठीं एक संत्री ठेवून आपण सर्वजणी चला जाऊंया.

( पऱ्या जातात. टिटॅनिया निजते. )

( ऑबेरान प्रवेश करितो. )

**ऑबेरान**—बरें झालें. आतां जागी झालीस ह्मणजे जो प्राणी पहिल्यानें पाहशील तोच आपला खरा प्रियकर असें समज. ( टिटॅनियेच्या डोळ्यांना फुलाचा रस लावितो ) त्याच्यावर प्रेम कर; आणि त्याच्यासाठीं अगदीं झुरणीस लाग. मग काळसुंदा असो, मांजर असो, अस्वल असो, चित्ता असो, कीं रांठ केसांचा डुक्कर असो, कोणी असला तरी तूं जागी झालीस ह्मणजे तो तुला आपला प्रियकर वाटेल. अगोदर जागी होऊं नको; कोणी एखादा क्षुद्र प्राणी जवळ आला ह्मणजे मात्र जागी हो. ( जातो. )

( लायझॅन्डर व हर्मिया प्रवेश करितात. )

**लायझॅन्डर**—सुंदरी, प्रियतमे, रानांत फिरून फिरून तूं अगदीं थकली आहेस; आणखी खरें विचारशील तर मी रस्ता चुकलों आहें. सखे हर्मिये, तुझी मर्जी असेल तर आपण उजाडेपर्यंत येथेंच अंमळ पडूं.

**हर्मिया**—बरें आहे, तुह्मी ह्मणतां तसेंच करूं. पण पडा-

यचें कशावर ? हतरायाची कांहीं सोय पहा. मी या येथें ढेंकळावरच डोकें टेकतें.

**लायझॅन्डर**—हो हो, यावर फार सुंदर मऊ गवत उगवलें आहे. हा आपणा दोघांनाही कामास येईल. आपलीं दोघांचीं शरीरें जरी भिन्न असलीं तरी अंतःकरणें एकच आहेत; व आपण दोघांनीं शपथही पण एकच घेतली आहे. तेव्हां एकाच अंथरुणावर दोघांचेंही काम भागवावें.

**हर्मिया**—नाहीं, तसें नको. माझें ऐकाल तर तुम्ही अजून अंमळ पलीकडच्याच बाजूला निजाल तर बरें, इतक्या जवळ निजूं नका.

**लायझॅन्डर**—प्रिये, माझ्या मनांत कांहीं एक पाप नाहीं, हें ध्यानांत ठेव. प्रेमबद्ध झालेल्या स्त्रीपुरुषांना एकमेकांच्या बोलण्याचा अर्थ तेव्हांच कळतो. म्हणून मी काय ह्मणतों ऐक—माझें अंतःकरण तुझ्या अंतःकरणाशीं इतकें कांहीं मिळून गेलें आहे कीं दोन्हीं अंतःकरणांचा एकजीव होऊन त्यांचें एकच अंतःकरण बनून गेलें आहे. शपथेमुळें दोन्हीं अंतःकरणें साखळदंडानें एक जागीं जखडून टाकावीं त्याप्रमाणें झालीं आहेत. व तीं एकजीव होऊन जावींत असें दोघांनांही वाटत आहे. मग तुझ्या शेजारीं पडायला काय हरकत आहे ? विनाकारण नाहीं ह्मणूं नको. यांत मी काय खोटें बोलत आहे ?

**हर्मिया**—प्रियकरानें हें एक गमतीचेंच कोडें घातलें ह्मणायचें. लायझॅन्डर खोटें बोलला असें जर हार्मिया म्हणाली, तर ती खरोखर फार गर्विष्ठ आहे, तिला रीतभात कांहीं ठाऊक नाहीं असेंच म्हणावें लागेल. पण तुमचें माझ्यावरचें प्रेम तर नाहींसे होऊं नये, आणि योग्य चालीरीतीचेंही उल्लंघन होऊं नये हें बरें; म्हणून म्हणतें तुम्ही अंमळ दूर निजावें हें चांगलें. अहो, मर्यादा ही पुरुषांनीं व बायकांनीं—दोघांनींही सारखीच पाळावयाची. यासाठीं सद्गुणी अविवाहित तरुणीनें व तरुणानेंही एकमेकांपासून जितक्या अंतरावर राहिलें पाहिजे तितक्या अंतरावर तुम्ही निजा म्हणजे झालें. बरें. अंमळ मी पडतें. तुमच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत माझ्यावरचें तुमचें प्रेम न ढळो म्हणजे झालें.

**लायझॅन्डर**—प्रिये, कांहीं काळजी करूं नकोस. तसेंच होईल. मेलों तरी मी तुझ्याशीं कपट करणार नाहीं, व तुला फसविणार नाहीं. हें येथें माझें अंथरूण पाहिलेंस ? आतां तूं खुशाल झोंप घे. झोंप तुला पूर्ण विश्रांति देवो.

**हर्मिया**—तींतून अर्धी विश्रांती मला झोंप इच्छिणाराला मिळो !

( दोघें जणें जातात. )

( पक प्रवेश करितो. )

**पक**—काय बोवा चमत्कार तरी ! मी हें सारें अरण्य शोधलें, पण प्रेम उत्पन्न करणाऱ्या त्या फुलाचा रस

ज्याच्या डोळ्याला लावायचा आहे तो अथेनियन कांहीं मला कोठें सांपडला नाहीं, हें कसें ? रात्रच आहे तेव्हां जिकडे तिकडे सामसुम असायचीच. हा कोण बरें येथें निजला आहे ? याच्या अंगांत अथेनियन पोषाख दिसत आहे. मला वाटतें, आमचे महाराज ह्मणाले तो हाच दिसतो. आपल्यावर प्रेम करणाऱ्या कुमारिकेचा त्याग यानेंच केला आहे, नव्हे का ? आणखी हीच ती कुमारी येथें ओल्या जमिनीवर नुसती पडून गाढ झोंपेंत आहे. अरेरे, गरीब बिचारी ! जो तिच्यावर प्रेम करीत नाहीं किंवा तिला नुसतें विचारीतही नाहीं, त्याला शिष्टाचार कसला नी काय कसला ! तो कांहीं तिच्याजवळ नाहीं. अहारे तुसड्या ! अंमळ थांब. ह्या वनस्पतीचा रस तुझ्या डोळ्यावर घालतों. त्याच्या सामर्थ्यानें काय मौज होईल पहा.

( लायझॅन्डरच्या डोळ्याला रस लावतो. )

भल्या माणसा ! तूं जागा झाल्यावर प्रेमानें इतका वेडा होऊन जाशील, कीं तुझ्या डोळ्यांना झोंप कशी ती लागणार नाहीं. मी गेलों ह्मणजे तूं जागा हो. कारण मला आतां ऑबेरान महाराजांकडे गेलें पाहिजे.

( जातो. )

( डिमेट्रियस व हेलेना धांवत येतात. )

**हेलेना**—प्राणवल्लभा ! माझा प्राण घेत असलास तरी चिंता नाहीं. अंमळ उभा तर राहशील ?

**डिमेट्रियस**—मी तुला अगदीं निक्षून सांगतों कीं तूं येथून चालती हो. उगीच भुतासारखी माझ्यामागें लागूं नको.

**हेलेना**—काय ? मला काळोखांत सोडून तूं जाणार ? छे असें करूं नको.

**डिमेट्रियस**—बरें, तर तेंच रहा येथें; ह्मणजे बरी सांपडशील संकटांत. मी एकटाच जातों. ( निघून जातो. )

**हेलेना**—अरेरे, इतकी धावपळ करीत याच्यामागें लागत आलें हा मोठाच मूर्खपणा केला; नाहींका ? जों जों मी तुझी प्रार्थना करितें तों तों माझ्यावर तुझी कृपा कमीच. पण कोठें जरी पडलेली असली तरी हर्मियाच खरी सुखी ! कारण तिच्या डोळ्यांत अशी कांहीं मोहिनी आहे कीं ती आपली पाहिजे त्याला वश करून टाकिते. तिचे डोळे इतके सुंदर कशानें झाले बरें ! तिच्या डोळ्यांतून अश्रु पडतात ह्मणून ? छे, तसें असतें तर माझ्याच डोळ्यांतून अधिक अश्रु गळतात. पण मला वाटतें मी एखाद्या अस्वलाप्रमाणें हिडीस असेन. कारण जीं जीं श्वापदें मला पहातात तीं तीं मला भिऊन पळतात. मग एखाद्या राक्षसाला पाहून भ्यावें त्याप्रमाणें मला पाहून माझा प्रियकर भिऊन पळतो, यांत काय आश्चर्य ? हर्मियेचे सुंदर डोळे पाहून मी आपल्या डोळ्यांची त्याशीं

तुलना करितें; तेव्हां माझे हे डोळे किती मत्सरी ह्मणावे! पण हें येथें कोण निजलें आहे बरें?—कोण लायझॅन्डर? नुसत्या जमिनीवर! हा झोपेंतच आहे काय? श्वास वाहतो आहेना पण? आसपास कोठें रक्त पडलेलें दिसत नाहीं. अरे बाबा, जिवंत असलास तर जागा हो.

**लायझॅन्डर**—( खडबडून उठतो ) जागा आहें बरें! अहाग प्रिये! तुजसाठीं अग्नींत देखील उडी घालीन. तुझी शरीरलतिका स्फटिकासारखी कशी चकचकते आहे ह्मणून सांगूं? सृष्टिकर्त्यानें तुला अशा कुशलतेनें निर्माण केलें आहे, कीं तुझ्या शरीरांत वास करणारें अंतःकरण मला स्पष्ट दिसत आहे. अहो! पण तो कोठें आहे? काय दुष्ट तरी? माझ्या हातून तलवारीनें त्या अधमाचे तुकडे तुकडे व्हावे अशीच त्याची योग्यता आहे.

**हेलेना**—नको, नको, लायझॅन्डर, असें ह्मणूं नको! तुझ्या हर्मियेवर त्याचें प्रेम असलें ह्मणून काय झालें? त्यांत तुझी हानि ती काय झाली? पण हर्मियेचें प्रेम तुजवर आहे ही काय थोडी समाधानाची गोष्ट आहे?

**लायझॅन्डर**—काय, हर्मियेचें प्रेम मजवर आहे, ह्मणतेस? यांत कसलें समाधान? छे! मला तर नाहीं तसें वाटत. तिजबरोबर मी जो कालक्षेप केला त्याचें मला अगदीं वाईट वाटतें, व त्याबद्दल मला आतां फार फार पश्चात्ताप

होतो. अग, कावळा देऊन खबूतर कोण घेणार नाहीं ? मनुष्याची इच्छा त्याच्या विचारशक्तीवर अवलंबून असते; मग माझी विचारशक्ति तर असें सांगते कीं तिच्याहून तूं किती तरी चांगली आहेस. कोणतीही वस्तु हंगामावांचून पक्व दशेला येत नाहीं, त्याचप्रमाणें लहान वयामुळें माझी बुद्धि पक्क दशेला आली नव्हती. आतां माझी विचारशक्ति पूर्ण विकास पावल्यामुळें ती माझ्या इच्छेवर आपला अंमल चालवीत आहे. अग, डोळे हें एक कामदेवाचें मौल्यवान व महत्वाचें पुस्तकच आहे. त्यांत अनेक प्रेमचरित्रें लिहून ठेवलेलीं असतात. तीं आतां माझ्या नजरेस पडलीं असून मला वाचतां येऊं लागलीं आहेत, समजलीस ?

**हेलेना**—अशा प्रकारचीं, हृदयाला घरें पाडणारीं भाषणें ऐकून फजीती करून घ्यायला मी जन्माला तरी कशाला आलें ? अरे बाबा, मी तुझें असें काय केलें आहे, ह्मणून तूं माझा असा पाणउतारा करून बोलतोस ? मी समजून आहें कीं माझा प्रियकर मजकडे कधीं ढुंकूनही प्रेमदृष्टीनें पहात नाहीं, व कधीं पाहील असें मला वाटत नाहीं. माझ्या स्वरूपामध्यें जीं व्यंगें आहेत त्यांची आठवण देऊन मला मेल्यापेक्षांही मेली कां करीत आहेस ? तेवढ्यानें तुझें समाधान होत नाहीं काय ? काय म्हणे, तूं मला आवडतेस आणि मी तुजवर प्रेम करितों ! असें ढोंग

करून तूं माझ्या स्वरूपांत जो बेढबपणा आहे तो दाखविण्याची तुझी ही सारी मसलत आहे, हें मी समजतें!—खरोखर, यानें मला पराकाष्ठेचें दुःख होत आहे. पण भगवंतारे! तूं याचें कल्याण कर. आतां माझ्यावर जरी प्रसंग आहे, तरी मी मोकळ्या मनानें कबूल करितें कीं तुझ्या अंतःकरणांत फार दया भरली आहे असें पाहिल्यानें मला वाटत होतें.–शिव शिव! कोण हा प्रसंग! एखाद्या स्त्रीचें एखाद्या पुरुषावर प्रेम बसावें व त्यानें तिला झिडकारावें, व त्यानें झिडकारल्यावरून दुसऱ्याच एकानें प्रेम करण्याचें ढोंग करून, तिची पाहिजे तशी विटंबना करावी हें चांगलें ना!

( जाते. )

**लायझॅन्डर**—हिनें हर्मियेला पाहिलें असेलसें वाटत नाहीं. हर्मिये, तूं येथेंच नीज. लायझॅन्डरजवळ इतःपर कधींही येऊं नको. कारण अतिशय आवडता पदार्थ ओकारी येईपर्यंत खाल्ला ह्मणजे पुन्हा तो दृष्टीस पडतांच पोटांत ढवळूं लागतें; किंवा पाखंडी लोकांनीं जगामध्यें पाखंडमतें प्रसिद्ध केल्यामुळें ज्या लोकांचें नुकसान होतें ते लोक पाखंडी लोकांचा पराकाष्ठेचा तिरस्कार करूं लागतात; त्याप्रमाणें तुझ्या स्वरूपाचा आतां मला भारी वीट आला आहे. त्याचा मी पुष्कळ विचार केला, तूंच रूप-

वान आहेस अशी माझी समजूत झाली होती. मला आतां चांगलें समजूं लागलें ह्मणून तूं अगदीं माझ्या दृष्टीसमोर नकोस. आणि माझ्यामध्यें जें कांहीं बुद्धि-कौशल्य आहे, तें केवळ हेलेनेचें प्रेम संपादन करण्यांत, तिची प्रशंसा करण्यांत व तिचा मान ठेवण्यांत खर्च करण्याचा माझा निश्चय झाला आहे.—मग तिजसाठीं प्राणही खर्चीं घालावे लागले तरी बेहेत्तर !

( जातो. )

**हर्मिया**—( जागी होऊन ) धांवा हो धांवा ! प्रियकरा, धांवा ! जवळ या; कांहीं तरी उपाय करा. हा साप पहा कसा माझ्या उरावरून जात आहे. त्याला काढून टाका. हायहाय ! काय ही माझी दशा ! प्राणवल्लभा, मला परा-काष्ठेचें भय वाटत आहे, ऊर धडधडत आहे व सर्वां-गाला कंप सुटला आहे. मला आतांच स्वप्न पडलें कीं, एक साप येऊन माझें काळजाला दंश करीत आहे. वाहवा ! फार चांगलें ! अशा रीतीनें तो माझा घात करीत असतांना व मी ओरडत असतांना आपण खुशाल हंसत बसलां आहां ! याहो ! अंमळ इकडे तरी या ! गेलां कोठें ? येथें कोणी नाहीं ? काय, ऐकूं देखील येत नाहीं इतके लांब गेलांना ? अगदीं हूं कीं चूं न करितां, एक शब्दही न बोलतां, निघून गेलांना ! हायहाय !

खचित घात झाला! तुह्मी आहां तरी कोठें? तुह्मांला जर ऐकूं येईल तर ओ द्या. तुम्हांला माझ्या प्रेमाची शपथ आहे. भयानें मला अगदीं भोंवड आली. काय, कोठेंही नाहीं? मला आतां चांगलें कळून आलें; आपण कांहीं जवळपास नाहीं! आपण हें जग सोडून गेलां काय! अहो! कधीं तरी पुन्हा भेटाल काय?

( जाते. )



**हर्मिया**—तुझें हें काळें तोंड पाहण्या पेक्षां मीच आतां येथून निघून जातें.

मधु. स्वप्नदर्शन अं. ३ प्र. २

The Bombay Art Printing Works, Fort.

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**--अरण्याची एक बाजू.

( टिटॅनिया झोंपी गेलेली आहे क्विन्स, स्नग, बाटम, फ्ल्यूट, स्नाउट व स्टार्व्हेलिंग प्रवेश कारितात. )

**बॉटम**---काय, आपली सगळी मंडळी आलीना ?

**क्विन्स**—सगळे जण कसे अगदीं वेळेवर आले पण ! आणखी ही जागा देखील आपल्या नाटकाच्या तालिमेला अगदीं सोयीची आहे. हिरवेंगार गवत उगवलेली माळ जमीन हीच आपली रंगभूमी. ह्या करंदीच्या जाळीपलीकडली आपली रंगण्याची जागा. चला, तर आतां राजेसाहेबांच्या समोरच आपण प्रयोग करीत आहों असें समजून, येथें आपल्या नाटकाच्या तालमीला सुरुवात करूं.

कायरे !

**क्विन्स**—काय ह्मणतोस रे दोस्त ?

**बॉटम**—अरे या ' पिरॅमस आणि थिसबी ' ह्या सुखपर्यवसायी नाटकांत अशा कांहीं गोष्टी आहेत कीं त्या कोणाला आवडायच्या देखील नाहींत. यांत पहिल्या प्रथम

स्वतःला मारून घेण्यासाठीं पिरॅमस यानें तलवार उपसली पाहिजे. आणखी हें त्याचें कृत्य बायकांच्यानें कांहीं पाहवणार नाहीं. तर बोल, याबद्दल तुझें काय ह्मणणें आहे ?

**स्नाउट**—खरेंच; देवाशपथ, हें तर मोठें भयंकर आहे बुवा !

**स्टार्व्हलिंग**—मला तर वाटतें कीं बाकीचें सर्व काम करावें; आणखी तें मारून घेण्याचें मात्र तेवढें वगळावें म्हणजे झालें.

**बॉटम**—छे ! वगळावयाचें वगैरे कांहीं नाहीं. हें सर्व व्यवस्थितपणानें कसें करावें याची मला एक युक्ति सुचली आहे. हें पहा, माझ्यासाठीं एक नांदीपद्य लिहून तयार कर. आणखी तिजमध्यें असा अर्थ आण कीं आमच्या तलवारीनें कोणालाही इजा वगैरे व्हावयाची नाहीं. पिरॅमस हा कांहीं आमच्या तलवारीनीं मारला गेलेला नाहीं. आणखी त्यांची अधिक खात्री होण्यासाठीं नांदीपदांत असेंही म्हण कीं मी खरोखर पिरॅमस नसून मी बॉटम नांवाचा कोष्टी आहें; म्हणजे त्यांची भीति नाहींशी होईल !

**क्विन्स**—ठीक आहे. हें काम माझें. तूं म्हणतोस तशी नांदी तयार करतों. आतां ती साहा किंवा आठ ओळींची करतों, म्हणजे झालें.

**बॉटम**—छेरे, तसें नाहीं. दोन ओळी अधिक कां असतना; चांगली आठ ओळींची कर.

**स्नाउट**—पण बायका सिंहाला भिणार नाहींतना ?

**स्टार्व्हलिंग**—होयरेबा, होय! खचित भितील.

**बॉटम**—गड्यानों, या गोष्टीचा आपला आपणच कायतो विचार पाहिला पाहिजे हो, देव तुमचें भलें करो, बायकांमध्यें सिंह चालविणें ही एक मोठी भयंकर गोष्ट आहे. कारण सृष्टीमध्यें सिंहाइतका भयंकर पशु दुसरा कोणताच नाहीं. तेव्हां मी ह्मणतों, आपणच या गोष्टीचा विचार पाहिला पाहिजे.

**स्नाउट**—मग तर दुसरी नांदी लिहा व तो सिंह नाहीं असें लखलखीत कळवा, म्हणजे झालें.

**बॉटम**—छे, छे, येवढ्यानें काय झालें ?—सोंग आणणारांच्या नांवाचा स्पष्ट उल्लेखच झाला पाहिजे. आणखी सिंहाचा मुखवटा त्यानें अशा रीतीनें घालावा कीं त्यांतून त्याची स्वतःची अर्धी अधिक मुखश्री चांगली बाहेर दिसावी. आणखी आपलें काम करीत असतांना "स्त्रियांनों किंवा रमणींनों, माझी अशी इच्छा आहे,—मी अशी विनंती करितों, मी तुमची अशी प्रार्थना करितों कीं तुह्मी भिऊं नका; थरथर कांपूं नका; तुमच्यासाठीं मी अगदीं मरायला तयार आहें; मी सिंह होऊन येथें आलों आहें असें

जर तुह्मांला वाटत असेल, तर खचित बोआ, ही मोठी वाईट गोष्ट झाली. छे हो ! मी सिंह नाहीं, इतर माणसां-सारखाच माणूस आहें. " असें किंवा अशा अर्थाचें त्यानें मध्येंच बोलावें; आणि लागलीच पाहिजे तर त्यानें आपलें नांवही कळवावें; इतकेंच नाहीं पण मी स्नग नांवाचा सुतार आहें असेंही स्पष्टपणें त्यानें सांगावयास चिंता नाहीं.

**क्विन्स**—ठीक आहे. तूं ह्मणतोस तसें करतां येईल. पण सध्यां आपल्यापुढें दोन अडचणी आहेत, त्यांची काय वाट? एक ही कीं दिवाणखान्यामध्यें चांदणें कसें आणावें? पिरॅमस व थिसबी यांची भेट चांदण्या रात्रीं झाली होती; नव्हेका ?

**स्नाउट**—बरें, आपण खेळ करणार ती रात्र चांदण्या पाखांतली तरी आहेका ?

**बॉटम**—आणारे, तें पंचांग आणा आधीं, ह्मणजे त्या रात्रीं चांदणें आहे कीं नाहीं हें पाहातां येईल.

**क्विन्स**—आहे, त्या रात्रीं चांदणें आहे.

**बॉटम**—तर मग ज्या दिवाणखान्यांत आपण नाटक कर-णार आहों, त्या दिवाणखान्याची खिडकी उघडी ठेविली म्हणजे चांदणें सहज आंत येईल, नाहींका ?

**क्विन्स**—किंवा एक कांटेरी झुडुप व त्याच्या आड दिवा हीं

घेऊन एकानें यावें, आणखी ह्मणावें कीं मी चांदण्याचें काम करायला आलों आहे, असें ह्मटलें तर काय चिंता आहे? बरें, हें एक झालें. दुसरी अडचण अशी कीं त्या दिवाणखान्यांत एक भिंत असावयाला पाहिजे. कारण पिरॅमस व थिसबी यांच्या कानगोष्टी भिंतीच्या फटीमधून होत असत असें त्यांच्या कथेंत आहे. तर याला काय करावें?

**स्नाउट**—हो हो, ही अडचण आहे खरीच. तर, भिंतरे आपल्याला कशी आणितां येणार?

**बॉटम**—त्यांतरे काय? कोणी तरी भिंतीचें काम केलें ह्मणजे झालें. जो तें काम करील त्यानें आपल्या अंगाला गिलावा, किंवा माती, नाहींतर असेंच कांहीं तरी लावून यावें आणखी त्यानें आपलीं बोटें अशीं धरावीं ह्मणजे त्या फटींतून पिरॅमस आणि थिसबी यांच्या कानगोष्टी होऊं शकतील.

**क्विन्स**—झालें, तर मग, सर्व कांहीं ठीक जमलें ह्मणायचं. चला, तर आतां प्रत्येकानें खालीं बसावें आणि आपापलें भाषण ह्मणून दाखवावें. पिरॅमस तूं सुरवात कर. तुझें भाषण संपलें ह्मणजे त्या झाडाच्या आड जाऊन तूं बैस; आणखी याचप्रमाणें प्रत्येकानें आपापल्या पाळीप्रमाणें आपापलें काम करावें.

**पक**—( मागच्या बाजूनें प्रवेश करून ) काय या गाढ-

वांनीं येथें ही गडबड उडवून दिली आहेहो! मोठ्या ऐटीनें हे इकडून तिकडे तिकडून इकडे धांवत फिरत आहेत. काय, आमच्या राणी साहेबही येथेंच निजल्या आहेत का? आणि हे याच ठिकाणीं नाटक करणार होय? ठीक आहे, मी प्रेक्षक होईन आणखी कारण पडलें तर एखाद्या पात्राचें कामही करीन.

**क्विन्स**—पिरॅमस, बोल. थिसबी, चल, पुढें ये.

**सोंगाड्या पिरॅमस**—प्रिये थिसबी, फुलांना कसा 'चांगला सुंदर वास मारीत' आहे, पहाना बरें?

**क्विन्स**—अरे 'सुवास' 'सुवास' असें ह्मण.

**सोंगाड्या पिरॅमस**—हो, तसें ह्मणतो.--'चांगला सुवास येत आहे.' तसाच प्रिये थिसबी, तुझा श्वास देखील कसा प्रिय वाटत आहे. पण ऐक. कोणाचा तरी आवाज ऐकू येत आहे! येथें क्षणभर थांब; मी हा पहा आलोंच.

( जातो. )

**पक**—येथें पिऱ्यामसचें काम करणाऱ्याहून हा पिरॅमस कांहीं वेगळाच दिसतो बुवा!

( एका बाजूला होऊन निघून जातो. )

**सोंगाडी थिसबी**—आतां माझें भाषण व्हायचेंना?

**क्विन्स**—होय, आतां तुलाच बोलायचें. कारण कसलासा

आवाज त्यानें ऐकला, तो कशाचा ह्मणून पहायाला तो गेला आहे. आणि तो इतक्यांतच पुन्हा येईल.

**सोंगाडी थिसबी**—हे गौरवर्णानें चमकणाऱ्या माझ्या प्रियकरा! तुझ्या वर्णांत कमलाच्या शुभ्र रंगाची व त्यांतच झाडावर असलेल्या तांबड्या गुलाबी रंगाची छटा दिसत आहे. तूं तरुण असून एखाद्या यहुद्याप्रमाणें सुस्वरूप आहेस. ज्याप्रमाणें इमानी घोडा कितीही थकला तरी तो दमलोंसे दाखवीत नाहीं, त्याप्रमाणें कितीही भयंकर प्रसंग आले तरी तूं आपलें सत्यव्रत सोडीत नाहींस. हे माझ्या पिरॅमसा, तुला ठाऊकच आहे त्या थडग्याजवळ मी आतां तुला भेटेन.

**क्विन्स**—अरे, ‘ थडगें ’ ह्मटलेंस, पण तुला यावेळीं बोलायचें नाहीं हें लक्षांत नाहीं का? तूं पिरॅमस याला हें उत्तर देत आहेस. हें लक्षांत ठेव—आणि तूं आपलें सारें बोलणें आणि शेवटीं बोलावयाचे शब्दही एकदम बोलून जातोस. पण असो. पिरॅमस, चल, ये पुढें. ‘ कधीं न थकणारा ’ हे तुझ्या भाषणाचे शेवटचे शब्द आहेत.

**सोंगाडी थिसबी**—ज्याप्रमाणें अतिशय इमानी घोडा किती जरी थकला तरी तो दमलोंसें दाखवीत नाहीं, त्याप्रमाणेंच तूंही सत्यव्रत आहेस.

**( पक व गाढवाचें डोकें असलेला बॉटम प्रवेश करतात. )**

**बॉटम**—थिसबी, मी जर देखणा असतों तर मी तुझा झालों असतों.

**क्विन्स**—अरे, हें कसलें राक्षसी सोंग! किती तरी हिडिस हें ! येथें कांहीं भुतचेष्टा आहेरे बोवा ! तर आतां मित्रांनों पळा पाहूं येथून !

( क्विन्स, स्नग, स्नाउट व स्टार्व्हलिंग जातात. )

**पक**—अरे गुलामांनों, चाललां कोठें? मी तुमच्या मागोमाग येतों. छे ! पण तसें नको. मी पुढेंच होतों, व तुह्मांला गरगर फिरायला लावितों. धुक्यांतून, झुडपांतून, झाडींतून, रानांतून, मी तुमच्यापुढें येऊन उभा राहतों; मी कधीं घोडा होईन तर कधीं कुत्रा होईन; कधीं डुकर होईन, तर कधीं बिनडोक्याचा अस्वल होईन, आणि केव्हां केव्हां तर निव्वळ अग्नीच होऊन जाईन ! मी कधीं घोड्यासारखा खेंकाळेन, तर कधीं कुत्र्यासारखा भुंकेन, कधीं डुकरासारखा डुरकेन, तर कधीं अस्वलासारखा गुरगुरेन, व कधीं तर अग्नीप्रमाणें भडकल्यासारखा दिसेन. चला तर, जिकडे हे जातील तिकडे त्यांच्या बरोबरच असावें हें बरें.

( जातो. )

**बॉटम**—ते पळून कांबरें चालले? मला भिवविण्याची ही त्यांची कांहीं तरी लबाडीची युक्ती तर नसेल?

**स्नाउट**—( पुन्हां प्रवेश करून ) ए बॉटम तुझ्यामध्यें कांहीं तरी फरक झालेला आहे. तुझे डोळे मला चमत्कारिक दिसत आहेत.

**बॉटम**—अरे! तुला काय दिसतें ?

**स्नाउट**—तुझें डोकें तुला गाढवाच्या डोक्यासारखें झालेलें वाटतें कीं नाहीं ?

**बॉटम**—मला त्यांची लबाडी समजली. त्यांच्या मनांतून मला गाढव बनवायाचें आहे; आणि साधलें तर मला भिववावयाचें आहे, दुसरें कांहीं नाहीं. पण त्यांनीं पाहिजे तें केलें तरी मी या जागेवरून कांहीं हलणार नाहीं. मी येथेंच इकडून तिकडे खेपा घालीत राहीन व तोंडानें गाणीं गाईन, ह्मणजे मी भ्यालों नाहीं असें त्यांना कळून येईल. संगीताची काय दशा झाली आहे तिचें वर्णन करणारें गाणेंच मी ह्मणतों.

**गाणें.**

अद्भुत हे गोष्टी ।
ऐकुनि होउं नका कष्टी ॥ ध्रु० ॥

डाळिंबी शुभ रंग जियेचा चोंच जयाला साजे ।
डोळें काळाकुट्ट कावळा गान करी परिसा जे ॥

घमेंड घालुनि घुमे पारवा बरवा नर्तन–थाट ।
टकटक जो करि पाथरवट खग, काय तयाची ऐट ॥

चिवचिव चिमणा करुनि नाचे थयथय हरिखें स्वमनीं ।
खरे गानपटु सर्वचि, देइल दोष कोण या भुवनीं ? ॥ १ ॥

**टिटॅनिया**—मला माझ्या पुष्पशय्येवरून हा कोण देवदूत उठवीत आहे ?

**बॉटम**—( गातो ) अशा स्थितींत एकच प्राणी खरी गोष्ट याप्रमाणें सुचवितो.--

**गाणें**

भली बापुडी सुज्ञ कोकिळा, जशि सत्कविची वाणी ।
कुहुः कुहुः रव काढुनि बोधी ' कुगान ' हें मनिं आणीं ॥

ह्मणे--एकदां होउनि गेला गाण्यांतिल तो कोल्हाटी ।
तद्गुरु जातां घेऊं लागला तानहि उलटी सुलटी ॥

त्याचा कित्ता वळवुनि सारी पतग मंडळी झाली ।
खरी गानपटु! गाजरदृष्टी भुलली हरवी धाली ॥ २ ॥

अद्भुत हे गोष्टी ।
एकुनि होउं नका कष्टी ॥ ध्रु० ॥

**टिटॅनिया**—अरे भल्या माणसा, कृपा करून पुन्हां असाच गा पाहूं. ह्या कानांत तुझें गाणें पडतांच मी कशी अगदीं वेडी होऊन गेलें आहें! तुझ्या रूपानें माझी अगदीं दशा उडवून टाकली आहे. तुझ्या सद्गुणाची शक्ति इतकी प्रबळ आहे कीं तुला पाहतांच मी तुझ्यावर प्रेम करितें असें ह्मणायला—नव्हे अशी शपथ घ्यावयाला त्यांनीं मला लाविलें आहे.

**बॉटम**—बाईसाहेब, मला तर वाटतें कीं आपण जें माझें वर्णन केलें त्याला मी पात्र नाहीं; आणि खरें विचाराल तर प्रेम व विचारीपणा ह्या दोन गोष्टी अलीकडे एकत्र अशा

क्वचितच आढळतात. शेजारी शेजारी राहणारे देखील एकमेकांवर प्रेम करण्याचें यत्किंचितही मनांत न आणतां, कोठून भलतीकडून कोणी तरी शोधून आणितात व त्याजवर प्रेम करितात ही केवढी दुःखाची गोष्ट आहे ! आतां मी मोठ्या गंभीरपणानें लांब लांब गोष्टी सांगत आहे खरा; तरी पण तशीच वेळ आली तर मला थट्टामस्करी देखील करितां येते.

**टिटॅनिया**—वः ! काय सांगावें ! तूं फार देखणा आहेस शहाणाही पण आहेस.

**बॉटम**—छे छे ! यांतली एकही गोष्ट माझ्या ठिकाणीं नाहीं, हें मला चांगलें माहीत आहे. या अरण्यांतून मला जर सुखरूपपणें एकदांचें निघून जातां येईल, तर माझ्या त्या शहाणपणाचा मला कांहीं तरी उपयोग झाला असें ह्मणतां येईल.

**टिटॅनिया**—नकोरे नको ! या अरण्यांतून निघून जाण्याचें तूं मनांत देखील आणूं नको. तुला येथल्या येथेंच राहिलें पाहिजे,—मग तुला तें आवडो ! कीं न आवडो मी कांहीं साधारण प्रतीचें पिशाच्च नाहीं. मी जिकडे जाईन तिकडे मधुमास माझ्याबरोबर येत असतो. माझें तुझ्यावर प्रेम जडलें आहे. तेव्हां तूं मजबरोबर चल. अरे, तुझ्या सुश्रूषेला पाहिजे तर मी पऱ्या देईन; आणि त्या तुला समुद्रांतून

रत्नें आणून देतील. तूं पुष्पशय्येवर निजलास ह्मणजे तुला झोंप लागावी ह्मणून त्या तुला गाणीं ह्मणतील. मनुष्यप्राण्याच्या ठिकाणीं स्वभावतः जें जडत्व असतें तें तुझ्या अंगीं आहे, हें खरें; पण तें मी घालवून टाकितें, ह्मणजे पिशाच्चाप्रमाणें तुलाही हवेमध्यें संचार कारितां येईल.—अग ए डाळिंबी, ए गुलाबी, ए वाळवे, अग ए मोहारी!

**डाळिंबी**—( प्रवेश करून ) जी बाईसाहेब, हजर.

**गुलाबी**—( प्रवेश करून ) मीही हजीर आहें.

**वाळवी**—( प्रवेश करून ) मीही येथें तयार आहें.

**मोहारी**—( प्रवेश करून ) मीही येथें तयार आहें.

**चौघीजणी एकत्र**—आह्मी कोठें जाऊं ह्मणतां?

**टिटॅनिया**—नीट ऐकाग, मी काय ह्मणतें तें. या गृहस्थाशीं प्रेमानें व आदरानें वागा. तो चालूं लागला ह्मणजे त्याचे सभोंवार नाचून बागडून त्याचें मनोरंजन करा. चांगलीं चांगलीं सीताफळें आणि स्वादिष्ट द्राक्षें आणून त्याला खावयास द्या. व त्याचप्रमाणें त्याला उत्तमोत्तम जांभळें, पेरू, ओले अंजीर आणि तुतें हीं फळेंही द्या. गुणगुणणाऱ्या मधमाशांकडून मधाचीं पोळीं आणून तीं त्याला द्या; आणि ज्यांच्यावर मेण चिकटलें आहे, अशा त्यांच्या तंगड्या तोडून आणून त्या काजव्याच्या दिव्यानें पेटवा; व माझ्या प्रियकराला

नीज येऊं लागली ह्मणजे त्याला निजवा, आणि तो उठला ह्मणजे त्याच्या तैनातींत असा. तो जागा होऊं नये ह्मणून पतंगांचे चित्रविचित्र पंख उपटून ते याच्या डोळ्यावर धरा. पऱ्यांनों, याच्याशीं नम्रपणानें वागून त्याचा चांगला मानमरातब ठेवा बरें!

**डाळिंबी**—मनुष्य प्राण्या, तुला सुख होवो !

**गुलाबी**—तुला सुख मिळो !

**वाळवी**—तुला सुख लाभो !

**मोहारी**—मीही ह्मणतें, तुला सुख लाभो!

**बॉटम**—मनोभावानें मी आपली सर्वांची क्षमा मागतों. कायगे, बायानों तुमचीं नांवें काय?

**गुलाबी**—माझें नांव गुलाबी.

**बॉटम**—गुलाबबाई, तुमची ओळख विसरूं नका बरें. मला सुवास हवासा वाटेल तेव्हां तुमचा उपयोग मी खचित खचित करीन. ( डाळिंबीकडे वळून ) कायहो बाई, तुमचें नांव काय ?

**डाळिंबी**—माझें नांव डाळिंबी.

**बॉटम**—खासें! तुमचीं मातापितरें कोण बरें?—तो मसणा आणि ती जवरी—तीं—त्यांना मी मनःपूर्वक प्रणाम करितों. आपली ओळख दिवसेंदिवस वाढत जाईल अशी

आह्मांला फार फार आशा आहे बरें! ( मोहारीबाईकडे वळून ) तुमचें हो नांव काय ?

**मोहारी**—काय ह्मणजे? मोहारी बाई!

**बॉटम**—आपली सहनशीलता चांगली माहीत आहे! भित्र्या पण खादाड राक्षसी बैलांनीं तुमच्या घराण्यांत तुमचा पुष्कळसा फडशा उडविला आहे. मी आपल्याला अगदीं खरें खरें सांगतों कीं आपल्या भाऊबंदांनीं यापूर्वीं अनेक वेळां माझ्या डोळ्यांतून पाणी काढिलें आहे. तरी असो, दिवसें दिवस आपली ही ओळख वाढत जाईल अशी मला आशा आहे.

**टिटॅनिया**—या, यांच्या तैनातींत असा. त्यांना माझ्या मंडपांत घेऊन जा. मला वाटतें कीं हा चंद्र अश्रुपूर्ण नेत्रांनीं माझ्याकडे पहात आहे. आणि चंद्राच्या डोळ्यांत एकदा अश्रु आले ह्मणजे सर्व फुलें—अगदीं लहानलहानसुद्धां जणुं काय आपलें कौमार्य कोणी बळजबरीनें भ्रष्ट करीत आहे असें वाटून, तीं रडूं लागतात! ऐकिलेंस काग—माझ्या प्रियकराचें तोंड आधीं बंदकरा. व तो एक शब्दही बोलणार नाहीं अशा रीतीनें त्याला घेऊन जा.

( जातात. )

---

# प्रवेश २ रा.

स्थळ—अरण्याची दुसरी बाजू.

( आबेरान प्रवेश करितो. )

**ऑबेरान**—( स्मितवदन करून ) मला वाटतें कीं टिटॅनिया जागी झाली असली तर मोठी मजा झाली असेल ! जागी झाल्याबरोबर पहिल्यानें जो कोणी तिच्या दृष्टीस पडला असेल त्याच्यावर ती अगदीं मनोभावानें प्रेम करीत असेल, नाहीं बरें ! ( पक प्रवेश करितो. ) हे पहा आमचे दूत आले. अरे ए वेड्या भुता, माणसांनीं अगदीं गजबजून गेलेल्या या अरण्याच्या तिकडच्या त्या भागांत रात्रीं काय हकीगत झाली, ती तर सांगशील ?

**पक**—जी महाराज, सर्व कांहीं सांगतों. राक्षसासारख्या विलक्षण अशा एका प्राण्यावर माझ्या धनिणीचें प्रेम बसलें आहे; आणखी काय ? तिच्यासाठीं तयार केलेल्या तिच्या गुप्त लतामंडपापाशीं ती आली तों ताबडतोब झोंप येऊन पडली. इतक्यांत अथेन्स नगरच्या काबाडकष्ट करून कसेंबसें पोट भरणाऱ्या कामकरी लोकांची टोळी तेथें आली; आणि ते नाटकाची तालिम घेऊं लागले. आणि अहो महाराज, हें नाटक तरी थीसियस महाराजांच्या विवाहोत्सवाचे वेळीं व्हावयाचें आहे. त्यांच्यांत एकजण भला

गलेलठ्ठ शरीराचा व मोठ्या डोक्याचा माणूस मीं पाहिला. तो करीत होता पिरॅमसचें काम ! अगदींच वेडा अडमुठा ! तालीम चालली असतांनाच खेळाची जागा सोडून तो आड झाडीमध्यें गेला. मग तो एकटाच पाहून, मी त्याच्या मस्तकावर गाढवाचा मुखवटा बसवून दिला. पण थिसबीशीं त्याचें कांहीं भाषण व्हावयाचें बाकी राहिलें होतें. ह्मणून तो तसाच फिरून रंगभूमीवर आला. आणि काय सांगूं, महाराज ?–त्याला पाहतांक्षणींच त्याचे सोबती घाबरून जाऊन, सैरावैरा धांवत सुटले–व जिकडे वाट मिळाली तिकडे पळून गेले. अहो ! हळूहळू पावलें टाकीत येणाऱ्या पारध्याला पाहतांच, जंगली हंस किंवा काळे डोम-कावळे, बंदुकीचा आवाज होतांच, वेड्यासारखे होऊन आकाशांत भराऱ्या मारूं लागतात, व चिंवचिंव कावकाव करून एकच गोंधळ उडवून देतात; तसाच कींहो त्यांनीं हा प्रकार केला. मग मीही त्यांच्या मागोमाग जाऊन पाय आपटूं लागलों. तेव्हां त्यांची जी धांदल उडाली ती कांहीं पूसूं नये ! धांदलींत एकमेकांवर कींहो ते धडाधड पडूं लागले. तेव्हां त्यांनीं खून खून ह्मणून मोठमोठ्यानें आरोळ्या देऊन अथेन्स शहरांतील लोकांना मदतीसाठीं बोलावलें. ह्याप्रमाणें त्यांची अक्कल गुंग होऊन भीतीनें त्यांची अगदीं गाळण उडाली असतां, काय सांगूं महा-राज ! झाडें आणि झुडपें, कांटे आणि कुटे—ह्या अगदीं

निर्जिव वस्तु आहेतना, त्या देखील त्यांना दुःख देऊं लागल्या.—कांट्यांनीं त्यांचे कपडे धरून ठेवले.—कांहीं त्याच्या अस्तन्यांत शिरून त्यांना अडकून बसले!—आणि झाडाझुडपांनीं त्यांचे रस्तेच अडविले. एकदां धांदल उडाली ह्मणजे जशी सर्व प्रकारांनीं फजिती उडते तशीच त्यांची उडाली. अशा रीतीनें ते भयभीत झाले असतांना मी त्यांना इकडून तिकडे व तिकडून इकडे पुष्कळसे भटकावयाला लाविलें; आणि त्या देखण्या सोंगाड्या पिरॅमसच्या स्वरूपामध्यें फरक करून त्याला तेथेंच सोडून दिलें. याप्रमाणें त्याला हें गाढवाचें नवें स्वरूप आलें असतांना, टिटॅनिया जागी होऊन, तिची दृष्टी नेमकी त्याजवर पडली, व तो गर्दभरूपधारी प्राणी मदन आहे असें समजून त्याजवर एकदम फिदा झाली.

**आबेरान—** हाः हाः हाः! मी मनांत योजिल्याहूनही हें काम तूं फार नामी केलेंस. पण त्या अथिनियन गृहस्थाच्या डोळ्यावर तो रस तूं घातलास कीं नाहीं?

**पक—**घातला तर. एके ठिकाणीं मी त्याला निजलेला पाहिला, आणि पलीकडे ती अथीनियनबाई देखील पडलेली होती. आपण सांगितलेलें कामही मी अशा रीतीनें केलें कीं तो जागा होऊन उठतांच त्याच्या दृष्टीस तीच स्त्री पडावी.

( हर्मिया व डिमेट्रियस प्रवेश करितात. )

**ऑबेरान**—अरे तूं दिसणार नाहींस असा अंमळ आड हो, पाहूं. ह्याच तो अथीनियन बरें.

**पक**—आणि ती स्त्री हीच; पण तो पुरुष मात्र हा नव्हे.

**डिमेट्रियस**—अग, अंमळ इकडे तरी पहा. जो तुझ्यावर इतकें प्रेम करितो त्या मला तूं असें खोंचून बोलावेंस काय? तुझा जो कोणी शत्रू असेल त्याला बोलण्यासाठीं असले शब्द तुझ्यापाशीं असूं दे.

**हर्मिया**—पुरे झालें. जा. आतांपर्यंत मी तुला नुसतें खोंचून बोलत होतें; पण मला ह्या पुढें आतां ह्याहीपेक्षां कठोरपणानें तुझ्याशीं वागलें पाहिजे. अरेरे, हें काय! शिव्याशापही उणे होतील असें अघोर कृत्य तुझे हातून घडल्याचा मला संशय येतो. माझा प्रियकर लायझॅन्डर याला झोंप लागली असतांना, तूं त्याला जर ठार मारलें असलेंस तर मलाही मारून समुद्रांत फेंकून देना बरें. व तेणेंकरून आपल्या पापराशींत आणखी भर घालून, ती पुरी कां करीत नाहींस? तो जसा माझ्याशीं तत्परतेनें वागत असे तसा सूर्य देखील पृथ्वीशीं फारसा वागत नसेल! काय बाई ह्मणावें तरी! मला हर्मियेला एकटीला निजलेली टाकून तो निघून गेला असेल काय? मला जर कोणी सांगितलें कीं चंद्रानें पृथ्वीला आरपार भोंक पाडिलें व त्यांतून थेट

आपल्या पायाखालीं मध्यान्हीचा सूर्य जेथें यावेळीं आला आहे तेथपावेतों मजऊ मारून सर्याला लाजविण्याचा घाट घातला—असें जर मला कोणी सांगितलें तर मी खचित खचित सांगतें कीं त्यावर माझा विश्वास बसेल; पण या गोष्टीवर मात्र मी कधींच विश्वास ठेवणार नाहीं. तूं त्याचा खून करून त्याला जगांतून नाहींसा केलास काय ? नाहीं तर तुजवर प्रेतकळा येऊन तूं कावराबावरा व उग्र दिसत आहेस तो एरव्हीं कां दिसतास ? हं हं ! मी समजलें. खुनी मनुष्य असाच दिसतो.

**डिमेट्रियस**—नाहींग, तसें कांहीं एक नाहीं. मी तर ज्याचा खून झाला आहे अशा माणसाप्रमाणें मी तुला दिसतों ह्मणून तूं म्हणतेस तें मात्र खरें आहे. तुझ्या अत्यंत निष्ठुरपणामुळें माझ्या हृदयाला जखम झाली आहे. तेव्हां तूं बरिक खुनी आहेस खरी; आणि असें असूनही पलीकडच्या त्या शुक्राच्या चांदणीप्रमाणें तूं सुंदर, तेजस्वी व दैदीप्यमान दिसत आहेस !

**हर्मिया**—या गोष्टीचा माझ्या लायझॅन्डरशीं काय संबंध आहे? तो कोठें आहे ? अरे ! त्याची मला भेट करविशील काय ?

**डिमेट्रियस**—तुला तो दाखवूं म्हणतेस ? यापेक्षां त्याचें प्रेत मी पाहिजे तर आपल्या कुत्र्यांना खायला देईन !

**हर्मिया**—आहारे कुत्र्या ! चल येथून निघून जा. मी कुमारिका असून माझ्या शालीनतेच्या मर्यादेबाहेर तूं मला पाहिजे तसें बोलत आहेस. तर मग काय? हायरे हाय, तूं त्याला ठार मारिलेंस? असें असेल तर आजपासून तुझी मनुष्यकोटींत गणना करितां येणार नाहीं ! एकदां कायतें खरें सांग. माझ्यासाठीं कां होईना, पण एकदां खरें बोल. तो जागा असतांना त्याच्याकडे पाहण्याची देखील तुझी छाती नव्हती. ह्मणून तो निजलेला आहे असें पाहून तूं त्याला ठार मारिलेंस काय? केवढें हें शौर्य गाजविलेंस ! एखाद्या सर्पानें देखील त्याचा असा घात केला नसता. आणि तूं त्याला अशा प्रकारें मारिलेंस तेव्हां तूं सर्पाहूनही अधिक झालास ! सर्प द्विजिव्ह आहे, त्याअर्थीं तो मनुष्यकोटीच्या बाहेर आहे हें उघड आहे पण त्यानें देखील असें अमानुष कृत्य सहसा केलें नसतें.

**डिमेट्रियस**—माझ्यावरील तुझा हा राग अगदीं निराधार आहे. लायझॅन्डरला मारण्याचा अपराध माझ्या हातून घड-लेला नाहीं तो मेला नाहीं. त्यासंबंधाची हकीकत मी तुला सांगितली ह्मणजे तुझी खात्री होईल.

**हर्मिया**—माझ्यावर कृपा कर, आणखी तो सुखरुप आहे असें मला एकदां सांग.

**डिमेट्रियस**—मी तुला असें सांगितलें तर त्यांत मला काय मिळेल?

**हर्मिया**—तुला आपलें तोंड काळें करण्याचा हक्क मिळेल ! आणखी तुझें हें काळें तोंड पाहण्यापेक्षां मी आतां येथून निघून जातें. हेंच बरें, तो मेला असो किंवा जीवंत असो; तूं ह्मणून आपलें तोंड इतःपर मला दाखवूं नको.

( जाते. )

**डिमेट्रियस**—येवढी ती रागावली असतांना तिच्या मागोमाग जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं, ह्मणून क्षणभर येथेंच थांबावें हें बरें. दुःखाचा परिहार करणारी निद्रा न मिळाल्यामुळें, दुःख करून करून माझें अंग कसें जड होऊन गेलें आहे ! तेव्हां थोडा वेळ येथेंच राहून झोंप घेतली तर मला आलेला हा शीण थोडा तरी नाहींसा होईल.

( खालीं पडतो व झोंपीं जातो. )

**ऑबेरान**—हें तूं काय केलेंस ? तूं तर अगदींच चुकलास ! खऱ्या प्रेमी माणसाच्या डोळ्याला तूं तो वनस्पतीचा रस लाविलास ! आतां तुझ्या या चुकीचा परिणाम असा होईल कीं खरा प्रेमी मात्र बिचारा खोटा ठरेल पण खोट्याचा कांहीं खरा प्रेमी होणार नाहीं !

**पक**—खरेंच काय ? मग याचा सारा दोष दैवगतीला लाविला पाहिजे ! लक्षावधी माणसें पटापट शपथा घेतात, पण शपथांप्रमाणें वागणारा मनुष्य मात्र कोण आहे तो न कळे !

**ऑबेरान**—बरें, वाऱ्यापेक्षां जलद गतीनें या अरण्यांत फिरून हेलेना कोठें आहे ती शोधून काढ पाहूं. प्रेमानें ती अगदीं व्याकुळ व निस्तेज होऊन गेली आहे. तर कांहीं तरी युक्ती प्रयुक्तीनें तूं तिला भुरळ घालून इकडे घेऊन ये; तोंपर्यंत मी याचे डोळे भारतों.

**पक**—हा पहा मी चाललों. कोणा तारतराच्या धनुष्यापासून ज्या वेगानें बाण सुटतो, त्याहूनही अधिक वेगानें मी जातों; मग आपलें कांहीं ह्मणणें आहे ?

**ऑबेरान**—मदनाचा बाण ज्याला लागला आहे अशा जांभळ्या रंगाच्या हे फुला! तूं त्याच्या बुबुळाला जाऊन चाट. याजवर प्रेम करणारी स्त्री याच्या दृष्टीस पडली ह्मणजे ती याला शुक्राच्या चांदणीसारखी दिसो. ज्या वेळीं तूं जागा होशील त्या वेळीं ती जर जवळ आली तर तुझें दुःख कमी करण्यासाठीं तिच्या पायां पडून तिजपाशीं औषध मागितल्यावांचून तुला आतां गत्यंतर नाहीं; समजलास ?

**पक**—( प्रवेश करून ) राजे साहेब, ही पहा ती हेलेना येथें जवळ आली आहे; आणि ज्या तरुण पुरुषाच्या डोळ्यावर मी चुकीनें रस लाविला तोही पण, तिनें आपल्याकडे प्रेमपूर्वक पहावें, ह्मणून तिच्यामागोमाग येत आहे. त्यांची गंमत आपल्याला पहावयाची आहे काय ? धनीसाहेब माणसें किती तरी मूर्ख असतात बरें !

**ऑबेरान**—एका बाजूला हो. त्यांच्या गडबडीनें डिमेट्रियस जागा होईल एखादा.

**पक**—आतां दोघेजण एकदम एकाच स्त्रीवर प्रेम करूं लागतील, तेव्हां किती मजा होईल! विपरीत गोष्टी घडल्या ह्मणजे मला तर बुवा भारी आनंद होतो.

( लायझॅन्डर व हेलेना प्रवेश करितात. )

**लायझॅन्डर**—तुझा तिरस्कार करण्याच्या हेतूनें मी तुझ्या-वर प्रेम करीत आहें असें कां तुला वाटतें? कोणाचाही उपहास व मानखंडना करावयाची मनांतून असलें तर डोळ्यांतून सहसा पाणी येत नाहीं. पण हें पहा, तुझ्यावर प्रेम आहे ह्मणून मी तुला सांगतो, व शपथा वाहतों, तेव्हां तेव्हां माझ्या तर डोळ्यावाटे पाणी येतें; मग मी घेतलेल्या शपथा अगदीं सत्य आहेत हें स्पष्ट होत नाहीं काय? खरेपणाचा शिक्का ज्यावर आहे, अशा प्रकारच्या ज्या गोष्टी माझ्या ठिकाणीं तुला दिसतात त्या माझ्या मनांत तुजविषयीं तिरस्कार असता तर तशा दिसल्या असत्या काय?

**हेलेना**—हें पहा, बोलण्यामध्यें जी भाषा तूं बोलत आहेस तिजवरून तुझी पराकाष्ठेची लबाडी मात्र दिसून येते; दुसरें कांहीं नाहीं! माझ्याजवळ घेतलेल्या तुझ्या शपथा जर खऱ्या आहेत तर हर्मियेपाशीं वाहिलेल्या तुझ्या त्या शपथा

खोट्या होत्या असें होत नाहीं काय ? दोघींच्यापाशीं घेतलेल्या कांहीं खऱ्या ह्मणतां येणार नाहींत. तेव्हां दोन्ही खोट्याच होत असें मात्र ठरतें. माझ्याजवळ जशा शपथा तूं वाहतोस तशाच हर्मियेजवळही तूं वाहिल्या आहेस. तर मग तिला तूं कां टाकून दिलीस ? त्या शपथा व ह्या शपथा जर तोलून पाहिल्या तर कोणत्याच वजनदार भरणार नाहींत; कदाचित् दोहोंची किंमत सारखीच. माझ्या मतें तर गप्पाहून त्यांत अधिकतें काय आहे ?

**लायसँन्डर**—तिच्यापाशीं जेव्हां मी शपथा वाहिल्या तेव्हां माझ्यामध्यें विचार शक्ति नव्हती.

**हेलेना**—आणखी मला वाटतें कीं आतां तूं तिला टाकून देत आहेस त्यापक्षीं या वेळींही तुझ्या विचारशक्तींत अंतर पडलें आहे असें दिसत नाहीं.

**लायसँन्डर**—डिमेट्रियसचें तिच्यावर प्रेम आहे, तुझ्यावर नाहीं हें तुला ठाऊक नाहीं काय ?

**डिमेट्रियस**—( जागा होऊन ) अग हेलेने, माझ्या हृदयस्थ देवते, परी, सुंदरी, सौंदर्यराशी, प्रत्यक्ष ईश्वरमूर्तिच तूं मला वाटतेस ! प्रिये ! तुझ्या डोळ्यांना मी कसली बरें उपमा देऊं ? स्फटिकाची उपमा द्यावी तर तो मलिन होतो. तोंडलीच्या वेलीवर पिकलेलीं दोन तोंडलीं एकाशीं एक लोंबत राहावीं तसे तुझे ओंठ मला दिसतात ! पूर्व

दिशेकडून वाहणाऱ्या वाऱ्यानें ज्याच्यावरील मळ साफ उडून गेला आहे, असें अत्युच्च पर्वतावरील अगदीं दगडासारखें घट्ट शुद्ध बर्फ आणि तुझा गोंडस हात यांची तुलना करून पाहिली तर हातापुढें तें कावळ्याच्या पंखाप्रमाणें काळें ठिक्कर दिसेल! सुखाची केवळ परमावधी असा जो हा तुझा शुद्ध निर्मळ हात तो मला अत्यंत प्रिय वाटतो. तर मला त्याचें चुंबन घेऊं दे.

**हेलेना**—हायरे दुर्दैवा! आतां जिवंत राहण्यापेक्षां नरकवास बरा! हो, मी समजलें. आपल्या मौजेसाठीं तुह्मी सर्वजण मिळून माझी विटंबना करीत आहां; दुसरें कांहीं नाहीं! सभ्यपणाला व शिष्टाचाराला अनुसरून वर्तन करण्याची तुमची मर्जी असती तर तुह्मी माझ्या अशा चेष्टा कदापि केल्या नसत्या. मी तुझ्या दृष्टीसमोर देखील नको होतें हें मी जाणून आहें. पण तेवढ्यासाठीं या मंडळींत मिळून तूं माझा छळ केला नसतास तर चाललें नसतें काय? मर्दाप्रमाणें दिसणारे तुम्ही जर खरोखरीं मर्द असतां तर माझ्यासारख्या अबलेशीं तुम्ही अशा रीतीनें खचित वागलां नसतां! तुला मनापासून मी नको आहें हें माहीत असतांना, माझ्या सौंदर्याची आपण सर्वजण पराकाष्टेची स्तुती करीत आहां व तुजवर माझें फार प्रेम आहे म्हणून तूही शपथा वहात आहेस, याला काय म्हणावें? तुमचें दोघांचेंही हर्मियेवर प्रेम आहे खरें; पण म्हणून तुम्ही एकमेक

परस्परांचे प्रतिस्पर्धी आहां हें ठीकच; व माझी टवाळी करण्यांतही तुम्ही एकमेकांशीं तेवढीच स्पर्धा करीत आहां असें मला वाटतें. माझा उपहास करून एखाद्या अबलेच्या डोळ्यांतून आंसवें पाडणें म्हणजे आपली मोठीच बहादुरी म्हणायची! उदार अंतःकरणाचे पुरुष आपल्याला क्षणभर करमणूक व्हावी म्हणून एखाद्या कुमारिकेचा अशा तऱ्हेनें छळ करून तिचा जीव घेतील काय ?

**लायझॅन्डर**—हे डिमेट्रियस, तूं किती निष्ठुर आहेस ! असा निर्दयपणा करूं नको. मी मनापासून सांगतों कीं हर्मियेवर प्रेम करण्याचें मी अगदीं आपल्या खुषीनें सोडून देतों; व तूं हेलेनेवरचें आपलें प्रेम सोड. तिजवर माझें प्रेम आहे; व मरेपर्यंत तें तसेंच राहील; समजलास ?

**हेलेना**—वाहवा! सोंगाड्यांनीं आपल्या सोंगाची बतावणी करण्यांत इतके वायफळ शब्द कधींही उच्चारले नसतील.

**डिमेट्रियस**—अरे लायझॅन्डर तूं आपली हर्मिया संभाळ; मला कांहीं ती नको. तिच्यावर मी जरी कधीं प्रेम केलें असलें तरी तें आतां नाहीं. एखाद्याच्या घरीं आपण पाहुणे म्हणून जाऊन राहतों त्याप्रमाणें माझें मन तिजवर कांहीं दिवस बसलें होतें इतकेंच; पण हेलेना हेंच त्याचें खरें आवडीचें घर आहे. त्यामध्यें राहण्याकरितां तें आलें आहे तेव्हां तें तेथून आतां हलणार नाहीं !

**लायझॅन्डर**—अगे हेलेने, हें अगदीं खोटें—धडधडीत खोटें !

**डिमेट्रियस**—ज्या प्रेमाची तुला कल्पना देखील नाहीं त्या प्रेमाला अशा रीतीनें तूं निंदूं नको. नाहीं तर संभाळ—तुझ्या प्राणावर येऊन बेतेल. ती पहा तुझी प्रिया येत आहे. ती—ती पहा पलीकडे आली.

**हर्मिया**—( पुन्हा प्रवेश करून ) अंधेऱ्या रात्रीं डोळ्यांना आपलें पाहण्याचें काम करितां येत नाहीं हें खरें; पण त्याच मानानें कानाचें जें ऐकण्याचें काम तें त्यांना दुप्पट चांगलें करितां येतें. काळोख हा डोळ्यांची पाहण्याची शक्ति कमी करितो, पण त्याच्या ऐवजीं तो कानांची शक्ति दुप्पट करितो. अरे लायझॅन्डर, माझ्या डोळ्यांना तुला शोधून काढतां आलें नाहीं तरी, तुझा शब्द ऐकून तुझ्या मागोमाग कानांनीं मला येथपर्यंत आणिलें. पण इतक्या निर्दयपणानें तूं मला सोडून तेथून कां बरें आलास ?

**लायझॅन्डर**—ज्याला प्रेम पुढें ढकलीत आहे त्यानें तेथेंच काय म्हणून रहावें ?

**हर्मिया**—लायझॅन्डर मजजवळ असल्यावर कोणाचें प्रेम त्याला तेथून ओढून नेईल ?

**लायझॅन्डर**—आकाशांतील ताऱ्यांहून जिचे डोळे रात्रींच्या वेळीं फार तेजस्वी दिसतात, त्या हेलेनेवर माझें जें प्रेम

आहे तें मला तेथें राहूं देईना; पण माझा शोध करीत करीत तूं कां आलीस? तूं मला अगदीं आवडत नाहींस, म्हणूनच मी तुला सोडून आलों, हें तुझ्या ध्यानांत आलें नाहीं का?

**हर्मिया**—छे! तूं आपल्या मनांतलें खरें खरें सांगत नाहींस.

**हेलेना**—ही देखील ह्या कटवाल्यांपैकींच दिसते! माझी विटंबना करून, मला अगदीं तुच्छ करून टाकण्यासाठीं या तिघांनीं मिळून हा विश्वासघातकी खेळ आरंभिला आहे. हर्मिये, तूं किती निर्दय आहेस! कृतघ्न पोरी! अशा रीतीनें मला फसवून, माझें हंसूं व्हावें ह्मणून तुह्मी हें जाळें पसरिलें आहे काय? एकमेकींवर विश्वास ठेवून आपण आजपर्यंत एकमेकींना आपल्या मनांतल्या गोष्टी सांगितल्या; तशाच अगदीं सख्या बहिणीप्रमाणें आपण एकमेकींशीं वागलों; व एकमेकींशीं हितगुज करण्यांत आपण गुंग होऊन गेलों असतां, घरीं जावयाचें भान राहत नसे; आणि तेव्हां देखील आपणाला एकमेकींपासून वेगळें व्हावें लागेल या भयानें अगदीं जलदीनें निघून जाणाऱ्या वेळेची आपण 'मेल्या मेल्या' ह्मणून शिव्यांनीं निंदा करीत असूं.–हें कांहीं तुला आठवतें का?—अगदींच विसरलीस अं? आपण शाळेंत जात होतों तेव्हांची आपली मैत्री तूं अगदींच विसरलीस

काय ? व कोणालाही उपद्रव करावयाचा नाहीं अशा बाळपणच्या सात्विक वृत्तीला तूं पारखी झालीस काय ? ज्याप्रमाणें दोन देवतांनीं एकच वस्तु उत्पन्न करावी, त्याप्रमाणें तूं व मी मिळून एकाच गादीवर बसून, एकच गाणें ह्मणत असूं, व जे सूर काढीत असूं ते एकांत एक मिळून गेल्यामुळें दोघींनीं मिळून एकच सूर काढला असें वाटत असे; इतकेंच केवळ नाहीं, तर याप्रमाणें जसे काय आपले हात, आपलीं शरीरें, आपले आवाज, आपलीं मनें हीं एकच आहेत—अशा रीतीनें आपण वागत असूं तें तूं विसरलीस काय ? अशा रीतीनें आपण आपल्या सुयांनीं एकच फूल गुंफलें होतें ह्याची तुला आठवण आहे काय ? तसेंच करंदीवरच्या एखाद्या गोड फळाप्रमाणें दिसण्यांत वेगळ्या पण आंतून एकजीव अशा आपण लहानाच्या मोठ्या झालों. एकाच डेखाळा करंदाचीं दोन नाजुक फळें येतात, त्याचप्रमाणें अंतःकरणें मात्र एक पण शरीरें भिन्न अशा आपण होतों. एखाद्या सरदाराचीं दोन चिलखतें असावीं व त्या चिलखतांवर घालण्याचा टोप मात्र एक असावा, त्याप्रमाणें आपण दोघी होतों. अशा प्रकारें लहानपणापासून वाढत आलेलें जें आपलें प्रेम त्याच्या मुळावरच तूं कुऱ्हाड घालतेस काय ? आणखी या दोघांच्या कटांत मिळून, तूं आपल्या दीन मैत्रिणीची

विटंबना करतेस काय? असें करणें मैत्रीला खचित उचित नव्हे. स्त्रीजातीलाही हें कृत्य शोभण्यासारखें नाहीं. यापासून मला एकटीलाच दुःख झालें असतें तर चिंता नव्हती. मी एकटीच काय पण सर्व स्त्रीजाती याबद्दल तुला दोष दिल्याशिवाय राहणार नाहीं हें लक्षांत आण.

**हर्मिया**—हें तुझें रागाचें बोलणें ऐकून मी अचंब्यांत पडलें आहें. मी तुझा तिरस्कार करीत नाहीं. तूं मात्र माझा द्वेष करितेस असें दिसतें.

**हेलेना**—फार चांगलें! माझी फजिती करण्यासाठीं तूं लायझॅन्डरला माझ्या डोळ्यांचें व रूपाचें वर्णन करावयाला माझ्या मागोमाग पाठविलेंस, हें खरें ना पण? लायझॅन्डरप्रमाणेंच तुजवर प्रेम करणारा व मला नुक्तेंच ज्यानें लाथेनें झुगारून दिलें त्या डिमेट्रियस यालाही 'देवी' 'परी' 'जिचें स्वरूप सगळ्या पृथ्वीवर क्वचितच दृष्टीस पडेल अशा प्रकारची, व जिच्या रूपाला कसलीच उपमा देतां येणार नाहीं अशा अशा नाना प्रकारांनीं मला हाका मारायला तूं पाठविलेंस, हें खरेंना पण? तसें जर नसतें तर जिचा तो द्वेष करितो तिला त्यानें अशा रीतीनें काय ह्मणून हाका माराव्या आणि लायझॅन्डरच्या अंतःकरणांत तुजविषयीं येवढें अपार प्रेम नांदत असतांना तें तुजवर नाहीं आणि मजवर मात्र अत्यंत जडलें आहे असें सांगाव-

याला, तुझ्या संमतीवांचून व तुझ्या चिथवणीवांचून तो कधीं तरी धजता काय? लोकांना मी तुझ्याइतकीं जरी आवडत नसलें, तुझ्याइतकी मी जरी भाग्यशाली नसलें, आणि मला कितीहि वाईट दशा आली असली, आणि मी माझ्या प्रियकरावर प्रेम करीत असूनही त्याची प्रीति जरी मजवर नसली, तरी तूं माझी विटंबना करावीस असें मी तुझें काय नुकसान केलें आहे? वास्तविक ह्मटलें ह्मणजे माझी केंविलवाणी स्थिति पाहून तुला दया यावी—ती राहिली बाजूस! पण उलट तूं मांझी छी थू करायला तयार व्हावेंस हें केवढें आश्चर्य?

**हर्मिया**—तूं हें काय ह्मणतेस त्याचा कांहींच अर्थ मला समजत नाहीं.

**हेलेना**—बरें आहेग! असेंच चालूंदे बाई!—अग थोडें तरी वाईट वाटण्याचें सोंग कर, आणि मी पाठ फिरविली कीं लागलीच मला वेडावून दाखीव; आणि एकमेकांकडे पाहून डोळे मिचकिव, आणि थट्टेची ही बतावणी अशीच चालूं दे. एकंदरीनें पाहतां ही बतावणी अगदीं सोळा आणे झाली आहे आणि तेणेंकरून खरोखरच तुझ्या मनाला मोठा संतोषच होईल. खचित, पुढेंमागें ग्रंथांत लिहून ठेवण्यासारखी ही एक गोष्ट होईल! तुला माझी कींव आली असती, अनाथावर परोपकार कर-

ण्याची बुद्धि तुझ्या ठिकाणीं असती आणि संभावित पणानें कसें वागावें हें जर चांगलें समजत असतें तर मला या दशेला आणून, तूं माझी अशी फजिती केली नसतीस. असो. ईश्वर तुझें कल्याण करो. कांहीं अंशीं तो माझाच अपराध आहे. मी लवकरच येथून तोंड काळें करीन किंवा मरेन, ह्मणजे तो अपराध आपोआप नाहींसा होईल. याला दुसरी तोडच नाहीं.

**लायझॅन्डर**—रमणीय हेलेने! अंमळ उभी तरी रहा. माझें ह्मणणें काय आहे तें ऐकून तर घे. प्राणप्रिये, जिवलगे, सुंदर हेलेने !

**हेलेना**—वाहवा! छान बतावणी चालली आहे!

**हर्मिया**--प्रियकरा, अशा रीतीनें खरेंच तिचा उपहास करूं नका.

**डिमेट्रियस**—तिच्या विनंतीवरून लायझॅन्डर यानें तिला चिडविण्याचें बंद केलें तर ठीकच आहे; नाहींतर त्याला गप्प बसविण्याला मला कांहीं फारसा वेळ लागणार नाहीं!

**लायझॅन्डर**—जें काम तिच्या विनंतीनें व्हावयाचें नाहीं तें आपणाच्यानेंही व्हावयाचें नाहीं; समजला? तिच्या नम्र विनंतिपेक्षां तुझ्या धमकावणीमध्यें कांहीं अधिक सामर्थ्य आहे अशी गोष्ट नाहीं. हेलेने! मी तुझ्यावर खरी प्रीति करितों.—अग करीन खचित—माझी शपथ, मी तुझ्यावर

प्रीति करीन! तुझ्यासाठीं मी जिचा त्याग केला तिची देखील शपथ घेऊन, मी सांगतों कीं जो डिमेट्रियस तुझ्यावर आपलें प्रेम आहे असें ह्मणत आहे तो लबाड आहे.

**डिमेट्रियस**——हेलेने, लायझॅन्डरपेक्षां मीच तुझ्यावर अधिक प्रेम करितों—हें खोटें सांगत नाहीं!

**लायझॅन्डर**——बरें बरें! समरांगणांत चल व आपलें ह्मणणें खरें करून दाखीव!

**डिमेट्रियस**——चल, तर जलदी कर. या गोष्टीला माझी ना नाहीं!

**हर्मिया**——अशा रीतीनें एकमेकांशीं लढण्यांत आपला हेतू काय आहे?

**लायझॅन्डर**——शिद्दिणी! तूं चालती हो येथून!

**डिमेट्रियस**——नाहीं! नाहीं! तें होणार नाहीं! त्याला समरांगणावर आलेंच पाहिजे. एखाद्या वेड्या माणसाप्रमाणें त्याची स्थिति झाली आहे. तूं लढायला तयार होतासंना? अशा बाता मारतोस?—तोंड कां लपवितोस? मित्रीमागुबाई! जा! आपलें तोंड लपीव जा!

**लायझॅन्डर**——अग ए मांजरी!—काटेरीवेल कुठली!—मिठी मारून मला अशी थांबवूं नको. डिमेट्रियसच्या मागें जाऊं दे. नाहीं तर बघ, तुला मी उचलून फेंकून देईन!

**हर्मिया**—प्रियकरा, तूं इतक्या उर्मटपणानें कां बरें बोलतोस!

**लायझॅन्डर**—काय तूं मला प्रियकरा ह्मणून हांक मारितेस ? तांबडी शिद्दिण कोठली ! चल, चालती हो ! तूं एखाद्या कंटाळवाण्या कडू व ओकारी आणणाऱ्या औषधाप्रमाणें आहेस ! येथून तूं आधीं चालती हो पाहूं !

**हर्मिया**—तूं हें थट्टेनें तर नाहींना बोलत ? हें सर्व खरें खरें आहे काय ?

**हेलेना**—हं ! त्याला असाच हळुहळु शांत कर ! चालूं दे असेंच !

**लायझॅन्डर**—अरे डिमेट्रियस ! तुझ्याशीं लढण्याची जी प्रतिज्ञा केली आहे, ती मी मोडणार नाहीं, पक्कें लक्षांत ठेव.

**डिमेट्रियस**—तुझ्याकडून मी जर करार लिहून घेतला असतां तर बरें झालें असतें ! कारण वचनाची तुला फारशी पर्वा आहे असें दिसत नाहीं. ती असती तर हर्मियेनें मिठी मारतांच तूं उभा राहिला नसतास. !

**लायझॅन्डर**—तर मग मी काय तिला इजा करूं होय ? तिला मारूं ? तिला ठार करूं ? छे, छे ! मला ती जरी दृष्टीसमोर नको असली तरी मी कांहीं तिला अशा रीतीनें इजा करणार नाहीं.

**हर्मिया**—मी जर तुला दृष्टीसमोर नको असलें तर तूं मला ठार मारलेंस तरी हरकत नाहीं ! मी तुला दृष्टीसमोर न-

कोना ?–तें कां बरें ? अरे देवा! प्रियकरा, मी तुह्मांला नको हें कांहीं मला ठाऊक नव्हतें. मी आपली हर्मिया नव्हेका ? आणखी तूंही लायझॅन्डरचना ? थोड्या वेळापूर्वी तूंच माझ्या स्वरूपाची स्तुति करीत होतासना ? गेल्या रात्रींच तूं मला सांगत होतास कीं मी तुजवर अतिशय प्रीति करितों ह्मणून; आणि गेल्या रात्रींच तूं मला असा सोडून चालता झालास! तर आधीं सांग–तूं मला सोडून कां गेलास ? देव करो आणखी तसें न घडो—पण खरोखरच तूं माझा त्याग केला आहेस काय ?

**लायझॅन्डर**—माझी शपथ, तुझी भेट कधीं होऊं नये अशी मनापासून माझी इच्छा आहे. ह्मणून या बाबतींत तूं कांहीं आशा धरूं नको–किंवा मी सांगतों यांत मनांत शंका ठेवूं नको. तूं मला नको आहेस हें मी अगदीं खरें खरें बोलत आहें–हें तूं अगदीं पक्कें ध्यानांत ठेव. माझें हेलेनेवर प्रेम आहे, ही मात्र थट्टा नसून अगदीं खरीखरी गोष्ट आहे.

**हर्मिया**—( डिमेट्रियस यास उद्देशून ) हायहाय! हरामखोरा! फुलांचा नाश करणाऱ्या किड्याप्रमाणें तूं आहेस! अरे चोरा, काल रात्रीं येऊन तूं माझ्या प्रियकराच्या अंतःकरणांतील प्रेम चोरून नेलेंस ?—तूंच नव्हे का ?

**हेलेना**—बतावणी पण बतावणी! तुला कांहीं शरम नाहीं

कां ? स्त्रीजातीची जी लज्जा ती तुझ्यामध्यें नाहीं.— शालीनतेचा गंध देखील तुझ्यामध्यें नाहीं. माझ्या तोंडून आणखी उत्तरें ऐकून घ्यावयाचीं आहेत कीं काय ? धिःकार असो तुला ! कृत्ये ! बाहुली !

**हर्मिया**—बाहुली! हो हो, आतां मला कळलें यांतलें इंगित! आपल्या व माझ्या उंचीची तुलना करून तू आपली उंची त्यांच्या नजरेस आणित आहेस. आपली उंची व आपलें सुस्वरूप या दोन गोष्टींनींच तूं त्याला मोहून टाकिलें आहेस. मी ठेंगणी व खुजी आहें, व तूं उंच आहेस ह्मणून का मला सोडून तो तुजवर प्रेम करूं लागला ? रंगविलेली उंच घोडी कोठली! मी तुझ्यापेक्षां अशी कितीशी लहान आहें ? बोल.—मी कितीशी ठेंगणी आहे ? माझीं नखें तुझ्या डोळ्यांपर्यंत पोंचणार नाहींत इतकी मी कांहीं ठेंगणी नाहीं बरें !

**हेलेना**—बाबानों, माझी जरी तुह्मी छी थू करीत आहां. तरी कृपा करून हीं मला कांहीं अपाय करणार नाहीं एवढी तरी तजवीज करा. दुसऱ्याचे शिव्याशाप घेण्यासारखें कृत्य कांहीं माझ्या हातून घडलेलें नाहीं. मला कांहीं कैदाशिणीसारखी दांडगाई करितां येत नाहीं. मी आपली एक भित्री अबला आहें. तर ती मला मारणार नाहीं असें करा. मी तिजपेक्षां उंच आहें असें कदा-

चित तुह्मांला वाटण्याचा संभव आहे; पण ती मला पुरून उरण्या इतकी खचित उंच आहे.

**हर्मिया**—पुन्हां ठेंगणी ह्मणतेस ? ऐक !

**हेलेना**—हर्मिये ! माझ्याशीं इतकी निर्दय कां होतेस ? सांग आतांपर्यंत मी तुझ्यावर प्रेम करीत आलेंना ? तुझ्या गुप्त गोष्टी मी कांहीं कोणाला सांगितल्या नाहींत; कीं कधीं तुझें नुकसान केलें नाहीं. पण डिमेट्रियसवर माझें प्रेम असल्यामुळें तूं या अरण्यांत पळून येणार हें मात्र मी त्याला सांगितलें. तो माझ्यामागें आला; इतकेंच काय, पण त्यानें मला धमकावून येथून जावयाला देखील सांगितलें; व मार देण्याचा, लाथ मारून हांकून देण्याचा, ठार मारण्याचा देखील त्यानें धाक घातला. तर आतां येवढेंच मागतें कीं मला तूं आपली मुकाट्यानें जाऊं दे. जशी आलें तशीच मूर्खपणा पदरीं घेऊन आपली अथेन्सला जाईन बापडी !—तुझ्या मागें येणार नाहीं. मला जाऊं दे—मी किती साधी भोळी, किती मूर्ख आहें हें तूं पाहिलें आहेसच.

**हर्मिया**—जाईनास कां ? तुला आडवायला कोण बसलें आहे ?

**हेलेना**—मला दुसरें कोण आडवणार ? माझें मन येथें अडकून बसलें आहे, तेंच मला अडवीत आहे ! आणखी कोण ?

**हर्मिया**—लायझॅन्डरवर होय ?

**हेलेना**—नव्हे–डिमेट्रियसवर.

**लायझॅन्डर**—हेलेने, तूं भिऊं नको. ती आतां जागची कसची हालते ?

**डिमेट्रियस**—नाहीं, आपण तिला मदत केली तरी कांहीं तिची छाती नाहीं.

**हेलेना**—अहो, ही संतापते तेव्हां हिचा स्वभाव कोण कठीण ! मग हिच्या जिभेला कांहीं हाड रहात नाहीं. ही शाळेंत जातें असे तेव्हां देखील हिचा स्वभाव अगदीं कोल्हयासारखा दुष्ट होता. ही दिसण्यांत अशी दिसते पण मोठ्या तापट स्वभावाची आहे.

**हर्मिया**—पहा पुन्हा आपलें तेंच ! ठेंगणी, बुडकी ! दुसरें बोलणेंच नाहीं ! ( लायझॅन्डर यास उद्देशून ) तिला माझी अशी छी थू करूं देतोस. मला एकदां तिच्याकडे जाऊं दे !

**लायझॅन्डर**—चालती हो येथून ! ठेंगणी, खुजी ! हरळी कोठली !

**डिमेट्रियस**—हेलेन ! मी तुझ्याशीं कोणताही संबंध ठेवूं इच्छीत नाहीं; ( लायझॅन्डर यास उद्देशून ) मग तिच्याशीं तूं कां लुब्रेपणा करितोस ? हें मात्र बरें नाहीं. तिचें नांव काढूं नको. तिच्यावर तुझें प्रेम आहे असें यत्किंचित जर

मला दिसलें तर तुला तें फार जड जाईल, सांगून ठेवतों !

**लायझॅन्डर**—हर्मियेनें आतां कांहीं माझ्या कमरेला विळखा घातला नाहीं; तर असा समरांगणांत चल, ह्मणजे हर्मियेवर माझा हक्क अधिक आहे कीं तुझा अधिक आहे याचा निर्णय होईल !

**डिमेट्रियस**—चल, माझ्या मागून ये. छे, छे, मीच तुझ्याबरोबर येतों. ( लायझॅन्डर व डिमेट्रियस जातात. )

**हर्मिया**—बाईसाहेब, हे सगळे आपले प्रताप बरें ! हं, आतां जातेस कोठें ?

**हेलेना**—मी तुझ्यावर आतां विश्वास ठेवणार नाहीं, व तुझी भयंकर संगतही पण मला नको. मारण्यासाठीं तुझे हात कसे वळवळत असतात, तरी माझे पाय तुझ्या पायांपेक्षां लांब आहेत. मी चटकन पळून जाईन. ( जाते )

**हर्मिया**—मी तर बाई अगदीं विस्मित होऊन गेलें आहें. आतां येथें ह्मणावें तरी काय ? काय ह्मणावें तें कळत नाहीं.

( जाते. )

**ऑबेरान**—हें पाहिलेंस तुझ्या हयगयीचें फळ ! अझूनही तूं आपली चूक सुधारीत नाहींस व जाणून बुजून ही भूतचेष्टा चालविली आहेस; नाहीं का ?

**पक**—हे पऱ्यांचे बादशहा, मी खरें सांगतों, माझ्या हातून

चूक झाली खरी. ज्याच्या अंगावर अथीनियन पोषाख असेल तोच तो मनुष्य ह्मणून आपणच नव्हतेंका मला सांगितलें? आणि मी अथीनियनच्या डोळ्यांला त्या वनस्पतीचा रस लाविला. मी आपलें काम बरोबर बजाविलें; यांत चक काय केली? चूक नाहीं ही गोष्ट सिद्ध होत आहे. पण माझ्या हातून झालेल्या गोष्टीमुळें त्यांच्यामध्यें हा झगडा माजला, हें पाहून मात्र मला कौतुक वाटतें.

**ऑबेरान**—तूं पहातोच आहेस कीं ते दोघे प्रतिस्पर्धी एकमेकांशीं लढण्यासाठीं कसे जागा पहात आहेत! तेव्हां, अरे रॉबिन, तूं एकदम चोहोंकडे अंधेर पाड. आणि आकाशांत चांदण्या प्रकाशूं लागल्या ह्मणजे त्यांना धुक्याच्या डोहांत बुडवून टाक. व एकमेकांशीं लढावयाला उद्युक्त झालेल्या त्या प्रतिस्पर्ध्यांना असे लांब लांब फिरव कीं त्यांची गांठच कधीं पडूं नये. एकदां, तूं लायसँडर सारखा बोल, व वेडा वांकडा शब्द बोलून तूं डिमेट्रियसला चिडीव, आणि तूं डिमेट्रियस याच्या स्वरानें शिव्या देऊं लाग. आणि अशा रीतीनें चक्रावर बसविल्याप्रमाणें त्यांना एकमेकांपासून इतकें दूर ठेव कीं त्यांची गांठच पडणार नाहीं. आणि त्यांना असे फिरव कीं चालतां चालतां त्यांचे पाय शिशासारखे अगदीं जड होऊन जातील. त्याचप्रमाणें झोंप न आल्यामुळें ते अगदीं मेल्यासारखे होऊन जातील असें कर; एवढेंच

नाहीं, तर जमिनीवर अंग टाकतांच त्यांना गाढ झोंप लागूं दे व त्यांना अगदीं मृतप्राय जमिनीवर पडूं दे. मग ह्या वनस्पतीचा रस लायझॅन्डरच्या डोळ्याला लाव. ह्मणजे ह्या वनस्पतीच्या आंगच्या प्रभावानें पूर्वींच्या वनस्पतीचा गुण नाहींसा होईल. मग सर्व वस्तू पूर्वी त्याला जशा दिसत होत्या तशा फिरून दिसूं लागतील. असें झालें ह्मणजे ते जागे झाल्यावर पाहतील तों झालेला गोंधळ हें स्वप्न होतें कीं काय, असें ह्मणून ते मोठ्या अचंब्यांत पडतील, व आश्चर्य करीत करीत नगरांत निघून जातील. याप्रमाणें पुढें त्यांची जी मैत्री होईल ती आजन्म कायम राहील. इकडे याप्रमाणें तुझें काम चाललें आहे, तोंवर मी आपल्या राणीकडे जाऊन तिच्यापासून तो इंडियन मुलगा पळवून नेतों आणि तिला वेडीपिशी करून त्या राक्षसाच्या प्रेमपाशांत पाडणारी माया तिच्या डोळ्यावरून काढून घेतों.

**पक**—सरकार, हें सर्व काम फार लवकर झालें पाहिजे न्व्हे का ! रात्रीचीं नक्षत्रें झपाट्यानें नाहींशीं होऊं लागलीं आहेत; आणि तो पहा, प्रभातकाळीं सूर्योदयापूर्वी उगवणारा तारा देखील समोर उगवला. हा दिसूं लागतांच, चोहोंकडे भटकणारीं आपलीं तीं भुतें देवळाच्या आवारांत जाऊन आपापल्या मठींत लपून बसूं लागतात. आत्महत्या केलेल्या माणसांचीं भुतें व नदींत बुडवून

मेलेल्यांचीं भुतें, ज्यांना गति मिळणें फार कठिण असतें, अशीं तीं सर्व भुतें किड्यांनीं गजबजलेल्या आपापल्या घरांत केव्हांच गेलीं. जणू सूर्यप्रकाश पडल्यावर आपलीं दुष्कृत्यें उघडकीस येतील असा त्यांना धाक वाटत असावा, आणि या धाकामुळेंच तीं प्रकाशापासून दूर जाऊन रहात असावीं, आणि या धाकानेंच तीं सदोदित अंधेऱ्या रात्रीचा आश्रय करीत असावीं. ह्या गोष्टी सर्व प्रसिद्धच आहे.

**ऑबेरान**—पण तीं भुतें वेगळीं आणि आपण भुतें आहों तीं वेगळीं, आपण निराळ्या प्रकारचीं भुतें आहों. प्रभातकाळीं अंधुक प्रकाश असतां मी आपल्या प्रियेबरोबर अनेक वेळां फिरावयास निघून मौज मारिली आहे, आणि रानांत राहणाऱ्या माणसाप्रमाणें मी गर्द झाडींत देखील वाटेल तेव्हां फिरतों; आम्हांला काय ?—-पूर्वदिशेचा दरवाजा उघडून सूर्य आपलीं किरणें बाहेर फेंकूं लागल्यापासून तों अस्तमानीं पुन्हा तीं सोनेरी करून मागें घेई तोंपर्यंत कोठें फिरणें किंवा न फिरणें हें केवळ आमच्या मर्जीवर आहे. ज्याअर्थीं एकदां हें काम हातीं घेतलें त्या अर्थीं तें शेवटास नेण्यांत त्वरा ही केलीच पाहिजे. ह्मणून उशीर लावूं नको. दिवस मावळण्यापूर्वीं एवढें काम केल्यावांचून ठेवायचें नाहीं बरें !

**पक**—समजलों महाराज, मी त्यांना इकडून तिकडे, व तिक-

डून इकडे असे भटकायलाच लावीन. गांवांत काय, जंगलांत काय, लोक मला ह्मसोबा ह्मणून भितात. हा पहा त्यांतून एकजण आला.

**लायझॅन्डर**—(पुन्हा प्रवेश करून ) तो गर्विष्ठ डिमेट्रियस कोठें गेला हो ? बोला.

**पक**—अरे मूर्खा, हा पहा, मी सज्ज होऊन बसलों आहें. तूं कोठें आहेस ?

**लायझॅन्डर**—हा पहा; मी तडक तुझ्या मागोमागच आलों आहें.

**पक**—चल, ये तर समरांगणांत. ( आवाजाच्या धोरणानें लायझॅन्डर जातो. )

**डिमेट्रियस**—( पुन्हा प्रवेश करून ) लायझॅन्डर, पुन्हा बोल. पळपुट्या, भित्र्या, पळालास काय ? अरे बोल. कोणत्या झुडपाच्या आड दडून बसला आहेस ?

**पक**—ए भित्र्या, काय तूं आकाशांतल्या ताऱ्यांकडे पाहून बढाया मारीत आहेस, कीं झाडां झुडपांना लढाईच्या गोष्टी सांगत आहेस ? काय, करतो आहेस तरी काय ? काय, तूं लढायला येत नाहींस ? पळपुटा, रणभीरू कोठला ! चल, जा येथून. नाहीं तर ये असा समरांगणांत. हट्टी पोराला छड्या मारतात तशा मी तुझ्या पाठीवर छड्या ओढतों. तुला शिक्षा करण्यासाठीं तरवारीला कोणी शीण द्यावा ? तसें करील तो मूर्खच.

**डिमेट्रियस**—तूं आहेस तरी कोठें ?

**पक**—माझ्या आवाजाच्या धोरणानें ये. भिऊं नको. तुझ्याशीं लढतांना मी आपल्या शौर्याचा व धैर्याचा उपयोग करणार नाहीं; संभाळून घेईन

**लायझॅन्डर**—( पुन्हा प्रवेश करून ) माझ्या पुढें पुढें धांवतो, पण समोर येऊन लढण्याचें कांहीं धैर्य त्याला होत नाहीं. त्याचा शब्द तर ऐकूं येतो; तेथें मी गेलों ह्मणजे तेथून तो नाहींसा होतो. हे नीचा, पळण्यांत माझ्या पेक्षां तूं चपळ आहेस खरा ! मी अगदीं सपाट्यानें धांवलों तर तो माझ्या-पेक्षांही वेगानें धांवतो. तर त्याला काय करावें बरें ? अंधार असल्यामुळें येथेंच अंमळ विश्रांति तरी घेऊं या. ( खालीं पडून निजतो. ) अरे दिवसा, तूं तरी उगव एक-दांचा ! कारण तूं आपला अंधुक प्रकाश पाडलास तरी तितक्यानें देखील मी डिमेट्रियस याला हुडकून काढीन, व त्याचा सूड घेईन, कधीं सोडणार नाहीं. तो माझा नेहमी धिःकार करितो; नाहीं काय ? ( झोंपीं जातो. )

( पक व डिमेट्रियस पुन्हा प्रवेश करितात )

**पक**—अरे ए, भित्र्या ! तूं समोर कां येत नाहींस ?

**डिमेट्रियस**—धमक असेल तर मी येईपर्यंत उभा रहा. मी आलों नाहीं, तोंच तूं एका जागेवरून दुसऱ्या जागीं पळून जातोस, हें मला पक्कें कळून चुकलें आहे. माझ्यासमोर उभा राहण्याची तुझी कांहीं छाती दिसत

नाहीं; व मला तोंड दाखविण्याचीही तुझी हिंमत नाहीं. तर आतां तूं आहेस कोठें? बोल पाहूं?

**पक**—चल, इकडे ये. हा पहा मी येथें आहें.

**डिमेट्रियस**—नाहीं, येत नाहीं जा! तूं तर उघड उघड माझी थट्टा मांडली आहेस. सूर्योदयानंतर जर मला तुझें तोंड दिसलें तर त्याबद्दल मी तुला चांगलें प्रायश्चित्त देईन! आतां तुला वाटेल तेथें तूं जा. अगदीं थकून गेल्यामुळें या थंडगार जमिनीवरून माझ्याच्यानें आतां चालवत नाहीं. तरी पण सूर्योदय झाल्यावर मी तुझा समाचार घेतल्यावांचून कांहीं रहात नाहीं, हें पक्कें ध्यानांत ठेव.

( खालीं पडतो व झोंपीं जातो. )

**हेलेना**—( पुन्हा प्रवेश करून ) कोण ही कंटाळवाणी काळरात्र! हे रात्रीं! आतां तूं आपले कांहीं तास कमी तरी कर; व पूर्वेकडून आल्हादकारक प्रकाश येऊं दे. ज्यांना माझ्या सोबतीचा कंटाळा आला आहे, त्यांना सोडून, दिवस उगवतांच मी अथेन्स नगराला निघून जाईन. हे निद्रे, तूं कधीं कधीं दुःखाचा विसर पाडतेस; तूं तरी मजवर आतां दया कर. ( पडते व झोंपीं जाते. )

**पक**—आतां पर्यंत फक्त तिघांची व्यवस्था लागली. आतां आणखी एक शोधून आणला पाहिजे ह्मणजे दोन पुरुष व दोन बायका मिळून चवघे होतील. ही पहा, जी राहिली ती हीच. आपल्या जीवाला कंटाळून जाऊन उदासीन झालेली अशी ती इकडे येत आहे. गरीब बिच्याऱ्या

स्त्रियांना वेड लावणारा मदन हा तरी एक खोड्याळ पोराप्रमाणेंच आहे.

**हर्मिया**—( प्रवेश करून ) आजपर्यंत इतका थकवा आणणारी व एवढें दुःख देणारी वेळ मजवर कधींही आली नसेल. मी दंवानें अगदीं भिजून गेलें आहें. व माझ्या सर्वांगाला कांटे बोंचले आहेत. माझ्याच्यानें पुढें चालवत नाहीं, व पाऊल देखील टाकवत नाहीं. माझ्या इच्छेप्रमाणें माझे पाय मला मदत करीत नाहींत. आतां मी येथेंच विश्रांती घेतें. देव लायझॅन्डरचें रक्षण करो. ( खालीं पडते व झोंपीं जाते )

**पक**—तुला जमिनीवर गाढ झोंप लागो. आपल्या प्रियेवर प्रेम करणाऱ्या माणसा, मी तुझ्या डोळ्याला औषध लावतों. ( लायझॅन्डरच्या डोळ्याला रस लावितो. ) ज्या वेळीं तूं जागा होशील, त्या वेळीं आपली प्रिया पाहतांच, तुला फार आनंद होईल; आणि गांवढळ लोकांत जी ह्मण आहे कीं ज्यानें त्यानें आपापलें ओळखून घ्यावें, त्या ह्मणीप्रमाणें तूं आपल्या प्रियेला ही आपलीच प्रिया ह्मणून ओळखशील. जो तो आपापल्या बायकोला घेऊन बसला ह्मणजे कोणाचाच तंटा रहात नाहीं. ज्याची घोडी हरवली आहे त्याला ती मिळाली ह्मणजे सर्व कांहीं यथास्थित चालतें !

( जातो. )



**थिसियस**——आतां तुमच्या या उपसंहारची मला मुळींच जरूर नाहीं.

मधु. स्वप्नदर्शन अं. ४ प्र. १

The Bombay Art Printing Works, Fort.

# अंक ४ था.

## प्रवेश १.

स्थळ--अरण्य.

( लायझॅन्डर, डिमेट्रियस, हेलेना व हर्मिया यांना झोंप लागली असतां, डाळिंबी, गुलाबी, शेवंती, मोहरी वगैरे अनुचरींसह टिटॅनिया व बॉटम, हे प्रवेश करतात. आणि मागील अंगानें ऑबेरान अदृश्य रूपानें प्रवेश करितो. )

**टिटॅनिया**—ये, या फुलांच्या बिछान्यावर बैस; मी तुझ्या नाजुक गालावरून हात फिरवितें, व कस्तुरीचा वास दिलेलीं गुलाबाचीं फुलें तुझ्या सपाट, गुलगुलीत, मऊशा डोक्यावर घालतें. ये, प्रियकरा, मी तुझ्या सुंदरशा लांब लांब कानाचा मुका घेतें.

**बॉटम**—ती डाळिंबीबाई कोठें आहे ?

**डाळिंबी**—जी सरकार !

**बॉटम**—अगे, ए, डाळिंबी बाई, माझें अम्मळ डोकें खाजीव पाहूं. अग, पण ती गुलाबी कोठें गेली ?

**गुलाबी**—सरकार, ही पहा मी हजर आहें.

**बॉटम**—बरें, अग गुलाबबाई, तूं आपलीं हत्यारें हातांत

घे व लाल ढुंगणाची गुणगुणणारी एक मधमाशी मारून बाभळीच्या कांट्याला टोंचून अडकव, आणि इकडे घेऊन ये. तसेंच माझ्याकरितां एक मधाचें पोळेंही घेऊन ये. पण, ऐकलेंस काग—हें काम करण्यासाठीं फारशी तसदी घेऊं नको बरें का; आणखी हें पहा मधाचें पोळें फुटणार नाहीं अशी खबरदारी घे बरें का. मधाचें पोळें फुटून तें तुझ्या अंगावर सांडलेलें पाहणें आपल्याला कांहीं आवडणार नाहीं बोवा ! बरें पण ती चणचणीत स्वभावाची मोहरीबाई कोठें आहे ?

**मोहरीबाई**—ही मी येथेंच आहें सरकार.

**बॉटम**—तुझा हात इकडे कर. आतां मर्यादा शिष्टाचार सोडून दे बरें काग.

**मोहरीबाई**—सरकार आपली काय आज्ञा आहे ?

**बॉटम**—काहीं नाहीं; पण माझें डोकें खाजविण्याच्या कामीं तूं या गुलाब बाईला मदत कर. मला आतां न्हाव्याकडे गेलें पाहिजे. कारण माझ्या तोंडावर पुष्कळ केंस आले आहेत असें मला वाटतें. माझे केंस मला बोंचून खाजविण्याचें काम करीत आहेत, तरी मी असा सुंदर गद्धा बनलों आहें कीं खाजविल्यावांचून मला चैनच पडत नाहीं.

**टिटॅनिया**—प्रियकरा, एखादें गाणें ऐकण्याची आपली इच्छा आहे काय ?

**बॉटम**—माझ्या कानाला गायन पुष्कळच चांगलें कळतें, तेव्हां आतां तुणतुणें व तिरकटणें यांच्याच तालसुरावर गाणें चालूं दे.

**टिटॅनिया**—प्रियकरा, आपल्याला खावयास पाहिजे काय ?

**बॉटम**—हो, हो, पाहिजे. एक तोबराभर चंदी; व दुर्मिळ मधुर असें वाळलेलें गवत मिळेल तर फार बरें !

**टिटॅनिया**—माझ्या येथें एक मोठी हुषार परी आहे ती त्या खारीच्या घरांव्यांतून अगदीं नवे दाणे चोरून आणून तुला देईल, मग तर झालें ?

**बॉटम**—एक दोन ओंजळी वाटाणे जरी मला मिळतील तरी पुरे. पण हें पहा, माझी एक विनंति आहे. मला झोंप येत आहे तेव्हां कोणीही त्रास देऊं नये ह्मणून आपल्या दासदासींना आधीं ताकीद दे पाहूं.

**टिटॅनिया**—तूं नीज, व तुला मिठी मारूनच मी पडतें. पऱ्यांनों ! वाट फुटेल तिकडे तुह्मीं आधीं चालत्या व्हा कशा !

( पऱ्या जातात. )

जसें मीं आतां करतें आहें त्याचप्रमाणें कडुलिंबाचे वृक्षावर गुळवेल आणि पिंपळावर कुसरीची वेल हीं देखील अशींच एकमेकांना आलिंगन देऊन राहतात ! मला तूं किती आवडतोस ह्मणून सांगूं ! तुझ्यापासून मला जें सुख होत आहे त्याचें वर्णन मी किती ह्मणून करूं !

( तीं निजतात )

ऑबेरान—( प्रवेश करून ) अरे रॉबिन, तूं बरा आलास. ही मजा तूं पाहिलीस काय ? तिच्या या प्रेमचेष्टा पाहून मला तर बोवा तिची भारी कींव येते. अरे, मी तिला नुकतीच पाहिली तों ती या जंगलाच्या मागच्या बाजूला या गाढवासाठीं ह्मणून सुंदर सुंदर फुलें गोळा करीत होती. तेव्हां मी तिची चांगलीच शोभा केली. तिनें त्याच्या गळ्यांत सुंदर व सुवासिक अशा पुष्पगुच्छाच्या माळा घातल्या होत्या; आणि दंवाचे गोल बिंदु त्यावेळीं मोत्यासारखेच चमकत असून त्या फुलांवर अश्रूसारखे दिसत होते; व त्या गाढवाच्या गळ्यांत पडल्यामुळेंच तीं अश्रू गाळीत आहेत कीं काय असें क्षणभर वाटलें. ही संधी साधून मी तिला टोंचून बोलूं लागलों, व जसजसा मी बोलूं लागलों तसतशी तीही मला गप्प करण्याच्या हेतूनें माझ्या प्रार्थना करूं लागली. तेव्हां तिनें चोरून आणलेला तो इंडियन मुलगा तिच्यापाशीं मी मागितला; व तिनें तो लागलीच बिनबोभाट माझ्या स्वाधीन केला, आणि जा, त्या मुलाला लतामंडपांत नेऊन पोंचीव ह्मणून एका परीला सांगितलें. तो मुलगा मला मिळाला; आतां तिच्या डोळ्यांवरची भुरळ मी काढून टाकतों. आणि ह्या अथीनीअन माणसाच्या डोक्याला तूं बसविलेलें हें गाढवाचें तोंड आतां काढून

घे; ह्मणजे तो जागा होतांच इतरांबरोबर त्यालाही पण अथेन्सला परत जातां येईल, व या रात्रीं ज्या गोष्टी घडल्या आहेत त्या केवळ एखाद्या त्रासदायक स्वप्नांतल्याप्रमाणें त्याला वाटतील. पण अगोदर मी टिटॅनियेची सुटका करतों. अगे टिटॅनिये! अगोदर तूं होतीस तशी फिरून हो. तुला दिसत होतें तसेंच फिरून दिसूं लागो. मदनाच्या पुष्पावर रतीच्या कळीचा एवढा विलक्षण अम्मल चालतो अं ! माझी आवडती राणी टिटॅनिया तूंच आहेस—तर तूं आतां जागी हो पाहूं !

**टिटॅनिया**—प्रियकर ऑबेरान महाराज ! स्वप्नांत मला कितीतरी चमत्कार दिसले हो! एका गाढवाच्या प्रेमपाशांत मी सांपडलें होतें असें मला वाटतें.

**ऑबेरान**—हं ! तेंच तुझें प्रेम बरें !

**टिटॅनिया**—या गोष्टी कशा बरें घडून आल्या ? माझ्या डोळ्यांना तर तो आतां किती तरी हिडिस दिसत आहे !—किती ओंगळ त्याचें स्वरूप !

**ऑबेरान**—अग थांब, कांहीं वेळ गप्प राहा ह्मणजे सर्व उलगडा होईल. अरे रॉबिन! त्याचें डोकें आतां काढून घे पाहूं. अग टिटॅनिये! गायन-वादन करण्यासाठीं आपल्या पऱ्यांना तरी अंमळ बोलाव; व हर्मिया, लायझॅन्डर, हेलेना, डिमेट्रियस आणि बॉटम या पांचजणांना अगदीं गाढ निद्रा लागून, ते निचेष्ठ पडतील असें कर.

**टिटॅनिया**—( पऱ्या हजर झाल्यावर त्यांना ) चालूं द्या गे गायन-वादन ! असें मधुर गायन करा कीं तें ऐकतांच कोणालाही झोंपच यावी. ( वाद्यें वाजतात. )

**पक**—मूर्खा, जसा तूं पूर्वीं पाहत होतास तसाच जागा झालास ह्मणजे पहा.

**ऑबेरान**—हं ! चला तुमचें गाणें चालूंद्या. प्रिये ! ये. बरें हातांत हात घालून, हीं माणसें ज्या ठिकाणीं झोंपी गेलीं आहेत त्या ठिकाणीं आपण इकडून तिकडे फिरूं या. आतां बरीक तुझी व माझी ठीक गट्ठी जमली ! ऐकलेसग ? उद्यां रात्रीं थिसीयस राजाच्या वाड्यांत आपण आनंदानें नाचूं व त्याचें आयुष्य सुखांत जावो असा आशीर्वाद देऊं—यावर तुझें काय ह्मणणें ?

**पक**—सरकार, चंडोल पक्ष्याचा प्रभातकालचा कलकल शब्द आपणाला ऐकूं आला काय ?

**ऑबेरान**—प्रिये ! पृथ्वीच्या ज्या भागावर रात्र असेल त्या भागावर आपण जाऊं चला. ह्या चंद्राच्या गतीपेक्षां आपली गती कितीतरी अधिक आहे !

**टिटॅनिया**—बरें आहे. चलावें प्राणेश्वरा ! मी निजलें असतांना, मनुष्य प्राण्यांनीं गजबजलेल्या या ठिकाणीं मी कशी येऊन पडलें, हें वाटेनें जातां जातां मला सांगाल काय ?

( जातात )

( आंतल्या अंगाला शिंगें वाजतात. )

( थिसियस, हिपोलायटा, ईजियस व त्याचे अनुचर प्रवेश करतात. )

**थीसियस**—कोणी तरी जाऊन त्या पारध्याला शोधून काढा पाहूं. आमचा समारंभ आतां समाप्त झाला. तर हा उरलेला दिवस माझ्या प्रियेला मी आपल्या कुत्र्यांचें गाणें ऐकविण्यांत घालवीन ह्मणतों. पश्चिमेकडच्या त्या दरींत त्यांना मोकळें सोडा पाहूं. पण कोणाला तरी पाठवून आधीं त्या पारध्याला शोधून काढा. ( एक नोकर जातो ) सुंदरी! आपण त्या टेंकडीवर जाऊं व त्या कुत्र्यांचें भुंकणें व त्याचा प्रतिध्वनि ऐकूं; चला बरें!

**हिपोलायटा**—बरें आहे. माझी ना नाहीं. महाराज, एकदां मी जंगलामध्यें सहज फिरावयास गेलें होतें तेव्हां स्पार्टा येथील कुत्र्याकडून एका अस्वलाची शिकार चालली होती, ती मी पाहिली. त्या कुत्र्यांच्या भुंकण्यासारखें भुंकणें माझ्या ऐकण्यांत आजपर्यंत आलें नाहीं. कारण झाडी, आकाश व जलप्रदेश आणि आसपासचीं दरोबस्त ठिकाणें त्या कुत्र्यांच्या भुंकण्यानें दणाणून गेलीं. तशा प्रकारची गंभीर गर्जना आजपर्यंत माझ्या कानीं पडली नाहीं.

**थीसियस**—माझे कुत्रेही त्याच स्पार्टन जातीचे असून त्यांचीं तोंडें तशींच रुंद आहेत. त्यांचा रंगही पण तसाच वाळू-

सारखा आहे; आणि त्यांचे कानही पण अगदीं जमीनी-पर्यंत पोंहोंचणारे–जणुं काय, डोंगरावरच्या गवतावर पडलेलें दंव झाडून टाकण्यासाठींच ते लांब लांब केलेले आहेत, असें वाटत आहे व थेसली येथील बैलांप्रमाण त्यांचे गुढघे कमानदार वांकलेले असून त्यांच्या जिभां-मधून लाळ गळत आहे. दवडीच्या कामीं ते कांहींसे मंद असतात हें खरें; पण त्यांचे आवाज घंटानादासारखे असून ते एकमेकांशीं मेळाचे आहेत. माझ्या कुत्र्यांच्या सारखें ओरडणें–माझ्या कुत्र्यांच्या मधुर आवाजासारखा आवाज, ह्या सबंध क्रीटद्वीपा मध्यें, स्पार्टा नगरामध्यें किंवा थेसली प्रांतामध्यें–कोठेंही ऐकूं येणार नाहीं; किंवा कोणीही शिकारी आपलें शिंग वाजवून तसला आवाज काढूं शकणार नाहीं. तूं ऐकशील तेव्हां मी सांगतों याची खात्री तुला पटेलच. पण थांब. या कोण बरें आल्या ?

**इजियस**—महाराज, ही परी नव्हे. येथें झोंपीं गेली आहे ती ही माझी मुलगी आहे; आणि हा लायझॅन्डर, हा डिमे-ट्रिअस व ही हेलेना, आपल्या त्या म्हाताऱ्याची मुलगी. हीं चारीं माणसें येथें जंगलांत अशा या वेळीं कशाला आलीं, कोण जाणे बोवा ! मला तर याचें आश्चर्य वाटतें.

**थीसियस**—त्यांत आश्चर्य तें कसलें ? मधुमासांत पा-हांटे उठून विहार करावा म्हणून मौजेखातर आम्हीं

ज्याप्रमाणें येथें आलों आहों, त्याप्रमाणेंच हीं आलीं असतील; आणखी काय ? आणि आह्मीं इकडे आलों आहों हें ऐकून आमच्या समारंभांत शिरावें व तो साजरा केल्याचें श्रेय अनायासें घ्यावें अशा हेतूनेंच या बाजूला ते वळले असतील. पण काय हो, हर्मियेचें कायतें निश्चित उत्तर ती आजच देणार आहे ना ?

**इजियस**--होय, महाराज.

**थीसियस**—( नोकरांस. ) जा, व शिंगें वाजवून कुत्र्यांना जागें करावयाला शिकाऱ्यांना सांगा.

( आंत ओरडाओरड होते व शिंगें वाजलेलीं ऐकूं येतात. लायझॅन्डर, डिमेट्रियस, हेलेना, व हर्मिया दचकून जागीं होतात. )

या तुह्मीं अशीं या. वसंतऋतूला आरंभ होऊन तो अर्धा अधिक निघून गेला नाहीं काय ? आणि रानांत पक्ष्यांचीं जोडपीं एकत्र होऊं लागलीं नाहींत काय ?

**थीसियस**—थांबा, तेथेंच उभे रहा. अगोदर हें मला सांगा--तुह्मीं दोघेजण एकमेकांचे प्रतिस्पर्धी असून शत्रु होतां हें मला माहीत आहे; पण एकमेकांबद्दलचा द्वेषभाव, व एकमेकांबद्दलची असहिष्णुता ह्या वृत्तींचा लोप झालेला दिसत असून, या वेळीं परस्परांपासून अपाय होण्याची कांहींएक धास्ती मनांत न आणतां, तुह्मीं एके ठिकाणीं झोंपीं गेलां हें कसें! मला तर वाटतें जगांत अशी गोष्ट कोठेंही आढळावयाची नाहीं !

**लायझॅन्डर**—सरकार, मी अर्धा झोंपेंत व अर्धा जागा असल्यामुळें माझें उत्तर एखाद्या घाबरलेल्या माणसाच्या बोलण्याप्रमाणें वाटेल. पण खरें पुसाल तर मी–अगदीं शपथ घेऊन सांगतों—मी येथें कसा आलों हें माझें मलाच कळत नाहीं. पण मला वाटतें—मी हें अगदीं खरें खरें सांगत आहें. हो! हो!–मी हर्मियेबरोबर येथें आल्याचें मला आतां आठवतें खरें. अथेन्स नगरच्या कायद्याची येथें भिती नाहीं. तेव्हां अशा ठिकाणीं निघून जाण्याचा आमचा हेतू होता.

**ईजियस**—सरकार! पुरे, पुरे, आपल्याला पाहिजे होता तसा पुरावा मिळाला. मी ह्मणतों कीं यांस कायद्याप्रमाणें शिक्षाच व्हावी. हीं दोघें चोरून पळून चाललीं होतीं. व तुमच्या व आमच्या हातावर तुरी ठेवून यांनीं आपणांस सर्व प्रकारें फसविण्याचा घाट घातला होता यांत शंका नाहीं. अहो, कदाचित तुमची बायको देखील यानें पळवून नेली असती! काय नेम सांगावा? लग्नाला अनुमोदन देण्याच्या माझ्या हक्काची कथा काय? तो तर यांनीं केव्हांच गुंडाळून ठेवला!

**डिमेट्रियस**—(लायझॅन्डर व हर्मिया यांजकडे बोट करून) महाराज, हीं दोघें चोरून पळून जात आहेत, हें हेलनेनें मला येऊन सांगितलें व याच जंगलांत पळून जाण्याचा

त्यांचा बेत झाला आहे असेंही ती ह्मणाली. मला या गोष्टीचा संताप आला. व यांचा शोध काढीत येथवर आलों. हेलेनेचें प्रेम माझ्यावर असल्यामुळें तीही माझ्या मागोमाग आली. ती कां आली हें मला माहीत नाहीं. पण ती माझ्या मागोमाग आली एवढें बरीक खरें. हर्मियेवरील माझें प्रेम सांप्रत बर्फाप्रमाणें वितळून गेलें आहे. खरें पुसाल तर आतां हेलेनेवरच काय तो माझा जीव राहिला आहे. आणि अत्यंत सद्गुणी स्त्री कोण आहे असा जर कोणी मला प्रश्न केला, तर ती एक हेलेनाच होय असें मी निष्कपटपणें सांगेन, फार काय सांगूं ?—अहाहा ! ती हेलेना माझ्या डोळ्यांना सांप्रत किती तरी आनंद देत आहे ! हर्मिया माझ्या दृष्टीस पडली नव्हती तेव्हां हेलेनबरोबर लग्न करण्याचा माझा विचार होता; पण अजारी मनुष्याला अन्न पाहिल्याबरोबर जशी ओकारी येते व प्रकृति बरी होतांच त्याची पुन्हां अन्नावर रुचि बसते, तशी आतां माझी गत झाली आहे. मी तर बोवा आतां लग्न करणार तें हेलेनेशींच करणार. इत:पर तिच्याशीं मीं अगदीं प्रामाणिकपणानें वागेन.

**थीसिअस**—वाहवा ! उत्तम झालें ! तुह्मांसारख्या प्रेमीजनांची गांठ पडली हें आमचें भाग्यच आम्हीं समजतों. तुमची इत्थंभूत हकिगत ऐकण्याची आमची फार इच्छा आहे ती आम्ही लवकरच विचारूं. ( इजियसकडे वळून )

अहो, तुमचा अर्ज तूर्त एकीकडे ठेवतों; व मी हुकुम करतों त्याप्रमाणें आधीं करा. हें समोरच देऊळ आहे तेथें जाऊन आमच्या लग्नाबरोबरच यांचीं लग्नें व्हावीं अशी आमची इच्छा आहे. सकाळचा वेळ बहुतेक आतां निघून गेला आहे. त्यापेक्षां आमच्या शिकारीचा बेत आम्ही तहकुब करतों. सर्वांनीं आमच्या बरोबर अथेन्स नगरांत चलावें. आम्हीं तिन्हीं जोडपीं मिळून मोठ्या समारंभानेंच मेजवानी करणार आहों. प्रिये चल.

( थिसियस, हिपोलायटा, इजियस व त्यांच्या तैनातींतील माणसें जातात. )

**हिपोलायटा**—दूरवर असलेले पर्वत ज्याप्रमाणें ढगासारखे वाटतात, त्याप्रमाणें या गोष्टीचें स्वरूप कांहीं निराळेंच दिसूं लागलें आहे.

**हर्मिया**—मीं जर डोळ्यांत अंगुळी घालून पाहिलें तर सर्वच गोष्टींचीं दोन दोन स्वरूपें निरनिराळीं मला दिसतात.

**हेलेना**—आपण ह्मणतां तें अगदीं खरें. एखाद्या माणसाला आपलें हरवलेलें रत्न सांपडलें ह्मणजे हें आपलेंच कीं लोकांचें या विचारांत तो पडतो. कारण कदाचित कोणी येऊन हें माझें आहे असें ह्मणेल कीं काय अशी त्याला क्षणोक्षणीं धास्ती पडते. त्याप्रमाणें माझा डिमेट्रियस मज-

जवळ आहे हें जरी खरें तरी त्याला मी आतां आपला ह्मणावें कीं कसें अशी मला शंका उत्पन्न होते.

**डिमेट्रियस**—आपण जागीं तरी आहों का ? मला तर वाटतें अजून आपण झोंपेंतच आहोंत व आपल्याला हें स्वप्नच पडत आहे. राजेसाहेब येथें आले होते व तुह्मीं आमच्याबरोबरच चला असें त्यांनीं आपल्याला सांगितल्याचें तुला आठवत नाहीं काय ?

**हर्मिया**—होय, आणि माझे बाबाही येथें आले होते, नव्हते का ?

**हेलेना**—आणि या राणीसाहेबही पण आल्या होत्या.

**लायझॅन्डर**—आणि त्यांनीं आपल्याला देवळांत या ह्मणून सांगितलें; नाहीं काय ?

**डिमेट्रियस**— तर मग आह्मीं जागें आहों. चला तर त्यांच्या मागोमाग. चला, व चालतां चालतांच आपण आपल्या स्वप्नांतल्या गोष्टी बोलूं ( जातात. )

**बॉटम**—( जागा होऊन ) माझ्या भाषणांतला खुणेचा शब्द आला ह्मणजे मला हांका मारा रे बोवांनों ! व तेव्हांच मी जबाब देईन. अरे ए सोम्या, " सर्वांग सुंदर पिरॅमस " असे शब्द मला ह्मणायाचे आहेतना ? अरे गोम्या, अरे जवऱ्या, अरे कोणी ठिकाणावर आहां काय ? देवाची शपथ, सर्वजण मला झोंप लागलेली पाहून एकट्याला टाकून

निघून गेलां काय ? मला काय पण नामीं स्वप्न पडलें! तसें कधीं पडलें नसेल. कल्पनेच्या अगदीं बाहेरचें तें होतें. जर एखाद्याला तें स्वप्न सांगितलें तर मनुष्य हा गाढव जातीचा एक प्राणी आहे असें तो चटकन ह्मणेल. मला वाटतें, मीच कांहो गाढव बनलों होतों? मी कोण झालों होतों हें कोणाही मनुष्याला माहीत नसेल. मला वाटतें कीं मी मनुष्य ह्मणवितों पण मनुष्य ह्मणजे काय? अठरा धान्याचें कोडबोळेंच तो नव्हे काय? माझें स्वप्न काय होतें ह्मणाल तर तें कोणत्याही माणसाच्या डोळ्याला कधीं दिसलें नसेल. कानांनीं कोणी ऐकलें नसेल; कोणी लिहिलें नसेल; कोणी वाचलें नसेल; किंवा कोणाच्या ध्यानीं मनींही आलें नसेल. मी आमचा दोस्तदार तो क्विन्स याला हें सर्व मी सांगेन. ह्मणजे त्याच्यावर तो एक पोवाडा करील. त्याला 'बॉटमचें स्वप्न' असेंच नांव आह्मी देऊं. कारण तें स्वप्नच; खरें असें त्यांत कांहींच नाहीं! राजेसाहेबांच्या पुढें करावयाचें आमचें नाटक आटोपल्यावर मी तो ह्मणेन. कदाचित तो पुष्कळ लोकांच्या ऐकण्यांत यावा व त्यांनीं त्याची वाहवा करावी ह्मणून मी तो थिसबीच्या मृत्युनंतर लगेच ह्मणेन. ( जातात. )

# प्रवेश २ रा.

**स्थळ**–क्विन्स याचें घर.

( क्विन्स, फ्ल्यूट, स्नाऊट व स्टार्व्हेलिंग प्रवेश करतात. )

**क्विन्स**—बॉटमच्या घरीं कोणाला पाठविलें आहे कायरे ? अजून तरी तो घरीं आला कीं नाहीं कोण जाणे !

**स्टार्व्हेलिंग**—नाहीं बोवा ! त्याचा पत्ता नाहीं. बहुधा भुतांनीं त्याला नेलें.

**फ्ल्यूट**—तो आला नाहीं तर खेळ चालू करावा कसा ?

**क्विन्स**—छे हो, खेळ चालू करतां येतच नाहीं. पिरॅमस पात्राचें काम करणारा त्याच्यासारखा एकही मनुष्य सगळ्या अथेन्समध्यें मिळावयाचा नाहीं.

**फ्ल्यूट**—आथेन्समधील सर्व कारागिरांमध्येंही तो फार कुशल आहे.

**क्विन्स**—तो देखणाही तसाच आहे व त्याचा आवाज तरी कसा ठसठशीत चांगला आहे.

**फ्ल्यूट**—आवाज जर गोड मसता तर सगळेंच विघडलें असतें.

**स्नग**—मित्रहो, राजेसाहेब वाड्यांतून इकडेसच येत आहेत. व ज्यांचीं नुकतींच लग्नें झालीं आहेत असे दोघे तिघे

सरदारही त्यांजबरोबर आपापल्या बधूंसह येत आहेत. आपला खेळ जर करतां आला असता तर यावेळीं आपल्याला पुष्कळ पैसे मिळवितां आले असते.

**फ्ल्यूट**—अरेरे! गडबड्या बॉटम एकून गेला अं! तर मग भुतांनीं त्याला नेल्यामुळें रोजची त्याची सहा आण्याची मजुरी बुडाली तर! तो जर जिवंत असता तर त्याची सहा आण्याची प्राप्ति काहीं कोठें गेली नसती. त्यानें जर पिरॅमसचें काम केलें असतें तर राजेसाहेबसुद्धां त्याला कांहीं वर्षासन करून दिल्याशिवाय राहिले नसते. व त्या वर्षासनाला तो योग्यही पण होता. पिरॅमसच्या कामासाठीं किंवा कशासाठीं कां असेंना पण रोज सहा पेन्सचें वर्षासन खाण्याची त्याची योग्यता होती खरी बोवा!

**बॉटम**—( प्रवेश करून ) अरे येथें कोणीच नाहींत. आमचे गडी कोठें गेले?

**क्विन्स**—कोण? बॉटम! आज मोठा सुदीन! मोठी सुखाची घटका.

**बॉटम**—मी बोवा तुह्मांला एक चमत्कार सांगणार आहें; पण "काय" असा मात्र प्रश्न कोणी करूं नका! कारण खरें ह्मणाल तर मी कांहीं खरा अथेनियन नाहीं बोवा! प्रत्येक गोष्ट घडली तसतशी मी तुह्मांला सांगतों; ऐका तर खरी!

**फ्रिन्स**—प्रिय बॉटम, सांग. मित्रा, तूं आपली सर्व हकीगत, जशी घडली असेल किंवा तूं पाहिली असशील तशी ती आह्मांला सांग. मनांत कांहीं संशय अथवा संकोच धरूं नको. ती ऐकावयाची आह्मांला पराकाष्ठेची उत्कंठा उत्पन्न झाली आहे. आह्मीं ती शांतपणें मनापासून ऐकतों.

**बॉटम**—स्वतःची हाकिगत मी काहींच सांगत नाहीं. तुह्मांला जें कांहीं सांगावयाचें आहे तें हेंच कीं राजेसाहेबांचें जेवण झालें आहे. तर आतां आपले खेळाचे पोषाख एके ठिकाणीं जमवा. आपल्या मुखवट्यांना चांगल्या दोऱ्या बांधा, नाहीं तर ते आयते वेळीं तोंडावरून निसटतील; आणि आपल्या दरबारी बुटांना नव्या गुंड्या लावा. सर्वांनीं राजवाड्यामध्यें जमावें; समजलांनारे बोवानों! प्रत्येकानें आपआपलें काम काळजीपूर्वक बिनचूक करावें. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे असें कीं आपला खेळ पसंत पडला आहे. स्वतः महाराज खुष झाले असून, तो पहावा अशी त्यांसच उत्सुकता उत्पन्न झाली आहे; तेव्हां ही संतोषाची गोष्ट लक्षांत आणून सर्वांनीं मोठ्या उमेदीनें आपआपलीं कामें करावीं असें तुह्मांस माझें सांगणें आहे. हें कसेंही असो; पण थिसबीनें बरीक स्वच्छ कपडे घातले पाहिजेत. वाघाचें काम करणारानें आपलीं नखें

काढूं नयेत, कारण वाढलेलीं नखें असलीं ह्मणजे वाघांचे पंजे शोभतील. माझ्या आवडत्या नटांनों, कांदा, लसूण वगैरे कोणीही खाऊं नये, कारण आपल्या श्वासोच्छ्वासाची कोणाला घाण येतां कामा नये. इतकें झालें ह्मणजे सर्व जण ह्मणतील कीं हें नाटक खरेंच उत्तम सुखपर्यवसायी झालें! असें कोणासही ह्मणतां येईल, हें मी खचित सांगतों; यांत काडीइतकी सुद्धां चूक व्हावयाची नाहीं. हं! चूप! आतां कोणी एक शब्दही बोलूं नये किंवा हूं किं चूं करूं नये! चला, चालूं लागा पाहूं.

( जातात. )



टिटॅनिया—तूं नीज, व तुला मीठी मारूनच मी पडतें.

मधु. स्वप्नदर्शन अं. ५ प्र. १

The Bombay Art Printing Works, Fort.

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—थिसियसचा राजवाडा.

( थिसियस, हिपोलायटा, क्रीडाध्यक्ष, सरदार आणि नोकर चाकर प्रवेश करितात. )

**हिपोलायटा**—प्रियकरा, या प्रेमी जनांच्या सर्वच गोष्टी मला तर बाई मोठ्या विस्मयजनक वाटतात.

**थिसियस**—पण त्या खऱ्या आहेत का? आहेत कीं नाहींत कोण जाणें! तरी पण त्या विस्मयजनक तर खऱ्याच. प्राचीन काळच्या कल्पित गोष्टी व भुतांखेतांचे चत्मकार यांवर माझा विश्वास कधींही बसावयाचा नाहीं. प्रेमबद्ध झालेलीं माणसें व अजागळ माणसें यांची कल्पना-शक्ति इतकी तीव्र असते, कीं कशाही काल्पनिक गोष्टी असल्या तरी तीं त्या खऱ्या मानतात. ज्यांची विचार-शक्ति शांत आणि स्थिर आहे, त्यांना असल्या गोष्टी कधींही खऱ्या वाटणार नाहींत. अजागळ, प्रेमीजन व कवी हे सदासर्वकाळ मनोराज्यांत निमग्न असतात. अजागळ माणसाच्या दृष्टीला चोहोंकडे इतकीं भुतें दिसतात कीं तितकीं कदाचित जगांत असतील कीं कसें याचाच

संशय आहे. एखाद्याचें प्रेम जर अफ्रिकेंतील शिद्दिणीवर बसलें, तर ती शिद्दीण त्याला रतीहूनही सुस्वरूप दिसेल. कवींची गोष्टही तशीच आहे.* कवी रंगांत आला व विचारतरंगात निमग्न होऊन गेला, ह्मणजे

---

* याशीं समानार्थक असे उद्गार आपल्या संस्कृत कवींनीं बरेच ठिकाणीं प्रगट केलेले आढळतात. ते येथें ताडून पाहण्यासारखे आहेत. वरील भाषांतराचें मूळ असें आहे—

*Theseus.*—The Poet's eye, in a fine frenzy rolling,
Doth glance from heaven to earth, from earth to heaven,
And as imagination Jodies forth
The forms of things unknown, the poet's pen
Turns them to shapes and gives to airy nothing
A local habitation and a name.
Such tricks hath strong imagination,
That, if it would but apprehend some Joy,
Or in the night, imagining some fear,
How easy is a bush supposed a bear !

याशीं पुढील आर्या ताडून पहाः—

करबदरसदृशमखिलं भुवनतलं यत्प्रसादतः कवयः ।
पश्यंति सूक्ष्ममतयः सा जयतु सरस्वतीदेवी ॥

हाच आशय धर्मदास नामें एका जैन कवीनें आपल्या काव्य चर्चाविषयक ग्रंथाचे आरंभींच येणेंप्रमाणें दर्शविला आहे.

करस्थनीरोपमविश्वदर्शिनो
जयंति सिद्धा भुवि सत्कवेर्गिरः ॥

विदग्धमुखमंडन.

त्याची दृष्टि, आकाशापासून पृथ्वीपर्यंत व पृथ्वीपासून आकाशापर्यंत गरगर फिरत राहून, सर्व अंतरीक्ष व्यापून टाकते व अस्तित्वांत नसलेल्या गोष्टींना आकार देते; आणि इतकें झालें कीं कवीचें कलम चालू झालेंच. मग अस्तित्वांत नसलेल्या गोष्टींना लांब लांब नांवें मिळूं लागतात व राहण्याचीं ठिकाणेंही प्राप्त होतात. कल्पनाशक्ति एकदां प्रबळ झाली ह्मणजे तिचे खेळ असे चालतात. कल्पनाशक्तीला आनंदांत दंग व्हावयाचें असलें तर जेणेंकरून आनंद होईल असें कारण निर्माण करण्याला तिला फार श्रम घ्यावे लागतात किंवा फार वेळ लागतो असें कांहीं नाहीं. याचप्रमाणें रात्रीचे वेळीं भयाचें कांहीं कारण उत्पन्न झालें तर तिला झाडझुडूप देखील अस्वलाप्रमाणें वाटूं लागतें.

**हिपोलायटा**—ज्या अर्थीं ते प्रेमीजन त्याच त्या गोष्टी पुन्हा पुन्हा सांगत आहेत व त्यांचा एकमेकीशीं मेळही पडत आहे, त्या अर्थीं त्यांच्यांत कांहीं तरी तथ्यांश असला पाहिजे हें उघड आहे. अर्थात, त्या केवळ कल्पनासृष्टींतून आल्या नसून, त्यांना कांहीं तरी अस्तित्व आहे असें वाटतें. तरी त्या अद्भुत व आश्चर्यजनक आहेत यांत संशय नाहीं.

**थीसियस**—हीं पाहिलींसका तीन जोडपीं इकडे येत

आहेत! तीं एकमेकांशीं थट्टा करण्यांत आनंदानें दंग झालेलीं दिसत आहेत.

( लायझॅन्डर, डिमेट्रियस, हर्मिया व हेलेना प्रवेश कारतात. )

प्रिय मित्रांनों, तुह्मांला आनंद प्राप्त होवो, व तुमचीं अंतःकरणें सदोदित प्रेमानें उल्हासी असोत !

**लायझॅन्डर**—महाराज, फिरतांना, जेवतांना, निजतांना—सदा सर्वकाळ आपल्याला आमच्या सर्वांच्याहून पराकाष्ठेचा आनंद असो !

**थीसियस**—आतां तिसरे प्रहरचे फराळ होतील. ते झाले, ह्मणजे संध्याकाळपर्यंत, थोडा थोडका नाहीं, तर तीन तासांचा अवकाश आहे. या अवकाशांत मौजेनें वेळ घालवायला कोणते नाच रंग करावे बरें? हा कंटाळवाणा काळ घालविण्याकरितां एखादें नाटक तयार नाहीं का? अरे, अगोदर कोणी त्या आमच्या क्रीडाध्यक्षाला बोलावा पाहूं.

**क्रीडाध्यक्ष**—सर्व शक्तिमान् थीसियस सरकार, हा मी हजर आहें.

**थीसियस**—आज संध्याकाळचा वेळ मौजेंत घालविण्याची काय व्यवस्था केली आहे? कोणता तमाशा व कोणाचें गाणें ठरविलें आहे? नाहीं तर हा कंटाळवाणा वेळ आम्ही घालवावा तरी कसा?

**क्रीडाध्यक्ष**—सरकार, बरेच खेळ तयार आहेत, त्यांची ही यादी. पहिल्यानें कोणता खेळ सुरू करावयाचा ती आज्ञा व्हावी.

( कागद देतो. )

**थीसियस**—( वाचतो ) (१) " सेंटटाउर्स याजबरोबरची लढाई" यांत सारंगीवर एक खोजा गाईल. आह्मांला तें कांहीं नको. प्रिये, हें गाणें ह्मणजे माझा आजा जो हर्क्युलीज त्याच्या पराक्रमाचें वर्णन; तें मी तुला मागें सांगितलेंच आहे. त्यांत नवीन तें काय ? ( वाचतो ) (२) " रागानें थ्रेशियन गवयाला फाडून टाकणारा मस्त विकानेल्स याचें बंड " हें एक जुनें कथानक; मी जेव्हां थीब्स प्रदेश जिंकून आलों तेव्हां त्याचा प्रयोग केला होता. ( वाचतो. ) ( ३ ) " ज्ञान प्राप्तीकरितां दारिद्र्यावस्थेंत मरण पावलेल्या नऊ विद्याकलांनीं केलेला शोक" हा एक निंदाव्यंजक पोवाडा—तो चांगला मर्मभेदक आणि दोषदर्शक असा आहे खरा; पण तो लग्नसमारंभाच्या प्रसंगीं ह्मणावयाला काय उपयोगी ? ( वाचतो ) ( ४ ) " तरुण पिरॅमस व त्याची प्रिया थिसबी—एक फारच दुःखपर्यवसायी अशी मौज "—आनंददायक व दुःखपर्यवसायी; कंटाळवाणें आणि थोडें ! ह्मणजे हें गरम गरम बर्फच ह्मणायचें ! या विसंगत शब्दांचा मेळ कसा घालावयाचा बोवा ?

**क्रीडाध्यक्ष**—महाराज, हा जो प्रवेश आहे त्याचें नांव मात्र लांबलचक आहे. बाकी, मी जे कांहीं लहान लहान खेळ पाहिले आहेत त्यासारखाच हाही लहानच आहे. पण सरकार, दहा शब्दांच्या लांबलचक नांवामुळें तो फार लांब वाटतो. तसा तो कंटाळवाणाही आहे. कारण त्या सर्व प्रवेशामध्यें एकाही ठिकाणीं एकाही योग्य शब्दाची योजना कोठें सांपडावयाची नाहीं; किंवा एकाही पात्राच्या हातून आपलें नेमलेलें काम बरोबर व्हावयाचें नाहीं. आणखी दुःखपर्यवसायी तर तो आहेच. कारण त्यांत पिरॅमस आत्महत्या करून घेतो. मी जेव्हां त्या खेळाची तालीम पाहिली तेव्हां माझ्या डोळ्यांत अश्रु आल्यावांचून राहिले नाहींत, हें मला कबूल केलें पाहिजे. पण प्रेक्षकांना इतका आनंद झाला होता कीं हसतां हसतां त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु येत होते हेंही पण तितकेंच खरें आहे.

**थीसियस**—बरें, हा खेळ करणारे लोक तरी कोण आहेत ? सांग पाहूं.

**क्रीडाध्यक्ष**—येथलेच कामकरी. नाटक करण्याचें आतांपर्यंत त्यांच्या मनांतही आलें नव्हतें. पण आपलें लग्न होणार हें ऐकून, त्यांनीं मोठ्या परिश्रमानें हें नाटक आपल्यासाठींच तयार केलें आहे.

**थीसियस**—असें आहे तर त्यांचें नाटक एकदां आपल्याला पाहिलें पाहिजे बोवा !

**क्रीडाध्यक्ष**—नको सरकार! कांहीं जरूर नाहीं. आपल्या सारख्यांनीं पाहाण्याजोगा कांहीं हा खेळ नाहीं. मी तो पाहिला आहे, व त्यांत कांहीं अर्थ आहे असें मला वाटलें नाहीं. पण एक गोष्ट मात्र अशी आहे कीं, त्यांनीं पराकाष्टेचे श्रम घेऊन, आपल्याला खूष करण्यासाठीं ह्मणूनच हा खेळ बसविला आहे; तेव्हां त्यांचा हेतू व त्यांनीं केलेली मेहनत हीं लक्षांत आणूनच, आपली मर्जी लागत असली तर तो खेळ आपण पहावा.

**थीसियस**—हो हो! खेळ पाहाण्याची आमची मर्जी आहे. प्रेम व भोळेपणा यांच्या ठिकाणीं गैरशिस्त तें काय आहे ? जा, त्यांना आंत घेऊन ये. स्त्रियांनों, आपापल्या जाग्यावर जाऊन बसा.

( क्रिडाध्यक्ष जातो )

**हिपोलायटा**—हलक्या गरीब लोकांनीं राजनिष्ठा दाखविण्यासाठीं न झेंपण्याजोगें असें एखादें मोठें काम हातीं घ्यावें व विनाकारण आपली फजीति करून घ्यावी, व आपणासारख्यांनीं ती पहावी हें बाई मला आवडत नाहीं.

**थीसियस**—छे! तसें नव्हेग. त्यांची फजीती होईल व ती आपल्याला पाहावी लागेल असें कांहीं मला वाटत नाहीं.

**हिपोलायटा**—त्यांना नाटक करतां येत नाहीं असें आतांच क्रीडाध्यक्ष ह्मणाला, नाहीं का ?

**थीसियस**—असेंच जर खरोखरीं असेल, व त्यांनीं वाईट नाटक करूनही जर आपण त्यांना चांगलें ह्मटलें, तर त्या बिचाऱ्या गरीब लोकांना किती बरें आनंद वाटेल ? त्यांचा खेळ चालला असतांना ते ज्या ज्या चुका करतील, त्या पाहून आपणाला हसूं येईल,हीच मोठी करमणूक होईल.आणि तीं गरीब विचारीं माणसें आपली भक्ति दाखविण्यासाठीं ह्मणून प्रयत्न करीत असतांना, जरी त्यांच्या हातून कांहीं चुका झाल्या तरी त्यांजकडे लक्ष न देतां, त्यांचा हा धंदा नसून त्यांनीं जें कांहीं करून दाखविलें त्याबद्दल उदार मनानें आपण त्यांचें अभिनंदनच केलें पाहिजे. त्यांत गुणावगुण पाहण्याची काय आवश्यकता आहे ? कोठेंही गेलों तरी तेथें मोठमोठे ह्मणविणारे विद्वान लोकही माझा आदर करण्यासाठीं मोठमोठीं भाषणें पाठ करून येतात व तीं मला ऐकावितात. तीं भाषणें ह्मणतांना त्यांना कंप सुटतो, व भीतीनें त्यांची मुद्रा घाबरल्यासारखी होते; जेथें थांबूं नये तेथें ते थांबतात;कारण भीतिमुळें त्यांचा गळा भरून येतो; व माझ्याबद्दल ज्या वाक्यांत पूज्यबुद्धि प्रगट केलेली असते तीं वाक्यें तर बोलायला ते अगदींच विसरतात. प्रिये, अशा प्रसंगीं ते स्तब्ध राहिले तरी देखील त्यांनीं माझा आदरच

केला असें समजून, मी वागत आलों आहें. खोटें नाहीं सांगत ! न भितां धीटपणानें खुबीदार भाषण भराभर केल्यानें जितकी राजनिष्ठा माझ्या नजरेस आली तितकीच राजनिष्ठा भीत भीत केलेल्या ह्या भाषणावरूनही मला दिसून आली आहे. ह्मणून, प्रेम व साधेभोळेपणा हीं थोडक्या शब्दांत व्यक्त केलीं तरी फारच राजनिष्ठा व्यक्त करितात अशी माझी समजूत झाली आहे.

( क्रीडाध्यक्ष पुन्हां प्रवेश करितो. )

**क्रीडाध्यक्ष**—महाराज, नांदीला सुरवात करावयाची काय?

**थीसियस**—हो, त्यांना येऊं द्या.

( तुताऱ्या वाजतात; क्विन्स प्रवेश करतो. )

**क्विन्स**—प्रेक्षक जनहो ! आह्मी येथें आलों आहों ते आपल्याला त्रास द्यावा ह्मणून नव्हे, हें आपल्या ध्यानांत येईल अशी आह्मांला आशा आहे. आमच्यांत काय कसब आहे हें दाखविण्यासाठीं आह्मी आलों आहों, व आमचा हेतूंही पण तोच आहे. आह्मी कांहीं वाईट हेतू मनांत धरून आलों नाहीं; आपलें पूर्ण समाधान करणें हा कांहीं आमचा हेतू नाहीं. पण आपल्याला आनंद व्हावा अशी आमची इच्छा आहे. आमचा खेळ पाहण्यांत आपला जो वेळ जाईल तो निरर्थक खर्च झाला असें मनांत येऊन,

आपल्याला वाईट वाटूं नये. जें कांहीं कळण्याजोगें ह्मणून आहे तें या खेळांत आपल्याला समजेल.

**थीसियस**—कोठें थांबावें हें या गृहस्थाला कांहींच कींहो समजत नाहीं !

**लायझॅन्डर**—एखाद्या नव्या शिंगराला नवीनच लगाम घालून, त्याच्यावर स्वारी केली ह्मणजे स्वाराच्या ताब्यांत न राहतां, ज्याप्रमाणें तें पळत सुटतें, त्याप्रमाणें कोठेंही न थांबतां आपली नांदी ह्मणून टाकून हा एकदांचा आपला मोकळा झाला ! तरी पण त्याच्या बोलण्याचें तात्पर्य चांगलें आहे. नुसत्या बोलण्यांत काय आहे ? त्यानें अगदीं खरें होतें तें सांगितलें.

**हिपोलायटा**—एखादें मूल पिपाणी वाजवितें व त्यांत तालसुराचा कांहींच मेळ नसतो, त्याप्रमाणें त्यानें ही नांदी ह्मटली एकूण !

**थीसियस**—गुंतागुंत होऊन गेलेल्या एखाद्या सांखळी-प्रमाणें त्याचें भाषण झालें. बाकी त्यांत चुक नव्हती; तरी पण त्यांत सारा गोंधळ होऊन गेला होता इतकेंच. चल, आतां कोणाच्या कामाची पाळी ?

( पिरॅमस, थिसबी, चंद्रप्रकाश व सिंह इत्यादि नाटकपात्रें प्रवेश करितात )

**किन्स**—सभ्य गृहस्थहो, हा खेळ पाहून तुह्मांला आश्चर्य

वाटेल; पण सर्व गोष्टींचा खुलासा होईपर्यंत खुशाल आ-श्चर्य वाटूं द्या. आपल्याला समजून घ्यावयाचें झालें तर मी असें सांगतों कीं हा मनुष्य पिरॅमस आहे. ही सुंदर स्त्री थिसबी आहे. हा चुना, लिंपण वगैरे अंगाला लाविलेला मनुष्य भिंत आहे. याच दुष्ट भिंतीमुळें या नवरा-बायकोनां एकमेकांस भेटतां येत नसे. पण या भिंतीच्या भेगेंतून कानगोष्टी करून तीं आपलें समाधान करून घेत असत. हें पाहून कोणालाही आश्चर्य वाटूं नये ! कंदील, कुत्रा व कांटेरी झाड हातांत घेऊन आलेला हा मनुष्य चंद्रप्रकाश आहे. कारण नीनसच्या थडग्याजवळ हें जोडपें एकमेकांला भेटत असे. व हीच जागा त्यांच्या खऱ्या प्रेमाच्या उद्वेगाचें ठिकाण असल्याचें तुह्मांला माहीत आहेच. हा जो भयंकर प्राणी दिसत आहे व ज्याला सिंह ह्मणतात, त्यानें थिसबी आपल्या वचनाप्रमाणें पि-रॅमसला भेटण्याकरितां आली असतां तिला पळवून लाविलें, किंवा घाबरवून सोडिलें; व ती पळत असतांना, तिच्या अंगावरील शेला खालीं पाडला तो यानें रक्तानें भर-लेल्या आपल्या तोंडानें उचलून घेतला व त्यामुळें त्याला डाग पडला. इतक्यांत सुंदर, तरुण व उंच बांध्याचा असा पिरॅमस तेथें आला व त्यानें आपणांवर विश्वास ठेवणाऱ्या थिसबीचा तो शेला रक्तानें माखलेला पाहिल्यामुळें त्याला वाटलें कीं वाघानें तिला ठार मारलें, ह्मणून लागलीच

त्यानें आपली तरवार उपसली. व ती आपल्या छातींत भोंसकून घेऊन प्राण सोडिला. आतां बाकीचें कथानक आहे तें सिंह, भिंत, चंद्रप्रकाश आणि एकमेकांवर प्रेम करणारें जोडपें हीं येथें रंगभूमीवर आपापल्या भूमिका करून दाखवितील.

( नांदी ह्मणणारा पिरॅमस, थिसबी सिंह, भिंत व चंद्रप्रकाश हीं जातात. )

**थीसियस**—हें एक आश्चर्य आहे ! सिंह कसा बोलणार बुवा !

**डिमोट्रियस**—त्यांत आश्चर्य तें कसलें ? महाराज, पुष्कळ गाढवें एकत्र जमून जर ओरडतात, तर सिंह बोलला त्यांत काय झालें ?

**भिंत**—माझें नांव स्नाउट आहे. या नाटकांत मला भिंतीच्या पात्राचें काम करावयाचें आहे, आणि हें आपण नीट समजून घ्या. जिच्यामध्यें भेगा पडल्या आहेत व त्या भेगांतून, पिरॅमस व थिसबी यांच्या कोणास न-कळत अशा कानगोष्टी होत असत, अशी मी एक भिंत आहें, अशी माझी विनंति आहे. हा चुना, हें लिंपण व हा दगड हीं सर्व, मी भिंतीचें काम करणार असें दाखवितात. ही खरी हकीकत आहे. भिंतीची ही भेग प्रामाणिक व अप्रामाणिक अशी आहे; कारण या फटीं-

तून दुसऱ्या कोणाला कळेल कीं काय अशी भीति बाळगणारें जोडपें कानगोष्टी करीत असे.

**थीसियस**—चुना व लिंपण हीं जें बोललीं यापेक्षां कोणी अधिक चांगलें बोलतील काय ?

**डिमेट्रियस**—महाराज, भिंत बोलतांना अजूनपर्यंत कांहीं ऐकलें नव्हतें.

**थीसियस**—ऐका, पिरॅमस भिंतीजवळ येत आहे.

( पिरॅमस येतो )

**पिरॅमस**—हे भयाण रात्री, अग काळ्याकुट्ट रात्री, जी तूं दिवस नसतांना असतेस. अग ए रात्री मला वाटतें कीं थिसबी आपलें वचन विसरून गेली. अग भिंती, ए प्रिय सुंदर भिंती, तूं तिच्या बापाची जमीन व माझी जमीन यांच्यामध्यें आहेस. तूं मला आपली फट दाखीव ह्मणजे तींतून मी आपल्या डोळ्यांनीं पाहीन. ( भिंत आपलीं बोटें वर धरिते ) हे शिष्टाचार संपन्न भिंती मी तुझा आभारी आहें. ह्याबद्दल तुफानाच्या पावसामध्यें देव तुझें रक्षण करो ! पण मला हें काय बरें दिसत आहे ? मला थिसबी कांहीं दिसत नाहीं. ए दुष्ट भिंती, ज्या तुझ्या भेगेमधून माझ्या आनंदाचें ठिकाण मला दिसत नाहीं व जी तूं मला फसवीत आहेस, त्या तुझे दगडच नाश पावोत.

**थीसियस**—मला वाटतें ज्या अर्थीं या भिंतीमध्यें जीव आहे त्याअर्थीं तिनेंही उलट शाप द्यावा.

**पिरॅमस**—नाहीं महाराज, तिनें शाप देतां कामा नये. " तूं मला फसवीत आहेस " हे शब्द ऐकल्याबरोबर थिसबीनें प्रवेश करावयाचा आहे; आणि यावेळीं मी भिंतीच्या भेगेमधून पहावयाचें आहे. आपल्याला आतां कळेलच. मी ह्मणतों असेंच होईल. ती पहा ती येत आहे.

**थिसबी**—( प्रवेश करते )अग भिंती, तूं माझ्या सुंदर पिरॅमसपासून मला विभक्त केल्यामुळें मी जो शोक करीत आहें, तो तूं पुष्कळ वेळां ऐकला आहेसच. पिकल्या तोंडल्यासारख्या माझ्या ओठांनीं, ज्या चुन्यानें, केसांनीं तुझ्यामध्यें दगड चिणले आहेत त्याचें मी कित्येक वेळां तरी चुंबन घेतलें आहे !

**पिरॅमस**—कोणी तरी बोलत आहे असें मला वाटतें. मी आतां फटीकडे जातों ह्मणजे थिसबीचें शब्द मला ऐकावयाला सांपडतील. थिसबी !

**थिसबी**—हा माझा प्रियकर वाटतें ? प्रियकरा !

**पिरॅमस**—तुला काय वाटेल तें वाटो; पण मीच तो तुझा नाजुक प्रियकर आहें. लायझॅन्डरप्रमाणें तुझ्या ठिकाणीं माझें निष्ठापूर्वक प्रेम आहे.

**थिसबी**—मग हेलेनेप्रमाणें मी तुझ्यावर प्रेम करीन.

**पिरॅमस**—ह्यांनींच भिंतीच्या फटींतून तू माझें चुंबन घे.

**थिसबी**—भिंतींतल्या भेगेचें मी चुंबन घेणार. मला तुझे ओंठ कसे सांपडणार.

**पिरॅमस**—बरें, पण तूं मला निनीच्या थडग्याजवळ भेटणार ना ?

**थिसबी**—मी मेलें तर उपाय नाहीं. पण जिवंत असलें तर मात्र येथें अगदीं वेळेवर खचित येईन. ( पिरॅमस व थिसबी जातात. )

**भिंत**—माझें भिंतीचें काम संपलें; आतां मी जातें.

( जातो )

**थीसियस**—आतां त्या दोन जोडप्यांमधली भिंत एकदांची गेली !

**डिमेट्रियस**—महाराज, तिला घालवून दिल्याशिवाय सोय नाहीं. कारण तसें न केलें तर दोघांना नकळत ती कदाचित त्यांचे गुप्त विचार ऐकावयाची !

**हिपोलायटा**—मी आजपर्यंत पाहिलेल्या खेळांत हा खेळ कांहीं विलक्षणच आहे. पण यांत कांहींच अर्थ नाहीं.

**थीसियस**—अशा खेळांपैकीं अगदीं उत्तम असा खेळ

घेतला तरी तो केवळ सावलीप्रमाणें ह्मणजे ज्यांत कांहींच नाहीं असा वाटेल. त्याचप्रमाणें अगदीं वाईटांतला वाईट असा खेळ घेऊन तो जर कल्पनेनें वाईट कल्पना चालवून बसविला तर तो, खचित वाईट ठरणार नाहीं.

**हिपोलायटा**—पण कल्पनाशक्ती आपण चालवितों, ते कांहीं ती चालवीत नाहींत.

**थीसियस**—आपण उत्तम आहों असें ज्याप्रमाणें त्यांना स्वतःबद्दल वाटतें त्याचप्रमाणें जर त्यांच्याबद्दल आपल्याला वाटलें तर त्यांची उत्तम नाटकवाल्यांत गणना होईल. बरें पण हें पहा इकडे दोन उमदे पशु येत आहेत. त्यांपैकीं एक मनुष्य व एक सिंह आहे. ( सिंह व चांदणें हीं पात्रें प्रवेश करितात. )

**सिंह**—अहो सभ्य स्त्रियांनों, एखादा लहानसा उंदीर जमीनीवरून पळत जातांना तुह्मी पाहिला तरी देखील तुमचीं कोमल अंतःकरणाची भयानें गाळण उडते; मग आक्राळ विक्राळ सिंह मोठ्यानें गर्जना करूं लागला तर तुह्मांला पराकाष्ठेचें भय वाटेल व थरथर कांपूं लागाल. यांत काय नवल? ह्मणून मी तुह्मांला सांगतों कीं त्या दुष्ट सिंहाचें काम करावयाचें माझ्या नशीबीं आलें आहे. पण मी स्नग सुतार आहे. खरें पाहिलें तर मी सिंहही नाहीं

व सिंहीणही नाहीं कारण सिंह बनून या नाटकांतल्या सिंहाप्रमाणें माझी अवस्था झाली तर माझी स्थिति करुणास्पद होईल.

**थीसियस**—हा तर मोठा सौम्य पशू दिसतो. याला सद-सद्विवेक बुद्धिही आहे !

**डिमेट्रियस**—आजपर्यंत पाहिलेल्या पशूंच्या सोंगामध्यें त्यानें आपलें काम एकंदरीनें चांगलें केलेंच केलें ह्मणायचें !

**लायझॅन्डर**—शौर्याच्या बाबतींत हा सिंह तर दुसरा एक कोल्हाच आहे ह्मणायाचा !

**थीसियस**—आणखी त्याची अक्कल एखाद्या बुळगट हंसी-प्रमाणें आहे नव्हे का ?

**डिमेट्रियस**—नाहीं महाराज, त्याचें शौर्य त्याच्या अकले-प्रमाणें व त्याच्या विचाराप्रमाणें चालत आहेसें दिसत नाहीं; आणि कोल्हा तर हंसीला घेऊन जातो.

**थीसियस**—मला तर खात्रीनें वाटतें कीं त्याच्या शौर्यापुढें त्याच्या अकलेचें कांहीं चालणार नाहीं; कारण हंसी कांहीं कोल्ह्याला घेऊन जात नाहीं. ठीक आहे. त्याचें शहाणपण त्याची अक्कल त्याच्याजवळ राहूं द्या. आणि चंद्रप्रकाश काय ह्मणतो तें आतां आपण ऐकूं.

**चंद्रप्रकाश**—हा कंदील दोन्हीं बाजूला शिंगें असणारे चंद्रकोर दर्शवीत आहे बरें काय.

१५

**डिमेट्रियस**—हा आपल्या डोक्याला शिंगें लावता तर बरें होतें; नव्हे का ?

**थीसियस**—तो जर नुसती चंद्राची कोर असता तर त्याची शिंगासारखीं टोकें दिसलीं असतीं. पण तो पूर्ण-चंद्र आहे. तेव्हां त्याचीं शिंगें त्याच्या वर्तुळाभोंवतीं अदृश्यच आहेत असें समजावयास काय चिंता आहे ?

**चंद्रप्रकाश**—हा कंदील ह्मणजे शिंगासारखीं टोंके असलेला चंद्र आहे बरें काय; आणखी चंद्रामध्यें जी माणसाची आकृती दिसते तो मी.

**थीसियस**—ही तर केवढी ढोबळ चूक ! मी चंद्रांतला मनुष्य आहें असें जर तो ह्मणतो तर त्यानें कंदिलांत बसावयाला नको होतें कां ?

**डिमेट्रियस**—असें कसें ह्मणतां ? तो जर कंदिलांत बसला तर भाजणार नाहीं का ? कंदिलांत मेणबत्ती जळत आहे.

**हिपोलायटा**—हें पात्र एकदां जाईल तर बाई बरें होईल. मला त्याचा अगदीं कंटाळा आला आहे.

**थीसियस**—त्याच्या अकलेचा जो कांहीं थोडासा प्रकाश पडला आहे त्यावरून असें दिसतें कीं, त्याला उतरती कळा लागली आहे. तरी शिष्टाचाराप्रमाणें आपल्याला असेंच कांहीं वेळ बसलें पाहिजे.

**लायझॅन्डर**—हं चांदोबा, चालूं द्या पुढें.

**चंद्रप्रकाश**—तुह्मांला जें कांहीं मी सांगणार आहें तें हेंच कीं हा कंदील ह्मणजे चंद्र व मी स्वतः चंद्रावरील मनुष्य आहें हें जें कांटेरी झाड आहे तें चंद्रावर जें कांहीं कांट्यासारखें दिसतें तें होय. आणि हा कुत्रा, माझा कुत्रा आहे.

**डिमेट्रियस**—या सर्व गोष्टी कंदिलांत असावयाला पाहिजे होत्या. कारण त्या चंद्रावर आहेत. पण जाऊं द्या. गडबड बंद करा. आतां ही थिसबी येत आहे.

**थिसबी**—( प्रवेश करून ) हाच निनीचा दरगा. माझा प्रियकर कोठें आहे ?

**सिंह**—( ओरडतो ) अरे ( थिसबी पळून जाते )

**डिमेट्रियस**—सिंहा तूं तर चांगला ओरडलास.

**थीसियस**—थिसबी तूं देखील चांगली पळालीस.

**हिपोलायटा**—चंद्रा, तूं चांगला प्रकाशलास. खरोखरच बाई चंद्राचा तर मोठा खुबीदार प्रकाश पडला आहे.

( सिंह थिसबीचा शेला ओढतो व जातो. )

**थिसबी**—सिंहा खूप सफाईनें कपडा फाडलास.

**लायझॅन्डर**—तो पहा तो तर पळून गेला.

**डिमेट्रियस**—आणि आतां हा पिरॅमस आला.

**पिरॅमस**—प्रियचंद्रा तुझें हें स्वच्छ चांदणें पडलें आहे त्याबद्दल मी तुझा आभारी आहें. यावेळीं तूं जें हें स्वच्छ चांदणें पाडलें आहेस त्याबद्दल मी तुझे उपकार मानितों. कारण तुझ्या रमणीय, सोनेरी चकचकीत चांदण्यामध्यें मला थिसबीचें खरें स्वरूप पहाण्यास मिळावयाचें आहे. पण जरा थांब पाहूं. अरे दुर्दैवा! पण अरे दुर्दैवी प्राण्या, काय हा दुःखद प्रसंग मजवर आला! डोळ्यांनों, तुह्मांला दिसतें का? हे असें कसें असेल? अग माझे सुंदरी प्रिये, प्रिये, काय हा तुझाच कां शेला रक्तानें माखलेला आहे? दुष्ट ग्रहांनों, मला सोडा, मारा, कांपा, आणि एकदांचा माझा शेवट करा.

**थीसियस**—एखादा मित्र मेल्यावर जर असें कळकळीचें दुःख दिसलें तर कोणालाही वाईट वाटल्यावांचून राहणार नाहीं.

**हिपोलायटा**—मला जर या माणसाची कींव आली नाहीं तर दुर्दैवाची मजवर वक्रदृष्टी होवो.

**पिरॅमस**—हे परमेश्वरा! या सृष्टीमध्यें तूं सिंह कशाला उत्पन्न केलेस? कोणी एका दुष्ट सिंहानें माझ्या प्रियेला, तिच्या ऐन सुखाच्या दिवशीं ठार मारिलें. माझी प्रिया सर्व स्त्रियांमध्यें सुस्वरूप आहे; नव्हे होती व ती आनंदानें कालक्रमणा करीत होती. अश्रूनों, या व मला वेडा क-

रून टाका. कट्यारी ! चल नीघ बाहेर व पिरॅमसच्या छातींत डाव्या बाजूला शीर. कारण तेथें काळीज असतें. ( स्वतःच्या छातींत कट्यार भोंसकून घेतो ) याप्रमाणें मी मेलों आहें. आतां मी पळून गेलों आहें. माझा आत्मा आकाशांत गेला आहे. जिव्हे, आतां तूं बोलणें सोड. चंद्रा, तूं आपला चालता हो. ( चंद्रप्रकाश जातो ) आतां मी मरतों, मरतों, मरतों.

**थीसियस**—वैद्याला बोलावलें तर तो वांचेल, नाहीं काहो ?

**हिपोलायटा**—पण थिसबी येऊन तिला तिचा प्रियकर दिसण्यापूर्वींच चंद्रप्रकाश निघून गेला हें कसें ?

**थीसियस**—तार्‍यांच्या प्रकाशानेंच ती त्याला शोधून काढील. ती पहा आली आणि तिच्या शोकाबरोबरच नाटकाचा शेवट होणार आहेसें वाटतें ( थिसबी पुन्हा प्रवेश करते. )

**हिपोलायटा**—मला तर वाटतें आपल्या पिऱ्यामस करितां हिनें कांहीं फार वेळ शोक करूं नये. ती आतां लवकर आटोपतें घेईल, तर बाई बरें होईल.

**डिमेट्रियस**—एका शब्दावरून सारें पारडें फिरून जाईल. कारण आतांपर्यंत दोघांचें काम इतकें चांगलें झालें कीं, त्यांतल्या त्यांत पिऱ्यामसचें चांगलें कीं थिसबीचें चांगलें, हें सांगतां येत नाहीं. एकानें जसें पि-

न्यामसचें काम चांगलें केलें, तसेंच दुसऱ्यानेंही थिसबीचें काम चांगलें केलें असें मी समजतों.

**डिमेट्रियस**—आतां ती काय ह्मणते तें ऐका.

**थिसबी**—प्रियकरा, तूं निजलास काय ? अरे माझ्या खबूतरा, तूं जिवंत आहेस ना पण ? पिऱ्यामस, उठ, बोल बोल, काय; अगदींच बोलत नाहींस ? मेला हो मेला. तुझ्या या सुंदर डोळ्यांवर कबर बांधिली पाहिजे. कमलाप्रमाणें असलेले हे तुझे ओठ, तोंडल्याप्रमाणें असलेलें, तुझें हें नाक, पिवळ्या गुलाबाप्रमाणें असलेले तुझे हे गाल, सर्व आतां नाहींसे झाले आहेत. प्रेमी जन-हो, शोक करा; याचे डोळे कांद्यांच्या पातीसारखे हिरवेगार होते. यमदूतांनों, तुमचे तिघांचेही स्वच्छ हात रक्तांत बुडवून आतां माझ्याकडे या; कारण त्याचा आयुष्याचा रेशमी तंतू तुह्मी तोडून टाकिलेला आहे आतां पुरे. प्रामाणिक कट्यारी, ये; आतां माझ्या हृदयांत प्रवेश कर. ( छातींत कटयार खुपसून घेते. ) मेलें ! मेलें ! मेलें !! मी येतें आतां. या प्रमाणें थिसबीचा अंत होत आहे. ( मरते )

**थीसियस**—चंद्रप्रकाश व सिंह हे दोघेजण मृतांना पुरण्यासाठीं मागें राहिले आहेत, बरेंका !

**डिमेट्रियस**—आणि ती भिंत देखील.

**बॉटम**—तेवढ्याचसाठीं मागें राहिली आहे असें दिसतें! ( उठून उभा राहून ) नाहीं, खरोखर नाहीं. ती भिंत तर केव्हांच नाहींशी झाली. आतां, आपण उपसंहार ऐकावा; व आमच्या मंडळीपैकीं दोघे इसम नाच करून दाखवितील तो पाहाण्याची कृपा करावी.

**थीसियस**—आतां तुमच्या या उपसंहाराची मुळींच जरूर नाहीं, समजलांना रे बाबानों! तुमच्या या नाटकांतील मुख्य पात्रें मेलीं आहेत, तेव्हां उपसंहार अनावश्यक आहे. खरोखर ज्या मनुष्यानें हा खेळ लिहिला, त्यानें जर पिऱ्यामसचें काम केलें असतें व थिसबीच्या पायमोजाच्या बंदानें, आपल्या स्वतःला गळफास लावून घेतला असता, तर तें मात्र एक सुंदर शोकपर्यवसायी नाटक झालें असतें! व हेंही तसेंच झालें आहे. प्रत्येक पात्रानें आपलें काम फार चांगलें केलें आहे. आतां तुमचा तो नाच करा पाहूं. तुमचा तो उपसंहार आतां राहूं द्या एका बाजूला. मध्यरात्रीनें आपल्या लोखंडी जिभेनें बारा वाजल्याचें आतांच जाहिर केलें, नव्हेका? प्रेमी जनांनों, आतां निजायला जावयाची वेळ झाली, तरी बिछान्यावर जाऊन लोळण्याची तयारी करा. इतके उशिरा जागल्यानें सर्वांस फार तसदी पडली आहे तथापि झाली ही आपली करमणूक उत्तम प्रकारची झाली. हें लक्षांत आ-

णून आपण आपल्या मनाचें समाधानच करून घेतलें पाहिजे. तशांत अशा हलक्या समजुतीच्या लोकांस आपल्यामुळें उत्तेजन आलें हीही कमी समाधानाची गोष्ट नाहीं. मला वाटतें, आज रात्रीं ज्या अर्थी आपण इतके उशिरां झोंपी जात आहों, त्याअर्थी उद्यां सकाळीं उठावयालाही इतकाच उशीर होईल. होईना बापडा! आपण त्याची कांहीं चिंता करूं नये. विवाहनिमित्त मोहोत्सव जोंपर्यंत चालू राहील तोंपर्यंत हें असेंच चालावयाचें. मग उशिराबद्दल विषाद मानून काय उपयोग? चला! ह्या खेडवळ खेळानें बरीच कीं हो रात्र काढली! प्रिय मित्रांनों, आतां आपण आपापल्या बिछान्यावर जाऊन पडूं. आमच्या मनांतून तर रोजचेरोज नव्या नव्या गमती करून, हा समारंभ अशाच रीतीनें एक पंधरवडाभर तरी चालू ठेवावयाचा आहे.

( सर्व जातात व पक प्रवेश करितो. )

**पक**—आतां भुकेलेला सिंह गर्जना करीत आहे; व लांडगा चंद्राकडे पाहून ओरडत आहे; आणि दिवसभर काबाडकष्ट करून थकलेले शेतकरी, सुखानें घोरत पडले आहेत. दुखण्यामुळें ज्या दुर्दैवी प्राण्यांना झोंप येत नाहीं, त्यांना मात्र यावेळीं लांकडाचे ओंडे जळून विस्तवाचा मंद प्रकाश पडला असतांना व रस्त्यांतून घुबडें घुत्कार

करीत असतांना, आपण मरणार असें वाटूं लागतें. ही आतांची मध्य रात्रीची वेळ अशी आहे कीं, यावेळीं प्रत्येक कबर उघडते व त्यांतून एकेक भूत बाहेर पडतें. व देवळाकडील रस्त्यानें जाऊं लागलें ह्मणजे हळूहळू चालूं लागतें. मनुष्यें दिवसभर केलेले व्यापार स्वप्नांत करतात, आणि आम्हीं परी व यक्ष मंडळी, आमच्या त्या त्रिरूपधारी पातालस्थ देवतेच्या रथावर बसून, तिजबरोबर पृथ्वीवर संचार करीत मजा मारतों. येथील राजवाड्यांत कोठेंही फिरण्याची, उंदराचीही छाती नाहीं. दारामागें पडलेली माती व केर झाडण्यासाठीं केरसुणी देऊन आमच्या महाराजांनीं मला येथें पाठविलें आहे.

( ऑबेरान व टिटॅनिया आपल्या अनुयायी मंडळींसह प्रवेश करतात. )

**ऑबेरान**—लांकडें जळून जाऊन पडलेल्या निखाऱ्यांच्या मंदप्रकाशांत प्रत्येक भूत व प्रत्येक परी, जसे झाडाझूडपांतून पक्षी उड्या मारतात, त्याप्रमाणें उड्या मारीत आहेत. अशावेळीं माझें आवडीचें काम ह्मटलें ह्मणजे, मी जें गाणें रचलें आहे तें गात बसावयाचें.

**टिटॅनिया**—बरं आहे महाराज. तर मग ताल सुरावर तें सगळें गाणें ह्मणून दाखवा पाहूं. नंतर पऱ्यांना शोभेल अशा मनोहर रीतीनें हातांत हात घालून आपण नाचूं आणि या रमणीय स्थानीं आनंदी आनंद करून सोडूं.

( नृत्य गायन सुरू होतें )

**ऑबेरान**—आतां प्रभात होईपर्यंत या वाड्यामध्यें प्रत्येक परीनें रहावें असा माझा सर्वांस हुकूम आहे. आणि टिटॅनिया व मी, अशीं आह्मीं उभयतां, राजाराणीकडे जातों, व असा आशिर्वाद देतों कीं त्यांना पुत्ररत्नच प्राप्त होईल. व तो पुढें भाग्यवान निघेल. आणि हीं तीन जोडपीं आहेतना ?–त्यांच्यांत जें पतिपत्नि प्रेम नांदत आहे त्यांत कधींही उणेपणा न येवो, व यांच्या अंगावर जन्मतःच जे कांहीं डाग वगैरे आहेत, त्यांपासून त्यांची संतती मुक्त राहो असाही आशिर्वाद आह्मी देतों. आतां गडबड न करितां प्रत्येक परीनें शेतांतून दंव आणून राजवाड्यांत ठिकठिकाणीं तें शिंपडावें, व ती जागा मंगलदायक करून टाकावी ह्मणजे तेथें यजमानाला कोणतीही बाधा होणार नाहीं, व तो दीर्घकाळ सुखानें नांदेल. चला, आतां आपापल्या कामाला लागा पाहूं. उभ्या राहूं नका, व मला पहाट झाली ह्मणजे येऊन भेटा.

( आबेरान, टिटॅनिया व त्यांचे अनुयायी जातात. )

**पक**—आम्ही भुतें छायेप्रमाणें आहों. आपल्याला न आवडतील असे जर कांहीं देखावे यांत आपल्यासमोर आले असले व त्यांत आपला अपमान होईल असें कांहीं आढ-

ळलें असलें तर आपण स्वप्नांतच होतों व आपणास कांहीं दिसलें नाहीं असेंच आपण समजावें झालें. हा जो आभासमय चमत्काराचा खेळ आम्हीं करून दाखविला त्यांत जरी कांहीं दोष असले तरी त्यांकडे दुर्लक्ष करून, आम्ही आपली केलेली करमणूक मान्य करून घेतली याबद्दल आम्ही आपले फार फार आभारी आहों. आपण ज्यापेक्षां आमच्या दोषांची आह्मांला क्षमा केली त्यापेक्षां आम्ही पुढें यांत सुधारणा करूं. मी बोलल्याप्रमाणें चालणारें एक इमानी पिशाच्च आहें; आणि मी आपणाला खात्रीनें सांगतों कीं आपण आमची टर उडविली नाहीं व सदय अंतःकरणानें क्षमा केली या कारणानें लवकरच आह्मास आपणाला आणखीं एक सुंदर खेळ करून दाखविण्याची उमेद आली आहे. आतां आपल्या क्षमेला आह्मी पात्र आहों असें जरी आह्मांस वाटत नाहीं तरी आमच्या सुदैवानें क्षमा करण्याची बुद्धि आपणाला झाली व पुढेंही अशीच नेहमीं होईल असा आह्मांस भरवंसा आहे. तर महाराज, आतां शेवटीं येवढें सांगतों—अधिक बोलणें मला येत नाहीं—कीं वर ह्मटल्याप्रमाणें जर आमच्या हातून घडलें नाहीं तर हा लबाड आहे असें मग आपण खुशाल ह्मणावें. महाराज मी येतों आतां! आपली सर्वांची रजा घेतों! आपण

आतां एकदां शेवटच्या टाळ्या वाजवा व मीही त्याबद्दल मित्रत्वाला योग्य असाच कृतज्ञतेचा मोबदला देईन.

( जातो व पडदा पडतो. )

